# कोकणचा पोर

मराठे शाहींतील नाविकदल जीवनावर आधारलेली
स्वतंत्र कादंबरी

न. चिं. केळकर

जानेवारी १९४२

किंमत १॥। रुपये

# प्रस्तावना

शिवाजी महाराजांचा संचार मुख्यतः देशावर पर्वत व खोरीं यांतून होता. त्यांना डोंगरी किल्ल्यांचें महत्व फार वाटत होतें. तरी ते समुद्रावरील आरमाराचें महत्व जाणत नव्हते असें मात्र नाहीं.'राजनीति' नांवाचा एक सुंदर राजकारणी प्रबंध बावडेकर रामचंद्रपंत अमात्य यांनीं सन १७१६ या सालीं, म्हणजे शिवाजी महाराजांच्या नातवाच्या काळीं, लिहिलेला आहे. त्यांत खातेवारीनें राज्यकारभाराच्या अनेक अंगांचे मोठें मार्मिक विवेचन केलें आहे. मुलखाची विभागणी, मोजणी, मापणी आकारणी, जमाबंदी, वसुली, पायदळ व घोडदळ सैन्य, तोफखाना सर्व प्रकारचा लष्करी सरंजाम, लष्करी वाहनें, डोंगरी व भुईकोट किल्ले, हुजरांत सैन्य, राजमंडळ, प्रधानादि अमात्य, देशांतील साहुकार, वतनदार, ग्रामाधिकारी, खजिना, देशनायक, दिवाणी लष्करी पोट अधिकारी, आबादानी वसाहती इत्यादि गोष्टींचें महत्व त्यांत वर्णिलें आहे. त्यांची व्यवस्था राजानें कशी ठेवावी हें अनुभवाच्या आधारानें सांगितलें आहे. याच प्रबंधांत रामचंद्रपंत अमात्यानें **'आरमारा'**चेंहि महत्व वर्णिलें आहे.

अमात्य म्हणतो ' आरमार म्हणजे एक स्वतंत्र राज्यच आहे. राज्यांत समुद्रकिनारा व खाड्या येथें आरमाराचा उपयोग फार. म्हणून स्थलमान, वायुमान, इत्यादि लक्षांत घेऊन गलबतें, गुराबा, लहानमोठ्या बांधाव्या. त्यावर मर्द लढाऊ माणसें नेमावी. तोफा, जंबूरे, बन्दुका, दारुगोळा, खोके इत्यादि आरमारी लढाऊ सामान तयार करावें. आरमारी सुभे बनवावे. आरमारी खर्चाची चांगली व्यवस्था करावी. बंदरी उत्पन्न व बंदरी खर्च यांचीं तोडें मिळतील असें शक्यतों करावें. परदेशी किंवा किनाऱ्यालगतचा व्यापार वाढवावा. म्हणजे जकातीचें उत्पन्नहि वाढतें व व्यापारहि वाढतो. दर्यावर्दी शत्रू मोठे उद्योगी म्हणून त्यांची खबर नेहमीं ठेवून त्यांचा मुलुख मारावा. समुद्रावर व्यापार करणारे सावकार मच्छीमार इत्यादिकांचें संरक्षण करावें. गलबतें तरांडी यांत शत्रूमित्र हा भेद बारीक

पहावा. मित्रांना नयेभये आपलेसे करून, त्याना उपद्रव न देतां स्नेह संपादून, बंदरी आणावें, त्यांना जळण लाकूड, गोडे पाणी, फळफळावळ, धान्य इत्यादि पदार्थ अनुकूलतेनें विकत द्यावा. उलट त्यांच्याकडून थोडीबहुत जकात घ्यावी. उलट शत्रूचीं गलबतें समुद्रांत आढळलीं तर त्यांना धरून बंदरांत आणावें. व त्यांतील सर्व माल जप्त करून हुजूर लिहून पाठवावें. लढाईचा प्रसंग आल्यास सर्व सरकारी व खाजगी दर्यावर्दी यांनीं एकजूट करावी. होतां होईल तो ज्या दिशेनें वारा वाहत असेल त्या दिशेला आपण राहून, वाऱ्याचा फायदा घेऊन, शत्रूच्या आरमाराशीं झुंजावें. वारा अनुकूल नसेल तर आपलीं गलबतें समुद्राच्या किनाऱ्याच्या व बंदरांच्या आश्रयाला न्यावीं. पर्जन्य काळ सुरू होण्याच्या आधीं, किंवा समुद्रावर तुफानाचा रंग दिसल्याबरोबर, आरमाराची छावणी करावी. दर्यावर्दी लोकांनीं किनाऱ्यावरील लोकांशी सभ्यपणानें वागावें. बोलीचालींत कच कलागत होऊं देऊ नये. प्रतिवर्षी छावणीला बंदरें आलटून पालटून घ्यावी. एखादें नवीनहि हुडकून काढावें. आरमार शक्यतों वाढून ठेवावें. जागा जागा छावण्या कराव्या. जमिनीच्या बाजूनें व समुद्राकडेहि घस्त ठेवावी. जंगलांतील लाकडें, झाडें, आरमारी उपयोगाची असतील ती तोडूं देऊं नये. त्यांना वाढावयाला फार काळ लागतो. "

इत्यादि अनेक प्रकारचा तपशीलवार उपदेश या अधिकाऱ्यानें केला आहे. आणि तो अनुभवावर आधारलेला आहे. हा अनुभव दर्यावर्दी मराठ्यांना या पूर्वी सुमारें ५०—६० वर्षांचा होता. कारण सन १६६० च्या सुमाराला शिवाजी महाराजांचें पहिलें आरमार सज्ज झालें. विजापूर अहमदनगर येथील मुसलमान राजांनी कोंकणांत प्रवेश करून कोठें कोठें समुद्र किनाऱ्यापर्यंत अंमल बसविला होता, व कांहीं ठिकाणी समुद्रदुर्गहि बांधले होते. अर्थात् मुसलमानांचा अंमल थांबवून आपला करावयाचा तर आपल्याला नुसतें घाटमाथ्यावर राहून चालावयाचें नाहीं, समुद्र किनाऱ्या-पर्यंत गांठ घातली पाहिजे, ही गोष्ट शिवाजी महाराजांच्या लक्षांत त्वरित आली असल्यास नवल काय ?

मुसलमानी राज्यांच्या राजधान्या घाटावर आंत बऱ्याच लांब. परंतु मराठ्यांचा कायमचा शत्रु जो शिद्दी तो तर समुद्र किनाऱ्यास जंजीरा येथें कायम होऊन बसलेला, व त्याच्या हातीं मजबूत किल्ला व सुरक्षित बंदर. हेंहि एक कारण आरमारी कारभारांत लक्ष घालण्याला होतेंच. शिवाय ' सत्तावीस पादशाह्या पाण्यांत आहेत ' अशी म्हण तेव्हांची जुनी होती. तिचा अर्थ हाच कीं, इकडील आरमारी शत्रुपेक्षां परदेशी आरमारी शत्रु कोंकण किनाऱ्याकडून समुद्रांत भरमसाट वावरत होते त्यांची दहशत वाटूं लागली होती.

शिवाजी महाराजांनीं आपल्या कारकीर्दीत स्वतः समुद्र किनारी किल्ले बांधले. कोळी–भंडारी वगैरे दर्यावर्दी लोकांना हाताशीं घेऊन त्यांचें आरमारी सैन्य बनविलें. त्यांतूनच त्या सैन्याचे सरदार निर्माण केले. कांहीं लहान सहान गोद्याहि बांधल्या. स्वतः आरमार घेऊन कारवारापर्यंत समुद्रावर स्वाऱ्या केल्या. कांहीं ठिकाणीं परदेशी व्यापारांच्या वखारी लुटल्या किंवा त्यांच्याकडून कौल घेवविले. उघड्या दर्यावरहि शिवाजीच्या आरमाराच्या फिरंग्यांच्या आरमाराशीं लढाया झाल्या.

रायगडावरील राज्याभिषेकाच्या प्रसंगीं शिवाजी व इंग्रज यांच्यांत तह झाला.त्यात इंग्रजांचें जहाज फुटून किनाऱ्याला लागले तर त्यांतील लोकांना सहाय्य करावें,व त्यांना परत सुरक्षित जाऊं द्यावें, ही गोष्ट शिवाजीनें मान्य केली. पण बिनवारशी जहाज फुटून किनाऱ्याला लागलें तर त्यांतला माल सरकारजमा करण्याचा हक्क शिवाजीनें सांगितला. इंग्रज व शिवाजी यांच्या आरमारांत जी एकच लढाई झाली त्यांत मराठी आरमारानेंच इंग्रजांचा पराभव केला ! यावेळीं इंग्रजांचें जहाज ' रिव्हेंज ' नांवाचे होतें. त्यावरील सरंजामापेक्षां मराठी आरमाराचा सरंजाम अधिक चांगला होता असें ऑर्म या इतिहासकारानें लिहिलें आहे. चित्रगुप्ताच्या बखरींत त्या वेळच्या आरमाराची एक यादी म्हणून दिली आहे ती अशीः "पाणीयांतील तरांडी जहाजें सुमारें तीस होल ? गुराब शंभर गलबतें. १५० महां·

गिऱ्या. ५० लहान गुराब. दहा मोठ्या होडिया. १५० लहान होडिया. ६० तारवें. २५ पाल. पंधरा जूग. ५० मचवें. "

मोठ्यांत मोठीं जहाजें १५० टनापर्यंत, व तीन मोठ्या डोलकाठ्यांचीं, असत. एकंदर आरमारी सैन्य पांचहजार होतें. हे हल्लींच्या मानानें कांहींच नव्हे पण त्यावेळीं त्याकाळीं मराठ्यांचें आरमार इतकें लहान असूनहि तें इंग्रजाशीं पोर्तुगीजाशीं तुल्यबल असें होतें.

शिवाजीच्या आरमारी सरदारांत राम दळवी, तानाजी सावंत, दौलत-खान दर्यासारंग, इब्राहिमखान, मायनाक भंडारी, इत्यादि नांवें येतात.

शिवाजीच्या वेळच्या अनेक बंदरी किल्ल्यांचीं नांवें येथें देण्याचें कारण नाहीं. त्याच्या आरमाराचें मुख्य ठाणें सिंधुदुर्ग येथें होतें. मालवणाजवळ पद्मदुर्ग येथें एक जहाजें बांधण्याची गोदी होती. डग्लस साहेबानें शिवाजीची आरमारी दृष्टी मान्य केली आहे. तो इतकीच कृपा समजतो कीं, शिवाजी हा स्वतः खलाशी नव्हता ! पण आरमारी मुख्य अधिकाऱ्यांना स्वतः खलाशी असावें लागत नाहीं ! ( त्या वेळच्या इंग्रजी आरमारांत अशीच स्थिती होती याविषयीं मेकॉलेचा इतिहास पहा. )

नेर्न साहेबानें कोंकणाच्या इतिहासांत लिहिलें आहे कीं, " शिवाजी हा समुद्र किनाऱ्यावर राज्य करणाऱ्या तत्कालीन मुसलमान किंवा ख्रिस्ती सत्ता-धिकाऱ्यापेक्षां कमी प्रतीचा राज्यकर्ता नव्हता. त्याच्या अमलाखालीं सदैव युद्ध चाललें होतें तरी प्रजा सदैव सुखी होती. "

शिवाजीनंतर संभाजीनेंहि पोर्तुगीज व जंजीरेकर शिद्दी यांच्याशीं आरमारी लढाया केल्या. पण त्यानंतर एकाचवेळीं दोन गोष्टी घडल्या. एक, मराठी राज्याचा तात्पुरता विध्वंस व दुसरें इंग्रजी आरमारी सत्तेची वाढ. या विध्वंसांत मराठ्यांचें आरमारहि नामशेष व्हावयाचें. पण सुदैवानें त्याच वेळीं कान्होजी आंग्रे हा आरमारी सरदार उदयाला आला, व वाढत्या इंग्रजी सत्तेला तोंड देण्याला समर्थ असें आरमारी दळ त्यानें निर्माण केलें.

राजाराम महाराजांच्या कारकीर्दीत शेवटीं आरमारी आणि लष्करी दोन्ही सत्ता पुन्हा प्रस्थापित होण्याच्या मार्गाला लागल्या. त्यांतील आरमारी सत्तेच्या संवर्धनाचें सर्व श्रेय सरखेल कान्होजी आंग्रे यासच आहे. कान्होजीच्या वेळीं शिद्द्यासह सर्व परदेशी शत्रुनी एकजूट करून आंग्र्याशीं आरमारी लढाया दिल्या. परंतु त्यांत आंग्रेच प्रबळ ठरला. या शत्रुनीं त्याला 'दुसरा शिवाजी' असे नांव दिलें!

असो.आमच्या कादंबरीचा मुख्य विषय मराठ्यांच्या नाविक जीवनाचा व आरमारी पराक्रमाचा असल्यामुळें,आम्ही थोडें सिंहावलोकन करून हा पूर्वीचा इतिहास सांगितला. प्रस्तुत कादंबरींत जो काळ आम्ही वर्णीत आहों त्यावेळीं कान्होजी आंग्रे हा आपल्या वैभवाच्या शिखराला पोंचला होता. अलिबाग व विजयदुर्ग या दोन ठिकाणीं त्यानें आपलीं आरमारी ठाणीं मजबुतपणें प्रस्थापित केलीं होतीं व शत्रूशीं तो सतत झगडत होता. पण पुढें त्याच्या कुटुंबांत गृहकलहाचें बीज निर्माण झालें त्याचाच पुढें विषवृक्ष होऊन त्याचीं घातक फळें मराठी सत्तेला भोगावीं लागली. आणि इंग्रजी आरमाराचा पाश कोंकण किनाऱ्यावर कायमचा बसला. पण या गृहकलहाच्या मानानें दुसरा एक कलह जो आंतून धुमसत होता तोहि आपल्या परीनें घातकच होता.

हा कलह जातिनिष्ठ होय. त्याचें स्वरूप असें.

या पूर्वी शेंकडो वर्षें कोळी—भंडारी इत्यादि जाती समुद्राच्या किनाऱ्यावर वसाहत करून राहिलेल्या असून, समुद्रांत मच्छीमारीच्या धंद्यावर व किनाऱ्या-लगत माडपोफळींच्या लागवडीवर त्या जाती आपली उपजीविका करीत असत. त्यांचा प्रवेश समुद्रांत फार दूरवर होत नसे. त्यांच्या तरांड्यांचा आकार फार लहान. समुद्रांत मारलेले मासे किनाऱ्यापर्यंत आणण्याएवढी, किंवा या बंदरापासून त्या बंदरापर्यंत माल वाहून नेण्याएवढींच तरांडीं असत. यामुळें खालीं कारवारपासून वर सुरत—दमणपर्यंत संचार करणाऱ्या दर्यावर्दी लोकांशीं त्यांची फारशी गांठ पडत नसे.

हीं दुसरीं जहाजें मोठीं असून त्यांच्या मजला दूर दूरच्या. यामुळें किनाऱ्यापासून दुरून म्हणजे मुख्य मोठ्या समुद्रावरूनच त्यांचा मार्ग जाई. पण चुकून केव्हां हीं तरांडीं बंदराकडे वळलीं म्हणजे त्यांची व या भंडारी कोळी लोकांच्या छोट्या तरांड्यांची गांठ पडे. आणि त्यांत या कोळी भंडाऱ्यांना हार खावी लागे. त्यांच्या तरांड्यांवर विळ्या कोयत्या खेरीज हत्यार असावयाचें नाहीं. उलट परदेशी तरांडीं अर्धवट लढाऊ थाटानें नेहमीच सजविलेली असत. त्यावरचे कांहीं लोक निवळ खलाशी तर कांहीं लढाऊ शिपाईहि असत. शिवाय साध्या व्यापारी पेशाचा फिरंगी हा देखील पिस्तुल बंदूक यांचा उपयोग करण्यांत सराईत असे. तेव्हां या मातीच्या भांड्याच्या आणि लोखंडी भांड्याच्या टक्करींत कुणाला हार खावी लागत असेल याची कल्पना सहजच होते.

तात्पर्य कोळी–भंडारी लोक पिढीजात दर्यावर्दी असूनहि त्यांना लढाऊ दृष्टि नव्हती. यामुळें त्यांना स्वतः आरमार सजविण्याचें कधीहि सुचलें नाहीं. हे लोक मराठ्यांपेक्षा कमी शूर होते असे नाही. पण त्यांचा पिढ्यान् पिढ्या जन्म, कोंकणांत जी राजसत्ता जेव्हां प्रबळ असेल तिच्या पंखाखालीं राहून, नेहमीं पडतें घेऊन, जुलूम जबरदस्ती सोसून, काढण्यांत आला. घाटावरच्या मराठ्यांना लढाऊपणाच्या गुणाबरोबर राजकारणी दृष्टीहि होती. म्हणून कोंकणांतील मुसलमानी सत्तेला प्रथम विरोध केला असा मराठ्यांनींच. आणि त्या विरोधांतूनच त्यांना आरमारी सत्ता प्रस्थापित करण्याची दृष्टि उत्पन्न झाली.

घाटावरील डोंगरी किल्ल्याप्रमाणें संरक्षणाची किंवा हल्ला करण्याला बाहेर पडण्याची मुख्य जागा म्हणजे बंदरें व बंदरी किल्ले. आणि यांच्यामधील संचार समुद्रावरून. अर्थात् दर्यावर्दी मनुष्यबळ आधींच सिद्ध होतें. त्याला लढाऊ वळण येणे इतकीच उणीव बाकी होती. ती घाटावरून खाली गेलेल्या मराठ्यांनीं काढून टाकली.

कान्होजीनें जें वैभव मिळविलें त्यांत कोळी–भंडारी हे येतच होते. यांच्यापैकीं कित्येकांच्या डोक्यावरील मासळीचीं शिपतरें जाऊन शिलेदारी

पागोटीं आलीं. त्यांच्या झोपडयांच्या जागीं, ल्हानल्हान कां होईनात, घरें झालीं. बायकांच्या आंगावर चांगलें धडूत व एखादा दागिनाहि दिसूं लागला.

तथापि वैभवाच्या अनुभवानेच वैभवाची आशा वाढते. आणि त्यांतच जातिमत्सराची भर. यामुळें कोळी–भंडाऱ्यांतील कांहीं जातिविद्वेशी लोक कान्होजी आंग्र्याचा द्वेष मनांतून करूं लागले. फिरंग्याना ही गोष्ट हळूहळू कळून येणें स्वाभाविक होतें. आणि ती कळून येतांच त्यांनीं तिचा फायदा घेतला व या जातिद्वेषाला मदत केली.

आंग्रे हे मूळचे वरघाटी मराठे. त्यांचा मूळ गांव पुणें जिल्ह्यांतलि भांगरवाडी. पुण्यापासून सहा मैलांवर मावळच्या बाजूला डोंगरांत हा गांव आहे. या गांवचे संखपाळ आडनांवाचे मराठे तेच आंग्रे म्हणून प्रसिद्धीस आले. आपली जातकुळी वरिष्ठ दर्जाची असें तें मानतात. या घराण्याचा पहिला पुरुष तुकोजी संखपाळ यानें शिवाजीच्या हाताखालीं नोकरी धरलीं, व तो एक कर्ता माणूस असें पाहून त्याला दोनशें शिपायांची असामी देण्यांत आली. सुवर्णदुर्ग येथें त्याची पहिली नेमणूक झाली.

या वेळीं शिवाजीचे युद्ध जंजीऱ्याच्या शिद्दीशीं सुरू होतें, म्हणून शिद्याच्या मुलखापासून ८।१० कोसांवर असलेल्या या आरमारी ठाण्याला महत्व होतें.

तुकोजीचा मुलगा कान्होजी याचा जन्म सुवर्णदुर्ग येथें झाला. यामुळें त्याचें बाळपण कोळी, भंडारी, दालदी वगैरे दर्यावर्दी जातींच्या मुलांच्या संगतींत गेलें. असें सांगतात कीं, सुवर्णदुर्गचा किल्लेदार मोहिते नांवाचा, हा एके वेळीं शिद्याच्या हल्ल्यांना कंटाळून तें ठाणें शिद्याच्या स्वाधीन करण्याच्या विचारांत होता. पण कान्होजीला ही बातमी लागत्याबरोबर त्यानें उचल केली, ठाण्यातलि सैन्याचें अधिपत्य बळकावलें, व ठाण्याला वेढा घालणाऱ्या शिद्याच्या फौजेशीं झुंज आरंभिलें. एका हल्ल्यांत तो पाडाव होऊन शत्रूच्या हातीं लागला. पण मोठ्या हिकमतीनें त्यानें आपली

सुटका करून घेऊन परत किल्ल्याचा तट गांठला, आणि मर्दुमकी करून वेढा घालणाऱ्या सैन्याला पिटाळून लावलें. या त्याच्या पराक्रमामुळें त्याची नेमणूक शिधोजी गुजर, सरसुभे आरमार कोंकण, याच्या हाताखालीं दुय्यम म्हणून करण्यांत आली. आणि शिधोजीच्या मरणानंतर सन १६९८ सालीं त्याला 'सरसुभा' हें पद मिळालें. संभाजीच्या मृत्यूनंतर जवळ जवळ अराजक झालेल्या महाराष्ट्रांतील कोंकणांत कान्होजी यानेंच पुष्कळशीं ठाणीं आवरून धरली. कोंकणांत खुद्द मोंगलांचें असें आरमार फार नव्हतें. पण आपला हस्तक व प्रतिनिधी म्हणून जंजीरेकर शिद्दीचा पाठपुरावा मोंगल करीत. तो एक प्रबल शत्रू दाराशींच होता. म्हणून फिरंग्यांशीं-इंग्रजांशीं युद्धाचें तोंड लागण्याआधीं आंग्र्याचें युद्ध मुख्यतः शिद्दीशीं चाले.

फिरंग्यांना मनांतून शिद्याचा स्नेह व मराठ्यांचें शत्रुत्व करण्याचें प्रथम तरी फारसें कारण नव्हतें. पण मराठ्यांची नाकेबंदी ! आणि त्यांचे परवाने मान्य करावे तर मोंगलाची सत्ता अमान्य केल्यासारखें होते. म्हणून शिद्याचा स्नेह संपादून ते मराठ्यांशीं लढत. पण पुढें मोंगली सत्ता कमी झाली त्याबरोबर फिरंग्यांची दर्यावर्दी हालचाल वाढली. आणि आंग्र्यांच्या अंमलाचा जाच त्यांना होऊं लागला. यामुळें मोंगलाचे शत्रू म्हणून फिरंगी हे पूर्वीं मराठ्यांशीं लढत, ते आतां स्वतःचे शत्रू म्हणून लढूं लागले.

तात्पर्य, लढणें चालूच राहिलें. पण या पन्नास वर्षांच्या काळांत आंग्र्यांच्या घराण्यानें कोंकण पट्टींत समुद्रावर एवढे पराक्रम केले कीं, वर-घाटी मराठ्यांच्या कोणाहि सेनापतींनी केलेल्या पराक्रमाबरोबर त्यांची बरोबरीकरितां येईल. सन १७०० सालीं मुंबईकर इंग्रज लिहितो, "मराठ्यांचें दंडाराजपुरीच्या आसपास आठ हजार घोडेस्वार आणि बारा हजार पायदळ वावरत आहे." १७०२ सालीं कालिकतकडून येणारें एक इंग्रजांचे जहाज कान्होजीने पकडलें. त्यावर सहा इंग्रज कैदी करण्यांत आले.

१७०३ सालीं कान्होजी हा इतका वरचढ झाला होता कीं, तो इंग्रजांना धिक्कारपूर्वक खालील निरोप पाठवूं शकला. " मी इंग्रजावर आज-

वर किती तरी उपकार केले, पण त्यांनीं त्यांची फेड कशी केली हेंहि मी पाहिलें. अशा विश्वासघातकी लोकांना यापुढें कोणचीहि सवलत न देतां खाली कारवारापासून वर मुंबईपर्यंत, कोठेंहि त्यांची जहाजें आढळलीं तरी, त्यांना अडवून तपासणी करण्याचा अधिकार बजावल्याशिवाय मी राहणार नाही. आणि माझा अधिकार जीं गलबतें मानणार नाहींत त्यांना मी पकडून आपल्या बंदरांत नेईन."

१७०७ सालीं 'बॉम्बे' नांवाच्या जहाजाला आंग्र्याच्या आरमारानें दारूनें उडवून जलसमाधी दिली, व तीन वर्षांनंतर 'गोडाल्फिन' नांवाच्या जहाजावर हाच प्रसंग ओढवला होता. सन १७१२ सालीं 'ॲन' या नावाचें इंग्रजांचें लढाऊ गलबत कारवारकडून येत होतें तें आंग्र्यानें पकडलें. तशींच आणखी इतर एकदोन.

ताराबाई व शाहू यांच्या कलहामुळें कोकणांतील आरमाराला बेबंदशाहीचें वळण लागण्याचा संभव आला होता. कान्होजीनें शाहूचा सेनापति बहिरोपंत याचा राजमाचीजवळ पराभव करून त्याला कैद केलें, आणि पुण्यावर चालून येण्याचा धाक घातला. परन्तु बाळाजी विश्वनाथ सेनाकर्ते यांने सन १७१४ सालीं कान्होजीची समजूत पाडली व त्याला शाहूच्या पक्षास मिळवून घेतलें. आरमाराचा मुख्याधिकार पूर्वीप्रमाणें त्याजकडेच सोपविला. आणि कोकणांतील २६ किल्ले व तटबंदीचीं ठिकाणें त्याच्या स्वाधीन केलीं.

पेशवे व आंग्रे एक झाल्यावर शिद्दी थोडा नरम आला. आणि आपल्या आरमारी राज्याच्या पाठीमागें म्हणजे देशावर शाहू राजाचें पाठबळ मिळाल्यामुळे कान्होजीची प्रबळता वाढली. पुढें त्यानें इंग्रजाशींहि बोलणें करून, मुंबईच्या उत्तरेस माहीम व दाक्षिणेस खांदेरी यांच्या दरम्यान मुंबई बंदराकडे येणारीं जहाजें तपासण्याचा हक्क सोडून दिला.त्यांना व्यापार खुला केला. मात्र मामुली बंदरी जकात कायम ठेवली. पेशव्याकडून इंग्रजांना उपद्रव होऊं नये अशी हमीहि कान्होजीने इंग्रजांना दिली. आणि इतर परकी राष्ट्रांची

अशीच हमी आपल्या आरमारांकरितां त्यानें इंग्रजांकडून घेवविली. बाहे-रचा असा बंदोबस्त झाल्यावर अलीबाग, खांदेरी, आणि विजयदुर्ग यांचा उत्तम बंदोबस्त करून कान्होजीनें कोकण पट्टीतील लहान लहान खाड्या, खाऱ्यागोड्या नद्या, या सर्वांवर लहान लहान गढ्या बांधून त्या लढ-विण्याची व्यवस्था केली. त्याच्या कांहीं मोठ्या गलबतांवर ३०।४० पर्यंत तोफा असत.

१७१५ पासून त्याचा व इंग्रजांचा स्नेह टिकला नाहीं. इंग्रजानीं आपलें आरमार वाढवून प्रबळ करण्याला प्रारंभ केला. यामुळें मुंबईकडील तरांड्यावर कान्होजीनें पुन्हा हल्ले सुरू केले. ' सक्सेस, ' ' रॉबर्ट ' आणि ' ऑटर ' या जहाजांवर इंग्रज कंपनीचा माल होता तरी, मुळांत तीं जहाजें परराष्ट्रीय मालकीचीं होतीं या सबबीवर कान्होजीनें ती पकडलीं. १७१८ सालीं उघड युद्धच सुरू झालें. त्यांत इंग्रजांनीं मुख्य हल्ला विजयदुर्गावर केला. परंतु त्यांत त्यांना अपयश आलें, व कप्तान गार्डन हा जखमी झाला. पण पावसाळा संपल्यावर इंग्रज आरमार खांदेरीशीं आलें. आंग्र्यांचें आरमार नागोठणास होतें. मॅन्युएल दी कॅस्मो नांवाचा एक फिरंगी आंग्र्यांच्या नोकरींत होता त्यांला लांच देऊन इंग्रजांनी फितूर केला, व त्याच्या साहाय्यानें आणि माहितीनें खान्देरीची नाकेबंदी चाल-विली. पण रात्रीं अंधारांत इंग्रज आरमाराचा डोळा चुकवून, वेढ्यांत सांपडलेल्या लोकांना आंग्र्यांच्या तरांड्यांनी दारुगोळा व कुमक पोचविली. यामुळें इंग्रजांना वेढा उठवून जावें लागलें. कारण आंग्र्यानें विजयदुर्गाहून वेगळें आरमार मुंबईकडे पाठविण्याचा धाक घातला.

फिरून १७१९ सालीं इंग्रज आरमारानें विजयदुर्गावर स्वारी केली. त्यानें बंदराच्या तोंडाचीं कांहीं तरांडीं अडविलीं बुडविलीं, पण जमिनीच्या बाजूनें कांहीं लाग न चालल्यामुळें विजयदुर्गच्या किल्ल्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं. तेव्हां इंग्रज आरमाराला परत फिरावें लागलें. त्यानें येतां येतां वाटेंत देवगडच्या किल्ल्यावर चार गोळे टाकले. पण पुढें कांहीं चाचे लोकांच्या हल्ल्यांत सांपडून या आरमाराची नासधुस झाली.

अशा रीतीनें विजयदुर्गावरील हा इंग्रजांचा दुसरा हल्ला फुकट गेला. उलट आंग्र्यांनें मुंबईवर हल्ला करण्याचा धाक घातला. पुढील तयारींत इंग्रजांनीं गोवेकरांची मदत घेतली आणि आपला कमीपणा भरून काढला. उभयतांनीं मिळून १७२१ सालीं अलिबागेवर स्वारी केली. आणि ही स्वारी यशस्वी झाल्यास पोर्तुगीजांनीं कुलाबा घ्यावा व इंग्रजांनीं विजयदुर्ग म्हणजे घेरिया घेरावा असें ठरलें.

चौल बंदरांत इंग्रज व पोर्तुगीज हे एकत्र झाले. संयुक्त फौज सहा हजारांची झाली. पण ही फौज चौलच्या बंदरांत उतरून खुष्कीच्या मार्गानें अलिबागेवर जाणार त्या मार्गांत फिरून कुंडलिका नदी व दलदली लागतात. या पार होण्याला व यांतून तोफखाना काढून नेण्याला शत्रूला कांहीं दिवस लागले. एवढ्यांत आंग्र्यांच्या विनंतीवरून शाहूनें पिलाजी जाधव आणि बाजीराव यांना फौजेसह घाटाखालीं पाठविलें. पुढील युद्धांत पोर्तुगीजांची दाणादाण झाली. इंग्रज व पोर्तुगीज भांडले. इंग्रज कप्ताननें पोर्तुगीज कप्तानावर तलवार उगारली! शेवटीं बाजरिावाच्या मध्यस्थीनें तह होऊन शत्रूसैन्य परत गेलें. १७२४ सालीं कान्होजी व इंग्रज यांच्यांत तहाचीं बोलणीं सुरू झालीं. त्यांतून फारसें निष्पन्न झालें नाहीं.

इकडे कान्होजीचें बस्तान शाहूजवळ इतकें बसलें कीं, त्यानें शाहूला अधिराजा म्हणून मान्य करावें आणि मग कोकणचें राज्य जणु काही खासगी समजून त्याची त्यानें व्यवस्था हवी तशी लावावी, असा करार दोघांत झाला. यामुळें कोकण पट्टीचें राज्य हें कान्होजीच्या कारकीर्दीत ‘ आंग्र्यांचें राज्य ’ होतें असें म्हणतां येईल.

कान्होजी आंग्र्याला ‘चांचा’ असें दूषणास्पद नांव इंग्रजांनीं दिलें होतें. पण त्या दृष्टीनें इंग्रज काय किंवा इतर फिरंगी हे सर्व चांचेच होते. कान्होजीनें चोरटा व्यवहार कधींच केला नाहीं. तो उघडपणें आपला दर्यावर्दीपणाचा हक्क सांगे. नियमपद्धतीनें जकाती बसवी व वसूल करी.

त्याचें दस्तक घेणाऱ्या व्यापारी गलबतांना तो संरक्षण देई व न घेणारांना पकडून शिक्षा करी. निवळ चोरटा व्यापार त्यानें चालू दिला नाहीं. गलबतास गलबत भिडवून लढाया दिल्या, आणि संभावितीनें करार करून तेहि पाळले. फिरंग्या इंग्रजांच्या मानानें तो किती प्रबळ व यशस्वी होता हें दाखविण्याकरीतां आम्ही या खालीं कान्होजीनें जिंकलेल्या लढायांची यादीच देत आहों.—

स. १६८५—कान्होजी आंग्रे प्रथम आरमार घेऊन हिंडूं लागला.

स. १६८९—कान्होजीनें सागरगड व राजकोट येथें शिद्दयाचा पराभव केला.

स. १६९१—सागर गड, राजकोट, उंदेरी इत्यादी ठिकाणीं शिद्दी याजबरोबर कान्होजीचा दुतर्फी अंमल सुरू झाला.

स. १६९५—विजयदुर्ग ते कुलाबा येथपर्यंतच्या बंदरांची मालकी कान्होजीस मिळाली व त्यानें कांहीं विलायती जहाजें लुटलीं.

स. १६९६—कान्होजीनें मोंगलाकडून सागरगड घेतला.

स. १६९८ कोंकण पट्टीचे सर्व किल्ले मोंगलाकडून घेतले.

स. १६९९—मोगल, सिद्दी व पोर्तुगीज या संयुक्त सैन्याचा पराभव केला.

स. १७०६—कान्होजीनें डच, पोर्तुगीज व इंग्रज यांचीं अनेक जहाजे पकडलीं. इंग्रजांच्या ' डायमंड ' जहाजावर १२ तोफा होत्या.

स. १७१०—इंग्रज व कान्होजी यांची आरमारी लढाई.

स. १७१२—गव्हर्नर बून यांचें जहाज पकडलें. कारवारचा इंग्रज अंमलदार ठार केला. त्याची बायको व तीस इंग्रज कैद केले.

स. १७१९—कान्होजीने इंग्रज बूनचा पराभव केला व ' स्टॅन होप ' हें जहाज पकडले. खांदेरीचा हल्ला परतविला. रसेल व टस्टील इंग्रज ठार झाले.

स. १७२०—कान्होजीनें इंग्रजांचें ' शार्लट ' हें जहाज पकडून विजयदुर्गाला नेलें.

सन १७२०—सुरतच्या आखातांत इंग्रज वखारवाल्यांची कांहीं जहाजें पकडलीं व कॅप्टन बेंल्टचे गलबत दाभोळच्या दक्षिणेस पकडलें.

सन १७२१—वसईजवळ आंग्रे व इंग्रज यांची लढाई.

स. १७२२—व्हिक्टोरिया व रिव्हेंज या जहाजांनी आंग्र्यांवर स्वारी केली व त्यांचे एक जहाज, एक सुभेदार, व ९० लोक पकडले. पण याच वर्षी कॅप्टन लो यानें कुलाब्यावर स्वारी केली. त्यांत त्याचा पराभव झाला.

स. १७२३—पोर्तुगीज व इंग्रज यांनीं मिळून कुलाब्यावर हल्ला केला. पण त्यांचा पराभव झाला.

स. १७२४–कान्होजीनें मुंबईचा एक श्रीमंत इंग्रज व्यापारी कैद केला.

सन. १७२४–डच लोकांनीं विजयदुर्गावर हल्ला केला तो कान्होजीनें परतविला.

स. १७२७–कान्होजीने डर्बी हें इंग्रजांचें जहाज लुटलें. तशीच इतर व्यापारी गलबतें लुटली.

स. १७२८–कान्होजी व इंग्रज यांचा तह. पूर्वी इंग्रजांनीं आंग्र्यांचीं गलबतें घेतलीं होतीं तीं परत केलीं.

स. १७२९–कान्होजीनें इंग्रजांचें 'किंग वुईल्यम्' हें जहाज घेतलें आणि कॅप्टन मॅकलीन् व इतर कांहीं इंग्रज यांस कैद केलें.

चाचेगिरीची मीमांसा अशी. जगांतील सगळया ऐश्वर्याचा उगम अन्यायांत आढळतो असें एका मर्मज्ञ तत्त्ववेत्त्यानें एके ठिकाणीं म्हटलें आहे तें अगदींच कांहीं खोटें नाही. लोभबुद्धि ही मोठी दुर्निवार असते. आणि तिचें समाधान न्यायबुद्धीने कधींच होऊं शकत नाहीं. कारण न्यायबुद्धि ही मर्यादा घालणारी आहे. आणि मनुष्याचा लोभ तर अमर्याद. यामुळें न्याय किंवा अन्याय हें कांहीं न पाहतां मनुष्यमात्र हा शक्य त्या साधनानी आपली लोभबुद्धी तृप्त करून घेतो. आणि या साधनापैकीं प्रमुख म्हटलें म्हणजे आपल्या बुद्धीची

'क्षणता व मनगटांतील जोर. पण या मनगटाच्या जोरावर आपणाला झालेला अन्यायहि मनुष्य भरून काढतो, व तेव्हां त्या जोराचा उपयोग समर्थनीय ठरतो.

निस्वार्थीपणानें केलेल्या मनगटाच्या जोराच्या उपयोगापेक्षां स्वार्थी-पणानें केलेलाच तो जगांत अधिक आढळेल. त्याकरितां शिक्षा भोगावयास लावणारी कोणी एखादी प्रबळ शक्ति असली तरच तो गुन्हा ठरतो. एरवी त्याला अनीतिच्या सदरांत घालणारा फारसा भेटत नाहीं. आणि विशेष परिस्थितींत हा जोर दिसून आला तर त्याला पराक्रमाचें नांवही प्राप्त होतें.

ज्याला चांचेगिरी असे म्हणतात तो वास्तविक गुन्हा आहे. कारण जशी जमिनीवरील साधी किंवा जबरी चोरी तशीच ती पाण्यावरहि होतच असते, पण जमिनीवरील चोरी, वाटमारी, दरोडा, याना जी अद्भुत रम्यता प्राप्त होत नाहीं, ती पाण्यावरील या प्रकाराना लाभलेली आहे. आणि चोरीच्या-ऐवजीं चांचेगिरी हा स्वतंत्र शब्दच त्याला झाला आहे.

समुद्रावरील व्यापार व मालाची वाहतुक ही जितकी जुनी तितकीच जग-भर चांचेगिरीहि जुनी आहे. एका दृष्टीनें पाण्यावरील वाटमारीला संधी कमी; पण समुद्रावरील कोणत्याहि प्रकारच्या जीवनांत जसा धोका अधिक तशीच ती वाटमारी उमगण्याचीं साधनेहि थोडी असतात. दर्यावर्दी वाहनवाला खलाशी हा साध्या गाडीवानापेक्षां अधिक कल्पनारम्य असतो. खलाशाच्या संचाराची चपलता, त्याच्या लपण्याच्या, दडण्याच्या जागा, या सर्वच चित्ताकर्षक असतात. यामुळें चांचेगिरीला म्हणजे समुद्रावरील वाटमारीला पुरातन काळापासून एक प्रकारचा चटकदारपणा चिकटला आहे. जमि-नीवर चोर आढळला तर त्याला देहान्तशासन देतां येतनाहीं. पण अफाट समुद्रावर कायद्यानेंहि सर्वस्वी अराजकच सिद्ध असल्यामुळें, चांचे लोकांना देखत प्रसंग मारल्यास तो गुन्हा होत नसे. किनाऱ्यालगत होणारी वाट-मारीही भुरटें तरांडें किंवाएकटा—दुकटा खलाशी करूं शकेल. पण दर्यावर

होणारी ही वाटमारी संघशक्तीवरच करावी लागे. यामुळें समुद्रावरील चांचेगिरी हा एक संघटित स्वरूपाचा धंदाच होऊन बसला.

पूर्वीच्या एखाद्या युगांत, म्हणजे हिंदी खलाशी दर्यावर्दी मोठमोठीं गलबतें घेऊन दूरवर पूर्व समुद्रांत व पश्चिम समुद्रांत वावरत होतीं त्या वेळीं, चांचेगिरीचा दोष त्याना कितपत जडला गेला असेल माहित नाहीं. पण तीनशें वर्षांपूर्वीच्या ज्या काळाविषयींचा कथाभाग या कादंबरीत आहे, त्या वेळीं कोकण किनाऱ्यालगत होणारी वाटमारी संघशक्तीची नव्हती व मोठ्या प्रमाणावरहि नव्हती. भुरटी चोरी ही कोठेंहि असावयाचीच. पण या काळांत गाजलेले खरे चांचे लोक जगाच्या इतर भागांत होते. आणि त्याचें कारणही हेंच कीं, या इतर देशांतील लोकांनीं आपली समुद्रयानाची विद्या हिंदुस्थानाप्रमाणें बुडूं दिली नव्हती, तर उलट ते ती वृद्धिंगत करीत होते.

सतराव्या शतकांत कोणी कोंकणी खलाशी अरबस्थानापर्यंतहि गेल्याचा उल्लेख आढळत नाहीं. पण याच वेळीं ६।७ हजार मैलांचा प्रवास करून येणारे, व्यापारी ( ज्यांना आपण गोरे फिरंगी हें एकच नांव सोयीकरितां देऊं, ) असे खलाशी, कोंकण समुद्रावर अनिरुद्ध संचार करीत होते. कोलंबसानें नवें जग हुडकून काढलें हें खरें. पण महत्वाकांक्षी, धाडसी, अशा युरोपियन खलाशी वर्गाचा तो एक नमुनेदार प्रतिनिधी होता. इतकेंच काय तें ! कारण लोभबुद्धि राष्ट्रगत असो किंवा व्यक्तिगत असो, ती या युरोपियन देशांत त्या वेळीं नव्या उफाळ्यानें बाहेर पडली होती.

पण या लोभबुद्धीइतकीच अनिवार त्यांची मर्दुमकी व धाडसी वृत्ती होती हेंहि कबूल करावें लागतें. लोभबुद्धीचें फळ प्राण पणाला लावण्या-शिवाय पदरांत कसे पडेल? 'साहसे श्रीः प्रतिवसति' हें वाक्य खरेंच आहे. या धाडसी दर्यावर्दी लोकांत व्यापारी बुद्धीप्रमाणें राष्ट्रीयहित बुद्धीहि होती. आणि युरोपियन चांचेलोकांनीं मिळविलेल्या लुटीचा फायदा जसा त्यांना व्यक्तिशः झाला तसाच, त्यांनीं घालून दिलेल्या प्रथेचा उपयोग त्यांच्या राष्ट्रांना झाला ही गोष्ट क्रमप्राप्तच होती.

पकडला गेला तो चोर, न पकडला गेलेला साव, ही जगाची रीतच आहे. पण स्वतः पकडल्या गेलेल्या लोकांनीं स्वतःला साव म्हणावें आणि पकडणाराला चोर म्हणावें या गोष्टींत मात्र अस्सल झोंडपणा दिसून येतो. आरबी समुद्रांत सतराव्या शतकांत धिंगाणा घालणाऱ्या युरोपियन चांचे लोकांनीं, चोराच्या उलट्या बोंबा या न्यायानें, कोंकणपट्टीच्या धाडशी दर्यावर्दी लोकांना चांचे म्हणण्याचा प्रघात ठेवला होता !

युरोपियन लोकांनीं या कोकणी लोकांबद्दल लिहिलें तें तेवढेंच लक्षांत घेतां आज असें भासतें कीं, या बाबतींत आमचे कोंकणी लोकच तेवढे गुन्हेगार होते. पण सुदैवानें त्या वेळच्या युरोपियन चांचेगिरीविषयीं स्वतंत्र ग्रंथ लिहिलेले उपलब्ध आहेत. त्यावरून आज कोणाला कल्पनाहि येणार नाहीं इतक्या प्रचंड प्रमाणावर व संघटीत रीतीनें युरोपियन चांचेगिरी चालू असे. सतराव्या शतकांत इंग्रज चांचेगार इतके पुंड झाले होते कीं, त्यांना प्रतिस्पर्धी थोडे आणि सरकारी कायद्याचें भय तर मुळींच नाहीं अशी स्थिती होती. इतरांहि कांहीं तसेच. चांचे लोकांची एक प्रकारचीं राष्ट्रेंच बनलीं होतीं, व त्या राष्ट्रांतून रीतसर युद्धें व तह होत असत. आणि राष्ट्रसंघाचाहि प्रकार होता ! खरें बोलावयाचें तर खलाशी हा सामान्यतः सैतानपुत्र समजला गेला असला तरी या धंद्यांत कांहीं पापात्मे होते तसे पुण्यात्मेहि आढळले.

असो. प्रत्येक युगाला नवी नीति जन्माला येते. सोळाव्या सतराव्या शतकांतले कोंकणी दर्यावर्दी लोक फिरंग्याइतके शूर पण त्यांच्याहून कमी दुष्ट होते येवढें खास.

मला कोकणचें प्रेम आहे. मी दर्यावर्दी लोकांचें कौतुक करणारा आहे. स्वावलंबन हाच लौकिक उत्कर्षाचा पाया हा माझा दृढ विश्वास आहे. या तीनहि भावना प्रगट होण्याचें एक साधन म्हणून प्रस्तुतची कादंबरी लिहिण्यास घेतली ती कोकणांतील एका मुक्कामांतच !

—न. चिं. केळकर.

# कोकणचा पोर

## प्रकरण पहिलें

## बैराग्यानें सांगितलेली हकीकत

माझा जन्म कोठें झाला किंवा माझे आईबाप कोण होते याची मला आठवणच नाहीं. म्हणून एका अर्थानें मी देवाघरचें लेकरूं असें म्हणण्यास हरकत नाहीं. मला समजूं लागलें, आणि माझ्या बरोबरच्या मुलांना आईबाप असतात असें मी पाहिलें, तेव्हां मलाही ते असलेच पाहिजेत, असें मला वाटलें. बापाप्रमाणें मजवर प्रेम करून माझें पालन पोषण करणारा पुरुष मनुष्य मला ' चेला ' म्हणून हाक मारी. लोक त्याला ' बुवाजी ' म्हणत तसें मीहि म्हणे. ' बुवाजी ' म्हणजे बैरागी. त्याला घरदार असत नाहीं. आणि जो कोणा दुसऱ्याला चेला म्हणून हाक मारतो तो स्वतः त्या दुसऱ्याचा गुरु असतो. हा संबंध पुढें लवकरच माझ्या लक्षांत आला. बापाचें प्रेम मला माहीत नव्हतें पण माझा गुरु जें प्रेम मजवर करी त्याहून कोणा मुलाचा बापहि अधिक करणें शक्य नाहीं अशी माझी खात्री होती. मला आई म्हणूनही कोणी असावी, व तिच्या प्रेमळपणाचा अनुभव इतर मुलांप्रमाणें मलाहि मिळावा, अशी मनाला केव्हां केव्हां इच्छा होई. पण माझी जी कोणी आई

असेल ती मला भेटण्याचा संभव कोठला ? मला आईचें सुख मिळावें म्हणून माझे गुरुजी थोडेच ब्रह्मचर्य व्रत सोडणार होते ? आणि समजा मजकरितां ते लग्न करण्याला तयार झाले असते, तरी माझी ही नवी आई बोलून चालून उसनी. सावत्रहि नव्हे ! पण मला आई मिळावी म्हणून गुरुजींनीं लग्न करावें हा विचार माझ्या मनांत खरोखर कधीं आलाच नाहीं. त्यांची ती तपस्या पाहूनच, मी लहान होतों, तरी माझ्या मनावर ब्रह्मचर्य व्रताचा परिणाम झाला.

मोठा झाल्यावर, मी तशी इच्छा दर्शविली असती तर, बुवाजींनीं मला लग्न करून गृहस्थाश्रम स्वीकारण्याची परवानगी आनंदानें दिलीं असती. पण बुवाजींचे उदाहरण पाहून मीहि आपल्या चेलेपणाला जागावें, म्हणजे ब्रह्मचर्य व्रताची परंपरा राखावी, आणि गुरुजीप्रमाणेंच मी स्वतःहि जगाच्या कल्याणार्थ पुण्यसंचय करावा, अशीच मनीषा धरली. माझ्या वयाच्या बत्तीसाव्या वर्षापर्यंत मी गुरुजीबरोबर बहुतेक सर्व यात्रा एक एकदां केल्या. माझें बत्तिसावें वर्ष संपण्याचे दिवशींच माझ्या गुरुजींनीं समाधी लावून परलोकवास केला.

गुरुजी परलोकवासी झाल्यानें त्यांचें स्थान मला प्राप्त झालें. पण त्यामुळें मी जो त्यांचा चेला त्याचें स्थान रिकामें झालें !

आम्ही दोघेही ब्रह्मचारीच. माझी गुरुभक्ती आणि बुवाजींचें शिष्य-प्रेम हीं इतकीं गहन होती कीं सर्व जग व जगांतलें सर्व प्रेम आम्हां दोघांमध्येंच सांठविले आहे असें आम्हांला वाटे. गुरुजी निवर्तले तेव्हां मी पुरा बत्तीस वर्षांचा होतो तरी मी पोरका झाल्यासारखें मला वाटूं लागलें. माझी ही दुःखद भावना नाहींशी होण्याला सोईचा असा एकच मार्ग होता. तो म्हणजे मी स्वतःच ' गुरू ' व्हावें आणि माझ्या जागीं एकादा ' चेला ' निर्माण करावा ! पण तो निर्माण व्हावा कसा ? मला गुरू करणारा कोणीहि मनुष्य आजपर्यंत भेटला नाहीं. बरें. लोकसमाजाकडे पाहावें तर, भरल्या संसारांतले कोण आईबाप आपला मुलगा मला चेला

म्हणून अर्पण करणार ? मग चेला मिळण्याची माझी वासना तृप्त होण्याकरितां मी काय एकाद्याचे मूल चोरूं कीं काय ? नाहीं. ती गोष्ट माझ्या हातून कधींही घडली नसती.

पण कदाचित ईश्वराला काळजी म्हणून त्यानें थोड्याच काळांत एक लहान मुलगा अशा बिनतोड रीतीनें माझ्या स्वाधीन केला कीं, मला चेला करण्याकरितां नसते तरी एरव्हींही त्याचें पालन करणें माझें कर्तव्य झालें असतें. आणि ईश्वराघरचा न्याय असा कीं, जें कर्तव्य मी निःस्वार्थी पणें केलें त्यांतच चेला हवा होता तो मिळण्याचा माझा स्वार्थ सहजासहजीं साधला. तो प्रकार असा—

२

गुरूजी निवर्तल्यावर पुढच्याच महिन्यांत 'अर्धोदय' महापर्व आलें. संधि साधून मी कोंकणच्या पश्चिम समुद्रावरील देवगड जवळच्या कुणकेश्वरच्या यात्रेला गेलों. या देवस्थानचा इतिहास अद्भुत असल्याचें माझ्या ऐकिवांत होतें.तो इतिहास असा. फार वर्षांपूर्वी कोणी एक श्रीमंत मुसल्मान व्यापारी आपलें जहाज घेऊन समुद्रावरून जात असतां,हल्लीं कुणकेश्वर ज्या डोंगरावर आहे त्याच्यासमोर, तें जहाज अवचित वादळांत सांपडून फुटण्याच्या बुडण्याच्या बेताला आलें. मनुष्य संकटांत सांपडला म्हणजे मनानें तो दुबळा होतो. आणि ज्या उपायांची निंदा एरव्हीं त्यानें ताठर मनानें व तुच्छ बुद्धीनें केली असती तेच उपाय तो आपल्या बचावाकरितां करण्याला तयार होतो. या मुसल्मान व्यापाऱ्यानें मक्का मदिनाची यात्रा केल्यामुळें त्याला ' हाजी ' हें उपपद लाभलें होतें. तथापि या संकटसमयीं त्याला हिंदूच्या देवाचा धावा करावा लागला.

जहाजावर लाटा आदळत आहेत, वारा जोराचा सुटला आहे, पुढें उभे खडक दिसत आहेत, त्या खडकांवर फुटणाऱ्या लाटा आभाळांत उंच उसळत आहेत, अशा आणी बाणीच्या वेळीं त्या व्यापाऱ्याला एका हिंदु नावाड्यानें सहज असें सुचविलें कीं, " समोरच

दिसणाऱ्या कुणकेश्वराचे डोंगरावर हिंदूंचें एक जागृत देवस्थान आहे; त्याला यावेळीं कांहीं नवस करून पहा." लगेच त्यानें नवस केला कीं, "मी या संकटांतून सुखरूप बाहेर पडलों तर, हे हिंदूच्या देवा ! तुझ्या या डोंगरावर मी देऊळ म्हणजे कायमचें निवासस्थान बांधून देईन." असें म्हणून जवळच असलेल्या, आंत बाहेर कल्हई केलेल्या, लोट्याच्या तोटींतून त्यानें आपल्या डाव्या हातानें उजव्या हातावर उदक सोडलें. आणि ईश्वराची लीला किंवा योगायोग किंवा बोलाफुलाची गांठ, काय वाटेल तें म्हणा, पण या नवसाचा उच्चार झाल्यावर फार थोड्या वेळांत वाऱ्याच्या जोरावरच तें जहाज खडकाकडे न जातां डोंगराच्या पोटांत गेलेल्या एका वाळूच्या दांड्याकडे गेलें. निवाऱ्याचा कोपरा आणि मऊ वाळूचा आधार अशी दुहेरी मदत झाल्यामुळें जहाज वाळूंत शिरून रुतलें.

पण लवकरच वादळ थांबलें,समुद्राची भरती ओसरली,आणि वाळूंत रुतलेल्या त्या जहाजांतून खालीं उतरून, आपला सर्व माल सुरक्षित काढून घेऊन, त्या व्यापाऱ्याला किनारा गांठतां आला. तेव्हां श्रद्धाळू मनाच्या उल्हासानें, येथेंच आतां आपली मक्का व मदीना असें समजून तो अनवाणी वर चढून कुणकेश्वराच्या डोंगरावर गेला. त्यानें गुडघे टेकून देवाची प्रार्थना केली. आणि पुढें बांधून होणाऱ्या भव्य देवालयाचा पाया घातला. मुसलमानाच्याहि नवसाला पावल्यामुळें हिंदूंची या देवस्थानाविषयींची भक्ति द्विगुणित झाली. हळुहळू तें देवस्थान कोंकण पट्टींतल्या देवस्थानांपैकीं एक प्रमुख होऊन बसलें. आणि तेथें यात्रेवर यात्रा लोटूं लागली.

हा वृत्तांत ऐकलेला लक्षांत असल्यामुळें मी सहज या 'अर्धोदय' पर्वाच्या प्रसंगीं 'कुणकेश्वरच्या' यात्रेला व समुद्रस्नानाला गेलों. आज या देवाच्या वार्षिक उत्साहाचा दिवस नव्हता. तथापि अशा दुर्मिळ पर्वामुळें समुद्र स्नानाकरितां वार्षिक यात्रेहूनहि अधिक गर्दी लोटली होती. मी स्नान करून,देवदर्शन घेऊन,देवळाच्या मागच्या अंगाला भाविक लोकांची ती गर्दी, व या ठिकाणीं दिसणारी समुद्र किनाऱ्याची वाळवंटाची विशेष

प्रकारची शोभा पहात बसलों. मला उपोषण असल्यामुळें सर्व दिवसभर मी पोथी पुस्तक वाचून व जपजाप्य करून काळ घालविला. तिसरे प्रहरीं यात्रेकरूंची गर्दी पूर्णपणें ओसरली व समुद्राचें वाळवंट मोकळें झाले हें पाहून सहज त्यावर चार फेऱ्या माराव्या या हेतूनें खालीं दर्याकिनाऱ्यावर गेलों. तों काय चमत्कार सांगावा ?

एक तीन वर्षांचें मूल, अगदीं एकटें एक, असें वाळवंटाच्या एका कोपऱ्यांत रडत बसलेलें होतें. सहजच माझें लक्ष त्याकडे वेधलें. म्हणून मी त्याचेजवळ जाऊन प्रथम कांहीं वेळ निश्चल उभा राहिलों. त्याच्याशीं बोललों नाहीं. कारण तें मूल " आई ये किं ग. अजून नाहीं का झाली तुझी अंघोळ ? " हे शब्द, लहान मुलांच्या रीतीप्रमाणें, पुनः पुनः उच्चारीत होतें. यामुळें खरोखरच त्याची आई कोठें जवळपास असावी, व ती आतां नाहीं तर क्षणभरानें तरी येईल असें वाटून मी त्या मुलाप्रमाणेंच तिची मार्ग प्रतिक्षा करीत बसलों.

पण क्षणाक्षणानें बराच वेळ गेला तरी त्याची आई येण्याचें चिन्ह दिसेना. आणि मग माझ्या ध्यानांत आलें कीं, हें मूल याप्रमाणें आपल्या आईला बराच वेळ हाका मारीत असावें. कारण तें थकून जाऊन त्याला ग्लानी येत चालली होती, व घशाला कोरड पडल्याप्रमाणें त्याचे ते बोबडे शब्द ओढत ओढतच तोंडांतून बाहेर पडत होते. तेव्हां स्वतःची पुरी खात्री करून घेण्याकरितां मी वाळवंटावर इकडे तिकडे पुष्कळ हिंडून पाहिलें. पण स्नानानंतर नेसण्याकरितां धाबळींत गुंडाळून ठेवलेलें एक वस्त्र व त्या जवळ एक राजापुरी तांब्या या शिवाय दुसरे कांहींच चिन्ह आढळेना.

मग आपोआप नसत्या नसत्या भयंकर कल्पना माझ्या मनांत येऊं लागल्या. बाई खरीच समुद्र स्नानाला गेली असेल का ? किंवा जिवाला कंटाळून गेल्यामुळें कडेवरील मूल वाळवंटावर ठेवून, 'अर्धोदय' पर्व हींच आत्मघाताची उत्तम पर्वणि मानून जाणून बुजून आपला देह तिनें समुद्राला अर्पण केला असेल कां? पण माझ्या प्रश्नांना उत्तर देणार कोण? तेव्हां मग मुलाशीं

बोलल्याशिवाय माझ्यानें राहवेना. प्रथम माझा बैराग्याचा वेष पाहून तें मूल भिऊन ओरडतें कीं काय अशी भीति मला वाटली. पण रडून रडून तें इतकें निर्बल झालें होतें कीं माझी भीति वाटली असती तरी त्याच्यानें ओरडवले नसतें. मग हळूच उचलून मीं त्याला खांद्याशीं घेतलें. आणि पाठीवरून हात फिरवून त्याला समजतील असे लहान लहान प्रश्न केले. पण तें जें उत्तर देई तें एकेरी व ठरावीक असें होतें. तें म्हणें " आई केव्हांचीं आंघोळ करायला पाण्यांत गेली. अजुन येतच नाहीं कशी ती !'

त्या दिवशीं ईश्वराच्या साक्षीनें माझ्या शंकाचें उत्तर मला मिळालें. उरला एकच उपाय म्हणून मुलाला खांद्यावर घेऊन मी वर देवळाशीं गेलों जातांना बरोबर तें धाबळीचें गाठोडें व तांब्या घेतला. आशा वाटली कीं या खुणांवरून कदाचित् मुलाच्या आईचा शोध लागेल. ती बाई परत येईल ही आशा बहुधा व्यर्थच होती. पण निदान मुलाच्या घरचा ठाव ठिकाणा कळला तरी निम्में काम होईल ! मग देवळांत जाऊन मुलगा पुढें धरून, गाठोडें व तांब्या दाखवून,झाली हकीगत सांगून मी ज्याच्या त्याच्या जवळ शोध केला. तरीहि कांहींच पत्ता लागेना. समुद्र स्नानाला यात्रेकरूंची गर्दी भराभर जमलीं तशीच ती भराभर ओसरली. कारण स्नानाशिवाय तेथें दुसरें कांहींच धर्मकृत्य त्यादिवशी व्हावयाचें नव्हतें.

शेवटीं त्या मुलाला घेऊन देवापुढें जाऊन बसलों. तेव्हां भावनेचा खेळ म्हणा कांहीं म्हणा, मला तेथें माझे गुरुजी एकदम दिसल्याचा भास झाला, व त्या भासांतच मी शब्द ऐकले कीं, " मी गेलों, आतां तूं गुरू झालास. तुला चेला पाहिजे होता ना ? हा घे ईश्वरानेंच तुला दिला. त्याचें जतन कर. त्याचा भाग्योदय होईल. " माझा आभास ओसरतांच मीं आनंदाच्या आवेगांत उठलों. आणि " चल बाळ. तूं आतां माझा चेला म्हणजे मुलगाच झालास " असें म्हणून मुलाला घेऊन देवळांतून बाहेर पडलों.

## ३

माझ्यापेक्षां माझा चेला दैववान खरा. मला आईबापांची आठवणही नव्हती. या मुलाला आईची आठवण तरी आहे! मी माझ्या गुरूला विचारली नाहीं,व त्यानेंही कधीं मला सांगितली नाहीं, अशी एकच गोष्ट होती. ती म्हणजे "मी कोणाचा कोण व मी माझ्या गुरूला कसा लाभलो?" पण आजच्या अनुभवानें असा तर्क केला कीं,माझे गुरुजीहि मुलें पळवून नेणाऱ्या गोसाव्यांपैकीं नव्हते. तेव्हां न जाणों आजच्या सारखेंच कांहीं अकल्पित प्रसंगानें ईश्वरानें मला त्यांचे पदरीं घातलें असेल. वाटलें कीं, आम्ही बैरागी लोक ब्रह्मचारी बनून जगाच्या जिवावर उठलों. म्हणून गुरुजीवर व माझ्यावर आलेल्या या अद्भुत प्रसंगांनीं गुरुशिष्य परंपरा तर राखलीच, पण त्या जगानें न जाणों आम्हावर चांगलाच सूड घेतला. कारण जगांत मनुष्य संसार टाकील. पण माया ममता या भावना ब्रह्मचारी बैरागी यांनाहि सोडीत नाहींत!

वरील प्रकार घडण्यापूर्वी मनांत असा विचार घोळत होता कीं, या मुलाच्या इतर आप्तांचा शोध करून,तो त्यांच्यापैकीं कोणाच्या तरी स्वाधीन करावा व त्याकरितां लागल्यास चार दिवस आणखी मुक्काम करावा. आसपास हिंडावें, वर्दी द्यावी. पण वर सांगितल्याप्रमाणें गुरूदर्शनाचा व आज्ञेचा आभास झाल्यामुळें, तो पहिला विचार एकदम मावळून, मुलगा चेला म्हणून स्वतःचा करण्याचा विचार दृढमूल झाला. अर्थात पूर्वी चार दिवस 'कुणकेश्वरास' व आसपास घालविण्याचें मनांत आलें होतें त्याच्या अगदीं उलट निश्चय होऊन, मुलासह या गांवांतून जितका पाय लवकर काढतां येईल तितका काढावा अशी मनानें उचल खाल्ली! मग काय? बैराग्याचे पाय हें वाहन नेहमींच तयार असतें तें चालूं लागलें. मुलाला चालविणें शक्य नव्हतें म्हणून त्याला एका झोळींत घालून मी ती पाठीशीं बांधिली. आणि हातांत कुबडी व कमंडलू घेऊन तडक नर्मदा कांठची वाट धरली.

आतां खाण्यापिण्याला एकाचीं दोन तोंडें झालीं. पण दोन पोटें भरतील इतकी भिक्षा मिळविण्याची संवय मला पूर्वीची होतीच. फरक इतकाच कीं, पूर्वी माझ्याशिवाय आणखी माझ्या गुरूकरितां भिक्षा मागत होतों, ती आतां चेल्याकरितां मागावी लागली. तथापि पूर्वी झोळींत पडेल तें ग्राह्य व तेवढ्यावर संतोष अशी वृत्ति होती, ती चेल्याच्या म्हणजे पोरक्या अजाण मुलाच्या ममतेनें किंचित बदलून त्याच्याकरितां कोठें दूध, कोठें चावल, कोठें एखादें फळ अशा विशिष्ट भिक्षेचा प्रयत्न मीं करूं लागलों.

बैरागी चेले करितात, म्हणूनच त्यांचा सांप्रदाय सतत चालतो व गोसावी समाज बनतो. परंतु गोसावी घेतात ते चेले प्रायः जाणते किंब-हुना तारुण्यावस्थेला पोंचलेले असे घेतात. माझ्या पाठीशीं बांधलेलें दोन तीन वर्षांचें हें मूल पाहून मजविषयीं कोणी कोणी काय काय तर्क केले असतील तें कोणाला ठाऊक ? तरुण किंवा निदान गुरूच्या बरोबरीनें पायपिटी करणारा चेला मिळाला तर गुरूच्या परिभ्रमणांत सहसा खळ पडत नाहीं. त्याला छावणीला जावें लागत नाहीं. पण या माझ्या चेल्या-मुळें मला परिभ्रमणाची कल्पना सोडून देऊन, एकदम नर्मदा तीर गांठावें लागलें.

आम्हां गोसावी बैराग्यांचे संसार नाहींत म्हणून आमचीं स्वतःचीं घरंही नसतात. परंतु कोणाच्या जरूरीमुळें, कोणाच्या आवडीमुळें, कोणाच्या शिष्य गणाच्या ऋणानुबंधामुळें, प्रत्येकाचा एखादा ‘ मठ ’ किंवा ‘ मठी ’ कोठें तरी घरासारखी होऊन राहिलेली असतेच. आपण पशू पक्षी यांचीहि गोष्ट अशीच पहात नाहीं काय ? रानांत शेंकडों झाडें असतात. परंतु नीट लक्ष्य देऊन पाहिलें, तर कांहीं पक्षिगणांनीं झाडें वाटून घ्यावीं त्याप्रमाणें ठराविक झाडें आपल्या रात्रींच्या मुक्कामाकरितां पसंत केलेलीं असतात. फार काय, पण एखादा मनाजोगा पदार्थ खायला मिळाला तर तें तो घेऊन त्याच झाडावर बसून खातात. तेथेंच त्यांना स्वस्थता व मनःप्रसाद ही लाभतात. आम्हां गोसावी बैराग्यांचीहि पशुपक्षांप्रमाणेंच

स्थिति असते. त्याप्रमाणें माझें त्यांतल्या त्यांत आवडीचें ठिकाण नर्मदा कांठचें ' कुगकेश्वर ' हें होऊन राहिलें होतें. या क्षेत्रांत एका निवांत जागीं मठीवजा एक लहानशी दगडी ओवरी होती. तींत जाऊन मी माझ्या नव्या चेल्यासह मुक्काम केला.

४

स्वस्थपणा मिळाल्यावर मुलाविषयी बसल्या बसल्या चिकित्साबुद्धि चालवूं लागलों. हा ईश्वराच्या घरचा प्राणी खरा. पण ईश्वरानेंच सृष्टी चालविण्याकरतां ' अहंकार ' निर्माण केला. व तो आणि अहंकार ' नाम ' व 'रूप' यावर अधिष्ठित केला. पैकीं या मुलाचे रूप जन्मसिद्धच होतें. परंतु अहंकाराचें दुसरें अंग जें नांव तें मनुष्य संकेतानें निर्माण होतें. तेव्हां प्रथम माझ्या चेल्याच्या अंगात त्याचें व्यक्तित्व व्यवहारांत उतरविण्याकरितां कांहींतरी नांव ठेवणें प्राप्त झालें. आणि कांहीं ठेविलें तरी तें नांवच, अर्थातच तो कुगकेश्वरीं मला लाभला त्याची आठवण म्हणून मी त्याचें नांव ' कुणक्या ' असें ठेविलें.

व्यक्ति नांवाचा अर्थ विचारणारा मूर्खच नव्हे काय ? पण मला कोणी विचारलेंच तर, त्या नांवाचा खरा खरा वृत्तांत लपवून ठेवून त्याचा लाक्षणिक अर्थ मी असा सांगे. कुणक्या या नांवांत ' कोन ' ' क्या ' अशीं पदें आहेत. या लाक्षणिक अर्थाला तत्त्वज्ञानाचें स्वरुप यावें म्हणून मी आणखीही सांगे कीं ' कोन ? ' म्हणजे सगळया जगाला जो मूलभूत प्रश्न " तूं कोण आहेस ? " असा सवाल त्यांत गर्भित आहे. ज्या प्रश्नाला उत्तर मिळत नाहीं तो सहजच तत्त्वज्ञानाचा प्रश्न होऊं शकतो. " कोण मी कैसा कोठूनी आलों हें मज कांहीं न कळेरे " हें वेदांती पद्य वचन प्रसिद्धच आहे. बरें माझ्या चेल्याला तें वर्णन वस्तुतःहि तंतोतंत लागूं पडणारें होतें. हा मुलगा कोण हा प्रश्न, वरील पद्य वचनातल्या प्रश्ना-प्रमाणेंच निरुत्तर राहण्यासारखा होता. तसेंच ' क्या ' या पदाचा अर्थहि असाच प्रश्नार्थी तत्वज्ञानात्मक करून दाखवितां येतो. म्हणजे आत्मा हा

जसा कोण तसेंच जग हेंहि ‘ क्या है ’ म्हणजे काय आहे असा निरुत्तर प्रश्न विचारतां येतोच. कुणक्या हें नांव चमत्कारिक दिसल्याने कोणी त्याची चिकित्सा विचारली तर तिचा निर्वाह व्हावा म्हणून तत्व· ज्ञानाचें हें गौडबंगाल मी मनाशीं ठरवून ठेविलें होतें !

पण ही चिकित्सा करणारा क्वचित्‌च भेटे. मुलानें तर हें आपलेंच नांव असें एकदोन दिवसांत ओळखून अहंकार बुद्धीनें त्यांत प्रवेश केला. आणि मी ज्ञाता कपटी खरा,तरीपण तें नांव माझ्याहि तोंडांत बसून लवकरच इतकें संवयीचें झालें कीं पुढें पुढें त्याच्या चिकित्सेची मला आठवणहि सुलभ होईना. उच्चाराकरितां दीर्घ स्वराचा लघु होतो. म्हणून ‘ कोन ’ हें जाऊन, त्या ठिकाणीं कुण, हें आलें असें मीं सांगे. पण, ‘कुणक्या’ म्हणजे कुणकेश्वरीं लाभलेला हा अर्थ एक मला माहीत कीं एक देवाला माहीत ! स्वतः कुणक्याला देखील त्यांतले वर्म पुढें कित्येक वर्षांनीं उमगलें. पण तेव्हां तो माझा चेला राहिला नव्हता!

देवा घरच्या प्राण्याची जात ठरवूं पहाणें हें मूर्खपणाचें खरें पण व्यवहाराकरितां तेंहि करावें लागतें. आम्हां गोसाव्यांच्या धर्मांत जात पाळली जात नाहीं. स्पर्शास्पर्श विचार मानीत नाहींत. म्हणून तो कोणाच्याहि जातीचा असला तरी हरकत नव्हतीच. परंतु चिकित्सा किंवा जिज्ञासा ही मनुष्याला स्वस्थ बसूं देत नाहीं. म्हणून मी बसल्या बसल्या त्याच्या जात गोताचा तर्क करूं लागलों. ती थोडीशी ठरविण्याला मला कांहीं खुणा मिळाल्याच होत्या. मुलगा वाळवंटावर आईला हांक मारीत बसला होता त्या जवळ स्नानानंतर नेसण्याचें धाबळींत गुंडाळलेलें रेशमी वस्त्र होते त्यावरून बाई धर्मानें हिंदू व जातीनें हजार हिश्शानें ब्राम्हण होती. ब्राम्हणेतर जात धाबळीचा उपयोग करीत नाहीं. स्नानानंतर तेहि वस्त्राचा उपयोग करितात पण सोंवळें ओंवळे असा भेद मानीत नाहींत. येथपर्यंत तर्क जुळला. पण ब्राम्हणापैकीं कोणत्या पोटजातीचा हा मुलगा हें कळण्याला मार्ग नव्हता. ब्राम्हणांत देवस्थ, कराडे, कोंकणस्थ, सारस्वत, किरवंत, पळशे,

असे अनेक भेद असल्याचें मी ऐकलें होतें. पण त्यापैकीं या मुलाची पोटजात कोणती हा प्रश्न करून मला तेथेंच विराम करावा लागला.

आईबापांच्या नांवावरून सुगावा लागावा तर आईचें नांव 'आई' याहून दुसरें कांहींच मुलाला माहीत नव्हतें. आणि बाप या अर्थी 'बाबा' वगैरे कोणचाहि शब्द त्याच्या तोंडीं येत नसे. यावरून त्याची आई त्याच्या जन्मानंतर लवकरच विधवा झाली असावी असा तर्क मी केला. सूक्ष्म वाक्प्रचारानींहि जातीचा पोट भेद ओळखतां येऊं शकतो. पण माझें वास्तव्य महाराष्ट्रांत थोडें. यामुळें त्याच्या बोलण्यांत मला खूण पटण्यासारखें कांहीं निघालें तरी त्यावरून मला बोध काय होणार ? लवकरच तो मज जवळ हिंदी भाषा शिकला. पण बाळपणचे संस्कार खोल असतात यामुळें, जेव्हां जेव्हां मी महाराष्ट्रांत मुक्काम करी तेव्हां, तेव्हां तो आवडीनें मराठी बोलणाऱ्या लहान मुलांत मिसळून खेळे व तेवढ्यानेंच त्याला मराठीचें चांगलें ज्ञान झालें होतें.

नंतर माझ्या गुरूनें हिंदुधर्माचरणांत, विशेषतः नाथ पंथी गोसाव्या बैराग्यांच्या धर्मांत, ज्या रीतीनें माझा प्रवेश करविला त्याच पद्धतीनें मी याचाही करवूं लागलों. तेव्हां मला असें आढळून आलें कीं, मुलाची बुद्धी नुसती तीक्ष्णच नव्हे तर चिकित्सकहि होती. त्याला मी जे जे सांप्रदायिक पाठ शिकवावे ते तो त्वरित मुखोद्गत करी. पण मी जे स्वत: कधीं केलें नाहीं तेंहि हा करी. म्हणजे, 'बुवाजी, याचा अर्थ काय हो ? त्याचा अर्थ काय हो ?' असे प्रश्न विचारून, तो मला सतावून सोडी. आम्हा गोसाव्याबैराग्यांत प्रवचन करण्याची रीत फारशी नाहीं. पढीकपणा पुष्कळ असतो. धर्मविषयक पद्यें म्हणत, जपजाप्य करीत, आम्ही बराच वेळ बसतों. आमच्यांतील कांहीं समाधी लावण्याचे हेतूनें ध्यानस्थहि बसतात. पण एकाद्या अध्यात्मिक विषयाची चर्चा करण्याचा परिपाठ नसल्यानें, तोंडपाठ म्हणण्याच्या स्तोत्रांचा, पद्यांचा अर्थ समजून घेण्याचा आम्हां गोसाव्यांचा परिपाठ नसतो.

आमच्या पंथांतील श्रेष्ठपणाच्या खुणा म्हणजे ' याने सर्व धामें व क्षेत्रें किती वेळां केलीं ? हा कितीवेळ ध्यानस्त बसतो ? व क्वचित् कोणी एखादा चमत्कार कशाप्रकारें करतो ?' यावरून ठरविला जातो. योग्यापैकीं ' कर्माचरणी ' असा हा पंथ आहे. ' ज्ञानी ' नाहीं. तात्पर्य ' कुणक्या ' जेव्हां मला स्तोत्र पाठादिकांचे अर्थ विचारी, तेव्हां आपल्या पंथांतील एक न्यून मला कळे. मी त्याची कशीतरी समजूत काढी. तोंडाला आला तो अर्थ सांगितला असें प्रथम कांहीं दिवस चाललें. त्यानें काम भागेना. तेव्हां मी त्याला म्हणूं लागलों कीं ' स्तोत्र पाठ इत्यादिकांचा अर्थ करूं नये ! '

' अर्थ करूं नये ' या निषेध वचनानें जगांतील किती अधर्म, किती अनाचार, किती अज्ञान झांकलें गेलें आहे याचा पत्ता कोणाला तरी लागला आहे काय ? पण त्या निषेधांत एक प्रकारची जादू असते खरी ! ती चिकित्सकाला बराच वेळ दटावून दबावून धरून ठेवूं शकते. कुणक्या-चेंही तसेंच झालें. ' अर्थ करूं नये ' असें मी त्याला सांगितलें म्हणजे तो गप्प बसे ती माझी आज्ञा पाळावी म्हणून ! पण त्याच्या बुद्धीचें समाधान झालें नाहीं हें त्याच्या चेहऱ्यावरूनच दिसे. पण मी तरी काय करणार ? मात्र त्याचा आज्ञाधारकपणा फारच वाखाणण्यासारखा होता. तथापि माझा निषेध जेथें त्याच्या मार्गांत आड येत नसे, तेथें आपली बुद्धि चालवून तो अनेक प्रकारच्या गमती करी. बुवाजी मी आज असें केलें, बुवाजी मी आज तसें केले, असें येऊन मला सांगे. कारण तो जसा आज्ञाधारक होता तसा, मीहि प्रेमामुळें, त्यानें कांहीं केलें तरी त्याच्यावर रागावत नसे हें त्याला ठाऊक होतें.

भिक्षेला निघावयाचें म्हणजे त्याचा पाय माझ्या पुढें. आणि आम्हां दोघांत तो अशा थाटानें 'अहलक' म्हणे, 'माई भिक्षा लाव' म्हणे, कीं ते त्याचे शब्द ऐकणारे लोक मुठींत भिक्षा घेऊन त्याच्या तोंडाकडे क्षणभर टक लाऊन पाहात. आधींच वैराग्याला तेज ! आणि त्यांतून बालवयांत विनटलेलें वैराग्य. हें पाहिलें म्हणजे कोणीही स्त्री-पुरुष सहजच त्याचें कौतुक करीत. उलट तोहि झोळी भरून मठींत परत आला म्हणजे, चुलीवर हंडी शिजत

असतां, भिक्षाटनाच्या वेळेंत मार्मिक दृष्टीनें पाहिलेल्या बारीक खाचाखोंचा तिखटमीठ लावून वर्णन करून मला सांग.

तो मठींत असला म्हणजे तिकडे उगीच फिरकण्याची कोणाची प्राज्ञा नसे ! अशा पाणीदार मुलाला राखण्या कुत्र्याची उपमा देणें गैर ! पण कुत्र्याचा इमानपिणाचा गुण तरी मनुष्यानें कां न वाखाणावा ? पोर वय असलें तरी तो उगीच कोणाच्या वस्तूला चुकूनहि हात लावावयाचा नाहीं. किंबहुना उगीच कोणी कोणाच्या जिनसाचा अपाहार करितो असें त्याच्या नजरेला आलें असतां तो ताबडतोब त्याचा गवगवा करी.

पण या सर्वांचे कौतुक मी मनानें करीत असतां, मला मनांतूनच एका गोष्टीचे वाईट वाटे कीं, नाथपंथी धर्मावरील मुलाची श्रद्धा असावी तशी नाहीं. माझ्या आज्ञा पालनांत जेवढा कांहीं धर्म येत असेल तेवढ्याचें परिपालन तो बिनचूक करी. पण जेथें स्वतंत्र बुद्धी चालविण्याला वाव मिळे, तेथें तो लौकिक बुद्धि व तर्क पद्धति चालवी. आणि मला असें भासवी कीं, 'माझा वेष बैराग्याचा असला तरी, माझें अंतरंग लौकिक संसारांतील श्रेष्ठपणा मिळण्याजोगें आहे. ' देवळांत गेला असतां, पुजाऱ्याचें वर्तन कसें आहे, तो देवाकडे लक्ष किती ठेवतो, व ताटांत पैसे टाकणाऱ्याकडे लक्ष किती ठेवतो, हें बारीक नजरेनें पाही. आणि मला येऊन म्हणे कीं, "बुवाजी हा या पैशाचें काय करतो हो ? " अथवा "पुजारी पूजा करीत असता हळूच पैशाचें तबक पळवून, पूजेंत त्याचें किती लक्ष आहे हें पाहावें असें मनांत येतें. " मग मी म्हणे " अरे, देवाच्या पूजा अर्चेला झालें तरी द्रव्य हें लागतेंच. " मग तो म्हणे " देवानें आपलें द्रव्य आपणच कां निर्माण करूं नये ? लोकांच्या पैशांवर जगणारा तो देव कसला ? " आणि म्हणे " देवाचे पैसे हे पुजारी आपणच उपटीत नसतील कशावरून ? मला जर कोणी अधिकारी नेमील तर या पुजाऱ्यांचीं सगळी बिंगें मी बाहेर काढीन. "

देवळांच्या प्राकारांत कोणी अधिकारी आले म्हणजे त्यांचा सरंजाम कसा आहे, नोकर कसा वागतो, धनी कसा वागतो, याचें तो बारकाईनें

निरीक्षण करी. अधिकारी बराच वेळ देवळांत रमला तर, तो दाराशीं उभा राहून, त्याचे शिपाई पट्टेवाले यांच्याशीं खेळी मेळी करी. कोणाच्या कमरपट्यांत बसविलेली तरवार कशी आहे, बंदुक ठासतात कशी, उडवितात कशी, भालदारी चोपदारी काठ्यांत गुप्त्या, म्हणजे बारीक पात्याच्या पोलादी तलवारी, कशा बसविलेल्या असतात, हें समजून घेण्यांत त्याचें मन रमे. आणि मी पोथी पुस्तक काढून बसलों, किंवा जपाची माळ हातीं घेतली, म्हणजे त्या सर्व गोष्टींविषयींचे प्रश्न मला विचारी.

मी समाधानकारक उत्तरें न दिलीं किंवा अज्ञान प्रगट केलें म्हणजे तो हंसे. आणि म्हणे 'गुरूजी, आपलें गोसावी बैराग्याचें एखादें राज्यच का असूं नये हो? एरवीं हत्तीवर बसणारे, पालखींत बसणारे, गोसावी बैरागी मी पाहतों, पण एक शिपाई येऊन अडवील नि तंबी देईल तर त्यांना उलट बोलायचें धैर्य याना होणार नाहीं. अशांनीं हत्तीवर कशाला बसावें ? किंवा पालखींत कशाला बसावें ? '

देवळांत पुराण कथा कीर्तन चाललें असतां हा तेथें जाऊन बसे आणि भारत रामायणांल्या गोष्टी ऐकल्या असतील त्यांतलें बरें वाईट खरें खोटें मला विचारी. आम्ही बैरागी गोसावी कथा पुराणाकडे दुर्लक्ष्य करणें हा मोठेपणा मानितों. आणि ' कथा पुराणांत काय आहे ? ' असें मी म्हटलें म्हणजे तो म्हणे ' त्यांतल्या युद्धाच्या गोष्टी ऐकून, आपलें तर बुवा मन रमतें. मग तुम्हाला त्या कशा आवडत नाहींत कोण जाणें.' पण त्याची सर्वांत मोठी करमणूक म्हटली म्हणजे मराठ्यांचीं सैन्यें, पायदळें, घोडदळें, तोफखाने पाहण्यांत असे. मी प्रति वर्षांतून बिनपावसाळी दिवसांत एक तरी नर्मदेची छोटी प्रदक्षिणा करी. आणि हटकून त्याच काळांत, नर्मदेच्या वरच्या वरच्या अंगांना जेथें जेथें पाय उतार असे, तेथें तेथें उत्तर हिंदुस्थानांत स्वारीवर निघालेल्या मराठ्यांच्या फौजा नर्मदा पार होतांना आढळावयाच्या.

## ५

शेवटीं सुमारें एक वर्षभर माझ्या शंकांचें निरसन करून घेण्याकरितां मी कुणक्याच्या वर्तनावर विशेष बारीक नजर ठेवूं लागलों. त्याला एकटेंच बाहेर कोठें जावेंसें वाटलें तर मी त्याला नको म्हणत नसे. पण तो परत आला म्हणजे, त्यानें त्या वेळांत काय काय केलें याचा छडा मी होऊन अनेक प्रश्न विचारून काढी. मात्र ही माहिती मी, त्याजवर अविश्वास होता म्हणून काढीत होतों, असें त्याला मी कधींच भासूं दिलें नाहीं. उलट तो आपण काय केलें याच्या ज्या हकीकती सांगे त्या मला कौतुकास्पद वाटत. आणि म्हणूनच मी त्यांची चिकित्सा करितो असें त्याला भासवीत असे. या बाबतींत कुणक्यानें माझ्याशीं कधींच प्रतारणा केली नाहीं. कधींच खोटें सांगितलें नाहीं. सर्व कांहीं खरें सांगून, तो तें स्वतः हंसण्यावारी घालवी. आणि जें सांगे ते मला हंसूं यावें अशा थाटानें व विनोद बुद्धीनें सांगे. क्वचित् जर त्याला संशय आला कीं मला म्हणजे (आपल्या गुरूला) सहसा आवडणार नाहीं अशी गोष्ट आपल्या हातून घडली, तर तो लाघवीपणानें मला प्रश्न करून म्हणे, " गुरूजी मी केलें तेंच बरोबर होतें ना हो? मी केलें तें तसेंच करायला नको होतें का? ' मग मीहि मनांत विचार करी कीं, त्याच्या करण्यांत कांहीं सुमार असलें तरी तो तें करून चुकला आहे. मग त्याला वाईट म्हणून उगीच खजिल करण्यापासून काय लाभ? अशा रीतीनें प्रतारणा झाली तर ती मजकडूनच होई. मनांतलें बोलून न दाखविणें हें जर पाप असेल तर तें माझ्याच हातून घडे.

एके दिवशीं कुणक्या आपलीं आवडतीं फुलें गोळा करण्याला रानांत गेला असतां, मी अनेक गंभीर विचार मनांत येऊन बराच वेळ चिंतन करीत बसलों. आज प्रथमच माझ्या मनांत असा स्पष्ट विचार आला कीं, या मुलाला गोसाव्याची ' दीक्षा ' देऊन मीं त्याचें अनहित तर करीत नाहीं ना? जगांत वैराग्यबुद्धि असावी हें खरें. पण याचा अर्थ

कदाचित् इतकाच होईल कीं संसारांत आसक्ति ठेवूं नये. पण आसक्ति ठेविली नाहीं म्हणून मनुष्यानें संसाराचा ऐन जिनसी त्यागच करावा हें कसें सिद्ध होतें ? ब्रह्मचाऱ्यांनीं आपली परंपरा ब्रह्मचाऱ्याकडूनच खरी चालविली जातें असे कां समजावें? संसारी लोक पापी म्हणावे तर, गोसाव्यांच्या सांप्रदायांतले तरी सर्व लोक केवळ पुण्यच पदरीं बांघतात असें अनुभवाला येतें काय ? संसारी लोक स्वार्थी म्हणावे तर मठ बनवून ऐश्वर्य थाटून राहणारे नाथपंथी गोसावी काय कमी स्वार्थी असतात ? मठ सजविणें हें घर समृद्ध ठेवण्यापेक्षां अधिक चांगलें किंवा कमी वाईट कसें ? मठवासी महंत नुसते स्वार्थीच नव्हे, तर अहंकारानें उन्मत्त झालेले व व्यसनी दुराचारी असे कितीतरी आढळत. ज्या संसारी लोकांकडून भिक्षा घेऊन आम्ही गोसावी बैरागी लोक उपजीविका करितों ते जर पापी, तर आम्हीं त्यांच्या हातची भिक्षा घेतों तीहि पापमयच ठरत नाहीं काय ? मनुष्य संसार न करील तर जग कसें चालेल ? कारण जगावर प्रेम न करणें म्हणजे ईश्वरावर प्रेम न करणें, किंवा त्याच्या एका मोठ्या पराक्रमाची निंदा करणें, असें होत नाहीं काय ? जग निर्माण करून तें चालविणें याहून ईश्वराचा दुसरा पराक्रम कोणता ?

अशा रीतीनें अनेकदां उच्च वातावरणांत परिभ्रमण करून, शेवटीं मी या मुद्यावर आलों कीं, कुणक्याला गोसावी धर्माची कायमची दीक्षा देऊन त्याचा सर्व जन्म तीर्थाटणें देवतार्चनें करण्यांत घालविल्यानें, त्याच्या आंगच्या अनेक गुणांचें यथायोग्य चीज मी करीन काय ? स्वतःपुरती मुक्ति मिळविणें हा दूषित स्वार्थ नव्हे काय ? असल्या एकेरी धर्माचरणापेक्षां, संसारांत घालूनच, त्याला एकाद्या उत्तम कर्मयोग्याचें यश मिळवून देण्याकरितां, जर मी आपल्या पुण्याईवर उदक सोडलें, तर तो स्वतःचें कल्याण करून वरती लोकांचेंहि कल्याण करणार नाहीं काय ? या भरत खंडांतील राजमार्गावर किती विविध प्रकारचे लोकव्यवहार चालू आहेत ? त्यांत माझ्या या शिष्याला घातलें तर तो आपल्या बुद्धीचें चीज अधिक करणार नाहीं काय ?

मी अशा रीतीनें जसजसा विचार करूं लागलों तसतसें मला अधिकाधिक पटूं लागलें कीं, कुणक्याला दीक्षा देऊन ब्रह्मचर्य व्रताच्या खोड्यांत घालणें योग्य होणार नाहीं. पण यापैकीं एक अवाक्षरहि मी त्याच्याजवळ काढलें नाहीं. मनाशीं निश्चय केला कीं, पूर्वी ज्या ठिकाणीं तो मला लाभला त्या ठिकाणीं त्याला पुन्हां नेऊन सोडून द्यावा व आपण हिमालयाची वाट धरावी. तेव्हां आज तो अवघ्या चवदा पंधरा वर्षांचा, म्हणजे जगाच्या दृष्टीनें लहानच आहे. मग वाटे, त्याला असें निराश्रित सोडलें तर तो काय करील ? असें माझें एक मन मला विचारी. पण लगेच माझें दुसरें मन या प्रश्नाला समर्पक उत्तर देई. तें म्हणे, " अवघा तीन वर्षांचा हा असता, समुद्राच्या वाळवंटावर एकटा बसून राहिला होता, त्यावेळीं तो आत्मरक्षण करण्यास जितका समर्थ होता, त्यापेक्षां तो आज किती तरी पटीनें अधिक समर्थ झाला आहे ! आज काल चौदा पंधरा वर्षांचीं मुलें महाराष्ट्रांत जाणत्या माणसांसारखीं वावरतात, आपलें पोट भरतात, व राजकारणांतहि बुद्धि चालवितात. मग हा मुलगांहि तसेंच कां न करील!"

पूर्वी पानपतावर मोठें तुमुल युद्ध झालें. तेव्हां मराठ्यांच्या सैन्यांत इतक्या अल्पवयाचीं किती तरी मुलें लष्करांतून होतीं. लढाईवर त्यांची नेमणूक शिपाई म्हणून झाली नव्हती हें खरें; परंतु तीं घोड्यावर बसून आत्मविश्वासानें हिंडत. त्यांच्या कंबरबंदांत त्यांना हातानें पेलतां येतील अशा तरवारी असत कित्येक सरदार पथकांचे धनी हीं अशीं अल्पवयी मुलेंच असत. आणि त्यांना जरी सरदारकीचा सर्व कारभार करितां आला नाहीं, तरी पदरचे चाकर वागवून घेण्याची अक्कल त्यांना असे. न जाणो हाच मुलगा एकाद्या सरदाराच्या पदरीं असता तर त्यानें आपल्या भाग्योदयाचें प्रस्थान अल्पवयांतच ठेविलें असतें. तेव्हां आज त्याला मी एकटाच सोडून गेलों तर खचित त्याची वाताहत होत नाहीं. म्हणून फिरून त्याला कुणकेश्वरीं नेऊन देवापुढें उभा करावा, त्याला माझा बेत समजून सांगून त्याची रजा घ्यावी, आणि त्यानें आपल्या प्रेमाचे पाश मजवर टाकून मलाच आपला

बंदीवान् करण्याचें मनांत आणिलें, तर त्याला झुकांडी देऊन निघून जावें! हें जग व त्यांत त्याचें स्वतःचें भवितव्य हीं मी आपल्या कडून त्याच्या स्वाधीन करावी. मग त्याचें तो पाहून घेईल !

६

मोत्याचे शिंपले उघडणाऱ्या कोणाला आंत गोळीबंद तेजस्वी मोत्याचा दागा लाभतो, तर दुसऱ्या कोणाला आंत मेलेला किडा सांपडतो ! त्यापैकीं माझ्या चेल्याचा प्रकार देवाच्या मनांत असेल त्याप्रमाणें होईल. त्याची काळजी मी कां करावी ? हा विचार पक्का ठरवून एक दिवस मी त्याला म्हणालों, 'कुणक्या, चला आपण फार दिवसांत महाराष्ट्रांतल्या तीर्थयात्रा केल्या नाहींत. यंदा त्याच करूं.' हें ऐकून कुणक्याला मोठा आनंद वाटला. उत्तर हिंदुस्थानापेक्षां महाराष्ट्रावर त्याचे उपजत प्रेम अधिक कां असावें ? याचें कारण त्याला स्वतःला माहीत नसलें तरी मी जाणूनच होतो. असो. कुणक्याला बरोबर घेऊन एकेक यात्रा करीत मी 'कुणकेश्वरी' येऊन पोंहोंचलों. पूर्वी देवानें त्याला माझ्या पदरांत टाकल्याचा दिवस मला पूर्णपणें आठवत होता. आणि बरोबर बारा वर्षांनीं कोणत्याही गोष्टींत एक छोटें युगांतर होतें अशी माझी भोळी समजूत असल्यामुळें, नेमका तोच दिवस पाहून मी कुणकेशरास येऊन मुक्काम केला.

सकाळीं आम्ही दोघेहि समुद्र स्नानाला गेलों. तेव्हां बारा वर्षांपूर्वी वाळवंटाच्या ज्या कोपऱ्यात कुणक्या आईला हाका मारीत रडत बसला होता, तीच जागा मी स्नानाला पसंत केली. आणि स्नानाकरितां दोघेहि लंगोट लावून उभे राहिलों तेव्हां मी क्षणभर स्तंभित झालों. समुद्राकडे टक लावून पाहूं लागलो. माझ्या मनांत अशी एक वेडी आशा उत्पन्न झाली कीं कुणक्याला पाहून त्याची आई समुद्रांतून वर येऊन त्याला भेटेल. आणि तसें झालें तर त्याला तिच्या स्वाधीन करतांना मला किती आनंद वाटेल ?

पण भोळीवेडीच ती आशा. ती कशानें सफळ होणार? मला क्षणभर असाहि मोह पडला कीं, आम्ही दोघे तसे त्या वाळवंटावर उभे असतां, कुणक्याचें पूर्ववृत्त त्याला सांगावें. पण तसें केल्यानें त्याला कदाचित् दुःख होईल. त्याच्या उत्साही मनावर उदासिनतेचें कायमचें अभ्र पटल बसेल, या भीतीनें मी मन आवरून धरलें. क्षणभर मला भास झाला कीं, कुणक्याला कांहीतरी अकल्पित असें आठवून तो जुन्या ओळखीनें आसपास न्याहाळून पाहात असावा. परंतु शेवटीं तो माझाच भ्रम ठरला.

कुणक्या धिटाईनें समुद्रांत शिरला, व यथेच्छ पोहून तीरावर येऊन त्यानें वस्त्रांतर केलें. माझ्यानें फार वेळ स्नान करवेना. मग आम्ही दोघेही उठून वर देवळांत येऊन 'कुणकेश्वराचें' दर्शन घेतलें. आणि सभामंडपाच्या एका कोपऱ्यांत आम्ही तळ दिला.

वेळ दुपारची. तेव्हां नित्य क्रमाप्रमाणें आम्हां दोघांची भिक्षा मागण्याकरितां कुणक्याच गांवांत गेला. आणि चार घरें मागून त्यानें आणलेली भिक्षा बाहेर एका झाडाखालीं शिजवून खाऊन आम्ही परत मूळच्या जागीं येऊन बसलों.

इतक्यांत अशी गोष्ट झाली कीं, कोणी दोघे गृहस्थ देवदर्शन करून, सभामंडप रिकामासा पाहून, तेथेंच आपला गालीचा पसरून बोलत बसले. त्यांच्या बरोबर एक दहा वर्षांची मुलगी होती. ती त्यापैकीं एकाची कन्या असावी. तिचा बाप आपल्या स्नेह्याशीं बोलत असतां, पोर स्वभावाप्रमाणें, ती देवळाच्या निरनिराळ्या भागांत हिंडली. आणि सभामंडपांतल्या कोपऱ्यांत मी व कुणक्या बसलों होतों तेथें येतांच, किंचित विपरीत वेषाच्या आम्हां बैराग्यांना पाहून ती दचकली. पण न भितां किंचित् दूर उभी राहून आमच्याकडे निरखून पाहूं लागली. हें पाहून मी प्रेमानें मोठ्या मऊ शब्दांनीं तिला जवळ बोलाविलें, व मजजवळचें एक फळ व खारकांच्या दोन तीन बिया तिच्या हातीं दिल्या. त्या तिनें घेतल्या.

कुणक्यानेंहि आपल्या जवळची छोट्या रुद्राक्षांची एक माळ तिला दिली. तिचें तिला नवल वाटून, ती हातीं घेऊन, ती निरखीत उभी राहिली.

ते दोघे गृहस्थ हा सर्व प्रकार कौतुकानें पाहात होते. त्यांतला एक म्हणाला "बुवाजी, मुलगी तुम्हाला पाहून भ्याली नाहीं!" मी म्हणालों, ती भ्याली असती तर मला वाईट वाटलें असतें. लहान मुलें आम्हाला पाहून भितात. असें जेव्हां जेव्हां माझ्या अनुभवाला येतें, तेव्हां तेव्हां मला असें वाटूं लागतें कीं, आचारधर्म म्हणून आम्ही गोसावी लोक दाढ्या मिशा राखतों, ही गोष्ट ईश्वरा घरीं रुजू नाहीं. म्हणून त्या काढून टाकाव्या. पण तुमची मुलगी धीट आहे. आणि सुदैवानें माझ्या या चेल्याला अजून दाढीमिशी फुटली नाहीं. शिवाय त्यालाहि लहान मुलांची फार आवड आहे." असें बोलून मी कुणक्याला म्हणालों 'बच्चा, मुलगी चलाख दिसते. जा तिला देवळाच्या प्राकारांतून फिरवून आण. झाडावर कोठें फळ दिसलें तर तें तिला तोडून दे.' माझी आज्ञा होताच कुणक्या 'चल बाळ येत असशील तर' असें म्हणून तिला हातीं धरून सभा-मंडपाखालीं उतरला. त्या दोघा गृहस्थांना देखील ही गोष्ट आवडली. मुलीची जात! हे दोघे बोलत बसले असतां ती मधून मधून नसते प्रश्न विचारून त्यांच्या संभाषणाला अडथळा आणण्याचा संभव! म्हणून ती जरा दूर असलेली बरी असेंहि त्यांना कदाचित् वाटलें असेल.

कसेंही असो. तिची काळजी करण्याचें कारण नाहीं अशा विश्वासानें ते आतां खुल्या दिलानें एकमेकांशीं बोलूं लागले. त्यांचें बोलणें मी ऐकेन अशी शंका त्यांना आली नाहीं.एक तर तिऱ्हाइतानें न ऐकण्यासारखें त्यांत कांहीं नसावें. शिवाय प्रत्यक्ष लहान मुलीनें माझ्यावर व माझ्या चेल्यावर विश्वास दर्शविला त्यामुळें संभाषणाच्या प्रसंगीं मला टाळावें असें त्यांनाही वाटलें नसावें. या गृहस्थांचीं नावें मला माहीत असणें शक्य नव्हतें. आणि मला तरी तीं विचारून काय करावयाचें होतें? पण त्यांचें भाषण मी ऐकूं लागलों तस तसें मला त्यांत कौतुक उत्पन्न झालें. म्हणून त्याचाच सारांश थोडक्यांत खालीं देत आहे.

## ७

हे दोन गृहस्थ परम मित्र होते असें मला दिसून आलें. एक सतेज पण कृश होता. त्यानें अंगावर एका पंचाशिवाय दुसरें कांहींच वस्त्र घेतलें नव्हतें. त्याच्या एका हातांत एक लठ्ठशी काठी, व दुसऱ्या हातांत तुंब्याचा आकार दिलेला पितळी लोटा किंवा कमंडलू होता. त्यानें भिवयांमध्यें शाक्त उपासकाप्रमाणें शेंदराची टिकली लावली होती. त्यानें प्रत्यक्ष जटा किंवा दाढी ठेवली नव्हती, परंतु श्मश्रू बरीच वाढलेली असून तो केसाची मुळींच निगा राखीत नसे असें दिसे. त्याचे निम्मे शिम्मे केस पिकलेले होते. पण याला वयोमानापेक्षां दुःख किंवा चिंता असलेंच एखादें कारण प्रभावी झालें असावें. तो वयानें फार तर चाळिशीच्या आंतबाहेर असावा तथापि पुढें वीस वर्षांनीं पडणाऱ्या सुरकुत्या त्याच्या चेहऱ्यावर अकालींच पडल्या होत्या. तो कांहींतरी योगसाधनाच्या, तपस्येच्या, देहदंडाच्या मार्गांत असावा, व यामुळें त्याचें तेज अकालीं येणाऱ्या वार्धक्याच्या सर्व खुणांवर आपली छाप पाडल्याशिवाय राहात नव्हतें. त्याच्या डोळ्यांत विशेष प्रकारची गंभीर वृत्ति असून तो अगदीं मोजकें वेंचक व थांबून थांबून बोले.

दुसरा गृहस्थ याच्या अगदीं उलट होता. तोहि मध्यम वयाचा व त्याच्याहि तोंडावर तेज होतें. परंतु तें विरक्ति मार्गांतील देहदंडणाचें नसून प्रवृत्ति मार्गांतील मेहनतीचें होतें. तो इकडे कोंकणांत आला होता तरी त्यानें आपला शिपाइगिरीचा ब्राम्हणशाही पोषाखच अंगावर घातला होता. देवळाच्या सभामडपांत व मित्राशीं बोलत असतांही तंग विजारीमुळें तो गुढगे मोडून बसला होता, व त्याच्या कंबरबंदांतील छोट्या तरवारीचें म्यान जमिनीवर लोळत होतें. त्याच्या बोलण्यांत आवेश उमेद तरतरी हीं पूर्ण भरलेलीं असून, कामाच्या तगाद्यामुळें बोलण्याला फुरसत नसलेल्या माणसाप्रमाणें तो तुटक वाक्यें जलद बोले. अशा रीतीनें वैरा-

ण्याला सन्मुख झालेला एक व संसारांत अजून अधिक आक्रमण करूं इच्छि-णारा व प्रवृत्तीला सन्मुख असा एक, असे हे दोघे दोन मनोवृत्तींचे होते तरी मित्र प्रेमामुळें त्यांच्या वृत्तींचें मधुर मिलन झालें होतें.

शिपाई गडी म्हणाला—' बरें, शामराव, आतां येथूनच मला तुझी रजा घेतली पाहिजे. आणखी चार दिवस तुझ्या संगतींत जाते तर हवें होतें. कदाचित् त्या अवधींत मला, नित्य क्रमाप्रमाणें, दोन तीन तरुण होत-करू कोकणांतील मुलें बरोबर देशावर नेण्याला मिळवितां आलीं असतीं. पण पुढें वाढून ठेविलेलें काम डोळयाला दिसलें म्हणजे आवडत्या कोंकणांतलाहि मुक्काम मला आवरता घ्यावा लागतो. '

शामराव म्हणालाः—' इकडचीं कोंकणांतील मुलें देशावर नेऊन, त्यांच्या मागें महत्वकांक्षेची ओढच लावून द्यावयाची कीं नाहीं ? कोंकणांत पराक्रमाला स्थान नाहीं असाच एकंदरीनें तुझा ग्रह झालेला दिसतो. पण्डितराव ! '

पण्डितराव म्हणाला—' पराक्रमाला लागणारी बुद्धि कोंकणांत पुष्कळ आहे. पण ती प्रगट व फलद्रूप होण्याला लागणारें क्षेत्र या कोक-णांत नाहीं त्याला काय करणार ? गेल्या पन्नास वर्षांचा दोन पिढ्यांचा हा अनुभव आहे. इकडील मुलें देशावर गेलीं म्हणजे त्यांची दृष्टि विस्तार पावते. राज्यकारभाराच्या संसारांतल्या बऱ्या वाईट सगळ्या गोष्टींशीं त्यांचा परिचय होतो. आणि हातांत मेण घेऊन हव्या त्या आकाराचें चित्र हातानें बनवावें, त्याप्रमाणें बुद्धि असेल तसा व तितका पराक्रम करण्याला त्याला देशावर भरपूर वाव मिळतो. गेल्या दोन पिढ्यांत कोंकणांतून पांच पन्नास 'रंक' देशावर जाऊन ' राव ' बनलेले मी कांहीं पाहिलेले आहेत व तूंहि ऐकिले असशील. कोंकण आपली मातृभूमि. तिनें आपल्याला तरतरीत बुद्धी देऊन ऋणी केले. तिचा उपकार करण्याचा, किंवा ते ऋण फेडण्याचा, मला एकच मार्ग दिसतो. तो हा कीं, शक्य तितकीं कोंकणी मुलें देशावर नेऊन त्यांना नांव काढण्याच्या मार्गांत घालून द्यावे, व ते मोठे झाले म्हणजे

त्यांच्याकडून कोंकणचें नांव मोठें करावें. मला स्वतःला देवानें मुलगा दिला नाहीं. फक्त ही एक मुलगी दिली आहे. आणि तिजवरील ममतेमुळें मी दुसरें लग्नही केलें नाहीं. यामुळें प्रत्यक्ष आपल्या वंशजाकडून देशावर कोंकणचें नांव मोठें करणें मला शक्य नाहीं. आणि तूं पाहावा तर तोहि असाच ! '

शामराव म्हणाला—' होय, तूं म्हणतोस तें खरें आहे. तुला मुलगी तरी आहे. पण मी लहानपणींच ब्रह्मचर्यव्रत स्वीकारलें म्हणून लग्न केलें नाहीं. आणि दुसऱ्या गोत्रांत कां होईना, माझ्या वडिलांचा वंश चालवील अशी मला बहीण होती पण तिकडूनहि आशा खुंटण्याचाच प्रकार झाला. '

पंडितराव उत्सुकतेनें म्हणाला—' तो कसा काय ? अलीकडे तुझी माझी या कोंकणांत बऱ्याच वर्षांत गांठ पडलेली नाहीं. कोणाचेंहि लहानपणचें मित्रप्रेम विशेष दृढ असते म्हणूनच केवळ तुमच्या आमच्यांत इतकीं वर्षें तें राहिलें, पण एरव्हीं तुझ्याकडची बातमी हकीगत आज कित्येक वर्षांत मला कळलेली नाहीं. तुझ्या बहिणीकडून वाढणारा तुझा वंशवृक्ष खुंटला कीं काय ? व तो कशानें ? '

शामराव म्हणाला ' ती एक मोठी दुःखद व अद्भुत अशी कहाणी आहे. आज उणी पुरी बारा वर्षें झालीं असतील. ' शामराव पुन्हा आठवण करून म्हणाला—' उणी पुरीं कां आजच बरोबर बारा वर्षांपूर्वींची गोष्ट. या देवळाच्या खालच्या अंगाला माझी बहीण, आपला लहान दोन तीन वर्षांचा मुलगा घेऊन अर्धोदय पर्वाच्या निमित्तानें समुद्रस्नानाला आली. आणि दुर्दैवानें तीं दोन्हीं एका मोठ्या लाटेबरोबर समुद्रांत जाऊन गडप झालीं.'

हे शब्द माझ्या कानावर पडतांच विजेचा धक्का बसावा त्याप्रमाणें माझ्या मनाला एकदम धक्का बसला. आणि त्याच्या भरांत 'छे हो भलतेंच सांगता. आई समुद्रांत बुडाली. पण मुलगा वांचला. आणि तो पहा हा

येथें आतांच तुमच्या डोळ्यापुढें क्षणभरापूर्वी होता.' असे शब्द माझ्या अगदीं ओठावर आले. पण तितक्यांत मनानें मला मागें ओढलें. तें मला म्हणालें ' तूं बोलूनचालून गोसावडा. तूं सांगतोस ती हकीगत शंभर नंबरी खरी असली तरी, दिसण्यांत इतकी अद्भुत आहे कीं तिच्यावर हा गृहस्थ मुळींच विश्वास ठेवणार नाहीं. मग तूं व्यर्थ आपलें हंसे कां करून घेतोस ?' या सुविचारानें म्हणा, शंकेनें म्हणा, माझ्या जिभेनें माघार घेतली, आणि जणूं कांहीं त्यांचें संभाषण मी ऐकतच नव्हतों अशा तटस्थ वृत्तीनें, स्वाभाविक दिसेल अशा रीतीनें, मी मान किंचित् बाजूला वळवून बसलों. पण काय बोलतात तें ऐकण्याकरितां माझ्या पंचप्राणांची शक्ती पुढें माझ्या कानांत एकवटली. माझी एकाग्रता मी लपविली. पण त्यांचं अक्षरन् अक्षर मी ऐकत होतों.

शामराव पुढें म्हणाला–' तुला सांगायला हरकत नाहीं. आणि ती गोष्ट अशी कीं, तिला मुलगा झाल्यावर लौकरच वैधव्य प्राप्त झालें, व तें दुःख तिनें मनाला एकसारखें लावून घेतलें. आणि त्यांत विशेष वाईट गोष्ट ही कीं, मुलगा आपल्या नवऱ्याच्या मुळावर आला अशी तिनें मनाची समजूत भोळेपणानें करून घेतल्यामुळें, मुलावर अत्यंत प्रेम असतांहि, त्याच्या रूपानें वैधव्याचें दुःख जन्मभर आपल्यापुढें उभें राहणार असें वाटून, तिच्या पुत्र-प्रेमांत मधूनमधून दुःख भावनेची काल्वाकालव होई.मी आपणाकडून तिची हरप्रकारें समजूत घालण्याचा प्रयत्न करी. मी तिला म्हणे कीं, " ताई, लहानपणीं पितृसुखाला आंचवलेलीं मुलें पुढें नांवा रूपाला आणून ईश्वर त्यांच्या हानीची भरपाई करतो. तुझ्या मुलाविषयीं अशीच ईश्वरी योजना नसेल कशावरून ? तूं आईचें व बापाचें मिळून दुप्पट प्रेम त्याच्यावर कर. त्याची दुप्पट काळजी घे. म्हणजे तो पुढें नांवारूपाला येऊन आपली व आपल्या बापाची मिळून दुप्पट कीर्ति मिळवील, आणि तुझ्या दुःखाचा पांग फेडील." पण ती मला उलट म्हणे—" आपल्या कुलावर ईश्वराचा कोपच दिसतो. म्हणून त्यानें जसें मला वैधव्य दिलें तशीच ब्रह्मचर्यव्रत स्वीकारण्याची बुद्धि, दादा, तुला दिली. नाहींतर तूं आमच्या वडिलांचा

एकुलता एक मुलगा. घरचा संसार खुंटविण्याची बुद्धि तुला कां व्हावी ?' तात्पर्य, माझ्या कोणत्याही युक्तिवादानें तिचें समाधान झालें नाहीं. मुलगा पाहून वैधव्य दुःख तिला जाणवे तरी ती त्याचा घात कसा चिंतील ? पण स्वतःचे दुःख सोसवेना म्हणून आपलाच जीव देण्याची तिची तयारी झाल्यासारखी ती नेहमीं उदासवृत्तीनें वागे. म्हणून सगळ्याच गोष्टी संभवनीय वाटतात. मुलाला हातीं धरून समुद्र स्नान करीत असतां, लाटे-बरोबर दोघेंहि आंत ओढलीं गेलीं असतील, किंवा जाणून बुजून दोघांचेंहि बलिदान तिनें आपण होऊन केलें असेल."

इतकें बोलून शामराव स्तब्ध राहिला. पण पंडितराव कांहीं सुचल्या-सारखें करून म्हणाला, "पण तिसरा एक संभव तूं नाहीं सांगितलास ?"

शामराव म्हणाला, "तो कोणता? ' पंडितराव म्हणाला ' तो हाच कीं, तुझ्या बहिणीचा अंत झाला, पण मुलगा स्नानाला न जातां वाळवंटावर बसला. तुझी बहीण नाहींशी झाली. पण तिचा मुलगा—तुझा भाचा—मात्र वांचला."

तेव्हां शामराव किंचित हंसून म्हणाला—" मग चौथाहि एक संभव नाहीं कां म्हणतोस म्हणजे माझी बहीण व भाचा दोघेहि जिवंत असून कोठें तरी गुप्त वेषानें वावरत आहेत ! पण संभवांचें कोरडें बोलणें बोलून काय उपयोग ? माझा भाचा मागें उरता तर तो कोणाला सांपडून त्यानें आमच्याकडे पोंचविला नसता कां ? त्याला चोरून नेऊन कोणाला काय लाभ होता ? तेव्हां खरी गोष्ट हीच दिसतें कीं, दोघांचाहि एकदमच नाश झाला असावा. कोंकणची मुलें देशावर नेऊन नांवारूपाला आणायची तुझी हौस तूं आतांच बोलून दाखविलीस, त्यावरून सुचलें तें पण खरोखर घडलें तच सांगतों. माझ्या बहिणीला मी धीर देऊन सांगत असे कीं, ताई तुझा मुलगा पुढें नांवारूपाला येईल.त्यावेळीं खरोखरच मनांत असें येई कीं, पंडितराव तुझा चालता काळ व वाढता उत्कर्ष पाहून हा मुलगा पुढें मागें तुझ्या स्वाधीन करावा. म्हणजे तूंच त्याला नांवारूपाला आणशील.

आणि माझ्या बहिणीच्या दुःखाचे परिमार्जन करशील. पण ती आशा मी आतां कोणाकरितां करूं ! ''

इतकें बोलून एक दीर्घ सुस्कारा टाकून शामरावानें हा दुःखद विषय संपला असें सुचविलें. पण ' आख्याति पृच्छति ' ' सांगतो व विचारतों.' हेंच मित्रप्रेमाचें लक्षण नव्हे काय ? त्या प्रमाणें शामराव पुढें म्हणाला—
'' अरे, पण पंडितराव तूं आपल्या या लहान मुलीला बरोबर घेऊन कोठें कोठें फिरणार ? तिला तिच्या आजोळीं ठेवतास तर बरें झालें नसतें का ! तुम्ही शिपाई गडी एकदां स्वारीवर मुलुख-गिरीवर निघालां म्हणजे कुठेंच्या कुठेंच भटकायचे. मोहिमेवर लढाईवर जावयाचे. अशा वेळीं आपल्या ममतेचें व प्रेमाचे माणूस बरोबर ठेवणें म्हणजे गळयांत लोढणें बागविण्यासारखेंच नव्हे काय ? ''

पंडितराव म्हणाला '' तूं म्हणतोस तें खरें, शामराव. पण मला मुलीला डोळयाआड करवतच नाहीं. आतां मी एकसारखा मुलुखभर भटकत राहीनच असें नाहीं. शिवाय कोणच्याही स्वारींत मुलुख—गिरींत कोणाचा तरी कबिला बरोबर असतोच. मराठी शिपाईगिरींत कडवेपणाच्या इतकीच कुटुंबवत्सलताही असते. तशांतून मुलीची वृत्ति पहातों तीहि पाणीदार दिसते. ती कधींच घर कोंबडी होणार नाहीं. आम्हा मराठ्यांच्या स्त्रिया कमरेला तरवार बांधून लढाईवर जात नाहींत हें खरें. पण राज-कारणांतल्या प्रमाणें शिपाईगिरीच्या कामांतहि त्या हौसेनें लक्ष घालतात. पुढें मागें लवकरच मला तिचें लग्न करणें आहे. तेव्हां तिच्या वृत्तीला शोभेल असाच एखादा जांवई मिळाला म्हणजे मी तिच्या काळजींतून मुक्त होईन. मी कोंकणचा अभिमानी असलों तरी, बायकांना कोंकणच्या घर कामांत शेती बागायतीच्या कामांत राबवून त्यांची बुद्धि कवडीमोल करावी असें मला वाटत नाहीं. आम्ही कोंकणी पुरुष जसे तशाच कोंकणी स्त्रियाही देशावर गेल्यावर, अनेक प्रकारें आपलें बुद्धि वैभव प्रगट करतात, असें मी पाहिलें आहे. तात्पर्य, मुलगी बरोबर बागविण्यानें झाला तर माझा

व तिचा फायदाच होईल. तुझा भाचा जिवंत असता तर त्यालाहि मी मुलासारखा बरोबर नेऊन वाढविला असता. पण दैवगति विचित्र हेंच खरें."

इतकें बोलणें होत आहे तोंच कुणक्या पंडितरावांच्या मुलीला हातीं धरून आसपास हिंडून परत आला. पण तो मोकळ्या हातानें आला नाहीं. त्यानें तिच्या करितां बकुळीचीं व पारिजातकाचीं पसा पसाभर फुलें आणि जांभळें करवंदें गोळा करून आणलीं होतीं. त्यांसह त्यानें मुलीला त्या दोघांच्या पुढें नेऊन उभी केली, व "सांभाळा हिला" असें म्हणून तो मज जवळ येऊन बसला. त्याच्या संगतींत मुलगी मोठ्या उत्साहानें व आनंदानें हिंडली असें तिच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. फुलें व फळें यांची ही लूट कुणक्यानें मिळवून दिली ती त्या बाल स्वभावाच्या मुलीला राज्यासारखीच वाटली. आणि आपण इकडे तिकडे हिंडत असतां, आपला सोबती झाडावर कसा जलद चपळाईनें चढे, वानरांना गुरांना कसा धीट-पणानें हांकून काढी, कांट्यांनीं ओरखडलें व रक्त निघालें तरी तें सहज कमरेच्या वस्त्राला पुसून आणखी पुढें कसा जाई, या निरनिराळ्या गोष्टींचें कौतुक करून ती तें आपल्या बापाला सांगूं लागली तेव्हां त्या दोघां स्नेह्यांना मोठी मौज वाटली.

शेवटीं शामराव म्हणाला—" तूं कुणकेश्वराहून पुढें कोठें जाणार व कोणच्या वाटेला लागणार?" त्यावर पंडितरावानें सांगितलें कीं, "माझ्याकरितां एक मोठी होडी मुद्दाम खाडीतल्या माझ्या घरच्या बंद-रांत नांगरवून ठेविली आहे. आणि आज रात्रींच, पाणी उतरूं लागले म्हणजे, मी आपल्या गांवच्या खासगी बंदरांतून विजयदुर्गाकडे निघणार."

इतकें बोलणें झाल्यावर आतां उशीर होतो म्हणून दोघेही उठले. दोघांनीं मिळून देवदर्शन घेतलें. आणि मित्रप्रेमानें एकमेकांना आलिंगन देऊन शामरावानें दक्षिण दिशेची वाट धरली, व पंडितराव मुलीला हातीं धरून बाहेर उभ्या असलेल्या शिपायाचे खांद्यावर तिला बसवून, उत्तरेकडची घाटी चढूं लागला.

## ८

हे दोघे गेल्यावर मी काय करावें याचा निश्चय आपल्या मनांत तावडतोब केला. तो इतका जलद कसा झाला याचें माझें मलाच आश्चर्य वाटत. पण ईश्वराच्या प्रेरणा अशाच क्षणमात्रांत होतात. ईश्वरी प्रेरणा म्हणजे ती विजेची चमक नव्हे तर काय ? पंडितरावाची पाठ फिरली व तो पांच पन्नास पावलें चालून गेला, तोंच मी आपलें आसन व कमंडलु उचलून घेतलें. वस्त्रांचें एक छोटेसें गांठोडें होतें ते खाकेला बांधलें, व कुणक्याचा हात धरून मी त्याला देवळाच्या गाभाऱ्याच्या तोंडाशीं घेऊन गेलों. आणि म्हणालों, " कुणक्या देवाला नमस्कार कर. आणि मी सांगेन त्याप्रमाणें यापुढें वागण्याची देवापुढें शपथ वहा. "

असल्या दोन्ही गोष्टी मी पूर्वीं कधींच केल्या नव्हत्या. त्या आज केल्या असें पाहून कुणक्या किंचित गांगरला व गोंधळला. त्यानें देवाला नमस्कार तर केलाच. मी न सांगतांही तो त्यानें केलाच असता. कारण ती त्याच्या सरावांतली गोष्ट होती. पण ' मी सांगेन त्याप्रमाणें ऐकेन ' असें तोंडानें म्हणून देवाची शपथ वाहणें हें त्याला आज अगदीं नवें नवलाचें वाटलें.

तो माझ्या तोंडाकडे निरखून पाहूं लागला व म्हणाला, " तुमची आज्ञा आजवर मी कधींतरी मोडली आहे काय, बुवाजी ! जी तुमची आज्ञा तीच देवाची. मग आज मजकडून शपथ घववून कधीं न मागितलेली जामिनकी कां मागतां ? "

त्याला काय उत्तर द्यावें हेंच मला कळेना. म्हणून मी त्याचें तोंड कुरवाळून म्हणालों, " मी तें सर्व तुला समजाऊन सांगेन. पण ते वाटेनें चालतांना. तुला शपथ घेण्याला सांगितलें तें माझी आज्ञा तू पाळणार नाहींस म्हणून नव्हे, तर मी मनःसंकल्पाचा उच्चार करीत असतां तुझ्याही तोंडून देवाचें नांव निघालें म्हणजे माझ्या संकल्पाला दुप्पट बळ येईल. "

या माझ्या खुलाशानें त्याला फारसा बोध झाला नसावा. पण माझी घाई व तोंडावर दिसणारा आवेश पाहून, अधिक न बोलतां, चट्‌दिशीं मीं सांगितलेले शब्द कुणक्यानें उच्चारले. त्या बरोबर मीहि आवरतें घ्यावें म्हणून त्याच्या डोक्यावर हात ठेवून आशीर्वाद दिला. आणि त्याचा हात धरून एकदम देवळांतून बाहेर पडलों. ही घाई करण्याचें माझें कारण असें कीं, मला पंडितरावाला दृष्टि आड होऊं द्यावयाचें नव्हतें. त्याला न कळत, पण त्याच्या पाठोपाठ, तो जाईल तिकडे जावयाचें होतें. तो मला फक्त दिसेल इतका दूर मी राही. त्यामुळें मी कुणक्याशीं हलक्या आवाजानें बोलत होतों त्याची चाहूलहि पंडितरावाला लागणें शक्य नव्हतें. आणि मी त्याच्या मागून मुद्दाम जात आहे अशी कल्पनाही त्याला येण्याचें कारण नसल्यामुळें, त्यानें मागें वळून मळकडे केव्हांही पाहिलें नाहीं.

इतकी खबरदारी घेतल्यावर मी कुणक्याला आपले विचार हळू हळू सांगूं लागलों. मी म्हणालों, " बेटा, तूं मला केव्हांही लहानच असलास तरी पुढें तूं काय करावें याचा विचार तूं आतांपासून केला पाहिजेस. "

तो म्हणाला, " त्यांत विचार तो कसला करावयाचा ? तुम्ही गुरुजी व मी तुमचा आवडता चेला. याहून पलीकडे जगच मी जाणत नाहीं. तुमची सेवा आजन्म करावी हाच माझा विचार. "

तेव्हां मी म्हणालों, " तूं हे तोंड देखलें बोलतोस असें मी म्हणत नाहीं. पण खरेंच सांग कीं, या बैराग्याच्या गोसाव्याच्या वेषानें व वृत्तीनेंच जन्म घालवावा असें तुला वाटतें काय ? मी तुला दोष देत नाहीं. कारण मी तुला चेला केला तो तुझ्या अज्ञानावस्थेंत. तूं सज्ञान मोठा झाल्यावर केलेला नाहीं. अशांतहि तूं मजवर आज निष्ठा ठेविलीस. आणि ती तशीच पुढें ठेवशील यांत शंका नाहीं. परंतु तुझी बुद्धि व तुझा स्वभाव ही लक्षांत घेऊन, तुझ्या आयुष्याला योग्य तेंच वळण लावण्याची जबाबदारी मजवर पडते. म्हणून, आजवर तीं दोन्ही लक्षांत घेऊन, मी मनाशीं असें ठरविलें आहे कीं, तुला ब्रह्मचर्याची दीक्षा न देतां गृहस्थाश्रमाची दीक्षा द्यावी. "

कुणक्या म्हणाला, " पण गुरुजी त्यांत तुमची संगत सोडावी लागेल त्याची वाट ? "

मी म्हणालों " शरीरांची संगत हीच कांहीं जगांतली खरी एकच संगत नाहीं. मनुष्यांना मनोमनानें संगत ठेवतां येते. तूं यापुढें कोठेंहि असलास तरी मनानें मी तुझ्याजवळ आहे असेंच समज. आणि तुला माझी फारच अगत्याची आठवण होईल, किंवा माझ्या मदतीची जरूर पडेल, तेव्हां एकाग्र मनानें माझें स्मरण कर. तुझें स्मरण मला कळावें अशी दैविक शक्ति माझ्यांत आहेच असें नाहीं. परन्तु तुझ्या संबंधांत आजवर असे अकल्पित योगायोग घडले आहेत कीं, तुझ्या माझ्या आठवणीनें तुझी माझी समक्ष गांठ पडावी असाही योगायोग ईश्वरकृपेनें घडेल असें मन सांगतें. गोसाव्या वैराग्याच्या आयुष्य क्रमावर तुझी श्रद्धा नाहीं. पण त्या बद्दल मी तुला दोष देत नाहीं. माणसाची बुद्धि, त्याची आवड, त्याची अभिरुची हीं सर्व पूर्व जन्मसंस्कारावर अवलंबून असतात तेंच खरें आहे. कारण रात्रंदिन माझा सहवास असतां तुझी बुद्धि गोसावीपणापेक्षां लौकिक व्यवहारांत अधिक चालतें हें मी पूर्वीच ओळखलें आहे. आणि माझ्याहि मनांत अशीं कांहीं नवीन प्रेरणा झाली आहे कीं, माझ्या चेल्यानें, माझ्या सत्शिष्यानें,लंगोटी घालून तीर्थाटणें करण्यापेक्षां शिपाईगिरी सरदारकी करून महाराष्ट्राचें नांव हिंदुस्थानभर गाजविण्याला मदत करावी आणि लौकिकांतलें वैभव सर्व भोगावें. अशा कामीं तुला सहाय करूं शकेल अशा एका मनुष्याच्या पदरीं तुला घालण्याची संधि मला लाभण्याचा आज योग दिसतो. यापुढें तूं आपला लौकिक चरित्रांतील तोंच गुरू मान.

कुणक्या म्हणाला ' असा गुरु मला कोण भेटणार ? ' तेव्हां दूर अन्तरावर चालत असलेल्या पंडितरावाकडे बोट दाखवून मी म्हणालों ' देवानें यापुढें त्या मनुष्याशीं तुझी सांगड बांधलेली दिसतें. तो तुझा भाग्योदय करणारा होईल असें मला वाटतें. दैव आपली परीक्षा पहातें तशी आपणही त्याची परीक्षा पहावी. तो गृहस्थ आज पेशव्यांचा कोणी प्रधान किंवा मोठा सरदार आहे असें नाहीं. परन्तु कोंकणचीं होतकरू मुलें देशावर

नेऊन त्यांना नांवारूपाला आणण्याची उमेद धरणारा असा तो आहे. न जाणों, त्याची उमेद सफल करणारी त्याला चार दुसरीं मुलें यापूर्वींहि मिळालीं असतील, तर तूंहि एक पांचवा होशील. किंवा त्या चार इतर मुलांपेक्षांहि तूंच त्याची उमेद अधिक सफळ न करशील कशावरून ? '

कुणक्या म्हणाला ' पण त्याला तुम्ही माझ्याकरितां शब्द टाकला, आणि तो होय म्हणाला असें मी तर कुठें पाहिलें नाहीं. मग माझी शिफारस त्याच्याकडे कोण करील ? "

मी म्हणालो, " हां, ठीक विचारलेंस. स्वतःच्या शिफारशीकरितां दुसऱ्यावर अवलंबून राहाणारा मनुष्य जगांत काय करणार हें दिसतेंच आहे. म्हणून तुझी शिफारस त्याच्याकडे तुझी तूंच करावी अशी माझी इच्छा आहे. आणि ती तूं चांगली करशील अशी माझी खात्रीहि आहे. कंबरेला दोरी बांधलेला मनुष्य आपल्याकडून कितीहि चांगलें व बेगुमान पोहला तरी त्याचें श्रेय, त्याला धीर देणारी दोरी हातांत धरणाऱ्या, तीरावरच्या माणसालाच लोक देतात. तुझ्या कर्तृत्वाचें पराक्रमाचें श्रेय मला घ्यावयाचें नाहीं. कमरेला दोरी लाविल्याशिवायच मी तुला या लौकिक संसाराच्या नदींत ढकलून देणार आहे. "

माझें हें भाषण ऐकत असतां, कुणक्याला खरोखरच मनांतून कांहीं विशेष प्रकारची उमेद चढत असावी असें दिसलें. त्याची गुरुनिष्ठा खोटी नसली तरी, त्याच्या मनांतील आवडीला माझ्या आज्ञेची जोड मिळाली हें त्याला दुधांत साखर पडल्यासारखें वाटलें असावें. म्हणून गुरुनिष्ठेचें लाघवी औपचारिक बोलणें त्यानें लवकरच टाकून दिलें. आणि माझ्या नवीन सूचनेला त्यानें इतक्या लवकर संमति दर्शविली कीं, त्यानें पडत्या फळाची आज्ञा घेतली असेंच एखाद्या तार्किक तिऱ्हाइतानें म्हटलें असतें.

कुस्तीच्या फडांत लंगोट लावून उतरणारा तरुण पैलवान आधीं बस्तादाच्या पायाला हात लावून रंगणांत उतरतो हें खरें. परंतु त्यावेळीं त्याचें खरें बळ स्वतःच्या उमेदीचें, व महत्वाकांक्षेच्या आत्मविश्वासाचेंच, असतें.

घरच्या घरीं या हातावरून त्या हातावर झेलावी त्याप्रमाणें प्रेमळ आई-बापानीं पोसलेल्या मुलांना घराबाहेर पडणें हें संकट वाटो. पण आज दहा बारा वर्षांपर्यंत माझ्या बरोबरीनें ज्यानें नुसती लंगोटी लावून तीर्थयात्रा केल्या, भिक्षेवर उदरनिर्वाह केला, रानावनांत परिभ्रमण केलें, वारा पाऊस मानला नाहीं, व वेळीं दगडाचेंहि अंथरुण करून झोंप काढली. त्याला मी आज दूर करून, जगावर लौकिक संसारांतील संचाराला पाठविलें, तर तो भिऊन जाईल किंवा कावराबावरा होईल हें शक्यच नव्हतें. आणि त्याच कारणा-करितां मलाहि, त्याला मायेच्या ओल्या देंठापासून तोडून हवेंत गिरक्या घेण्याला फेकतांना, कांहीं अवघड वाटलें नाहीं. जें अवघड तें तो आधींच करून चुकला होता. नदींत पोहणाराला विहिरींत पोहण्याचें अवघड कसें जाईल ? तात्पर्य, मी त्याच्या यशाची हुंडी जी त्याच्या आत्मविश्वासावर लिहिली ती त्यानें स्वीकारली. ती बिनबोभाट पटेल व वटाविली जाईल अशी मला खात्री वाटत होती.

या नव्या कार्यक्रमांचा प्रारंभ त्यानें कसा व कोठें करावा याचा विचार मी करीतच होतो. आणि तो पुरा करण्याला परिस्थितीकडून ज्या अधिकाधिक सूचना मिळतील त्या तत्परतेनें घेण्याची मनाची तयारी ठेवून, पंडितरावावरची दृष्टि न ढळूं देतां, आम्ही त्याच्या मागून चाललों.

नंतर एक मोठी घाटी चढून उतरल्यावर आम्हाला एक कोंकणी बागायती गांव दिसला. हा गांव खाडीच्या कांठानें दूरवर पसरलेला असून, खाऱ्या पाण्यानें शेती बागायती बुडूं नये म्हणून या गांवच्या लोकांनीं एक लांबलचक व बराच रुंद असा पक्का बांध बांधलेला होता. त्या बांधाच्या एका वळणांत, होड्यांतून व पडावांतून चढण्याउतरण्याकरितां, मोठमोठाले दगड टाकून बंदरासारखी सोय केली होती. आणि त्याच बंदरांत एक छोट्या गलबतासारखा म्हणजे मोठासा पडाव, नांगर टाकल्यामुळें, स्थिर झालेला मला दिसला. बंदरची वाट सोडून पंडितराव नारळी पोफळीच्या बागेंतून आपल्या घराकडे वळला, तेव्हां मात्र मला त्याची पाठ सोडावी लागली. पण आज रात्रीं याच बंदरांत नांगरलेल्या याच पडावानें तो विजयदुर्गाकडे

निघणार असा पक्का तर्क बांधून, मी दुसऱ्या दिशेला असणाऱ्या झाडींत शिरलों. मात्र तेथून बंदर स्पष्ट दिसत होतें. आणि पूर्वी ज्या माझ्या डोळ्यांनीं पंडितरावाची पाठ सोडिली नव्हती त्यांनीं आतां बंदरांतील होडीवर सक्त पहारा ठेविला.

फळांनीं भरलेल्या बागेंत गोसावी वृत्तीच्या एक दोन माणसांना काय कमी पडणार ? आमची भूक निवारण्याचें काम सहज पार पडलें. आणि आतां कुणक्याच्या वियोगाची घटका भरत आली असें वाटून त्याला पूर्वींहून अधिक विश्वासांत घेऊन, त्यानें पुढील आयुष्यक्रमाच्या उद्योगाला कसें लागावें याचे काल्पनिक धडे देत मी वेळ घालविला. वास्तविक संसारांतील धडे देण्याइतका मला अनुभव नव्हता, म्हणून अधिकारहि नव्हता. मुलगी सासरीं जातांना आई तिला उपदेश करिते, त्या अनुभवामुळें तिला अधिकार आलेला असतो. पण मला अनुभवाचा अधिकार नसला तरी प्रेमाचा अधिकार होता. म्हणून या कामीं शिक्षण देतांना मला आपण कांहीं भलतें करतों असें वाटलें नाहीं.

पंडितराव व कुणक्या यांची गांठ पडतांना माझी मध्यस्ती नसावी असें मी ठरविलें होतें. म्हणून पडाव अजमासें केव्हां निघेल, कोठून निघेल, व कुणक्यानें पंडितरावाशीं गांठ घालावयाची ती त्याची त्यानें कशी घालावी, याविषयीं मी एक योजना मनांत ठरवून त्याला सांगितली व त्यालाहि ती पटली. तो दिवस पौर्णिमेचा होता. यामुळें स्वच्छ चांदणें पडलेलें असून खाडींत वाहणारें भरतीचें पाणी चकाकत होतें. त्यावर तो पडाव मंदगतीनें खालवर हालत होता. मध्यरात्रीनंतर ओहोटीला सुरुवात झाल्यावर, पंडितराव व त्याजबरोबरचीं दोन तीन माणसें होडीकडे येण्याला निघालीं, असें पाहून कुणक्याला घेऊन मी पुढच्या दिशेला, होडीच्या मार्गावर, दोन अडीचशें पावलें जाऊन उभा राहिलों. आलेलीं माणसें होडींत चढलीं. नावाड्यानें नांगर उचलला. पंडितरावाला निरोप देण्याला आलेलीं माणसें परत निघालीं.

या वेळीं वारा मुळींच नसल्यानें नावाडी केवळ ताजेचा उपयोग करून काठाकाठानें नाव चालवीत होते. ती मंदगतीनें बांधाजवळून

आमच्या नजीक आलेली पाहातांच, मी कुणक्याच्या डोक्यावर हात ठेऊन म्हणालों, " बेटा घे, आतां देवाचें नांव आणि टाक उडी पडावांत. "

आम्हां दोघांना पडावांतील लोकांनीं बांधावर उभे राहिलेले कदाचित पाहिलेंहि असेल. परंतु पौर्णिमेच्या जोरगतीनें बांध न कळत फुटूं नये म्हणून, रखवालीला उभे केलेलेच आम्ही कोणीतरी असूं, अशा समजुतीवर आमच्या समोर पडाव येऊन ठेपेपर्यंत त्यांतील कोणी आमच्याकडे लक्ष दिलें नाहीं. पण आमचेंहि लक्ष कार्य साधण्याकडे होतें. आम्हाकडे कोणी पाहातो कीं न पाहातो याकडे नव्हतें. म्हणून कुणक्यानें एकदम पडावाच्या आतल्या फळ्यांवर उडी घेतली. आणि त्याची उडी आंत सुरक्षितपणें पडलेली पाहतांच मीहि " जय शंकर " असें मोठ्यानें म्हणून पडावाच्या मागच्या बाजूला खाडींत उडी घेतली. आणि जलदीनें हात टाकीत खाडीचें परतीर गांठलें.

अशा रीतीनें बारा वर्षांच्या सहवासानंतर कुणक्याची व माझी ताटातूट झाली. त्याची माझी पुन्हा कोठें, केव्हां व कशी गांठ पडली याचाही वृत्तांत असाच सांगण्यासारखा आहे. म्हणून तो मी पुढें केव्हां तरी सांगेन.



प्रकरण दुसरें

# २ नाविक जीवनांत प्रवेश

कुणकेश्वरच्या यात्रेंत झालेल्या दिवसभरच्या श्रमानें पंडितराव बराच थकला होता. पडाव चालू होतांच त्याला स्वस्थपणा वाटला. मन एकाग्र झालें. पडाव चालला होता त्याच्या उलटया दिशेला तोंड करून खाडीवर पडलेल्या चांदण्याची शोभा तो पहात होता. इतक्यांत त्याच्या डोक्यापाठीमागच्या बाजूला फळ्यांवर एकदम कांहीं तरी येऊन पडल्याचा आवाज झाला. पडाव अगदींच लहान नव्हता यामुळें त्या धक्यानें तो फारसा डळमळला नाहीं. परंतु पाण्यावरील वाहनाचा तोल इतका नाजूक असतो कीं, ज्या बाजूला वजन पडेल त्या बाजूला तें किंचित कलल्याशिवाय राहात नाहीं. पडावांत कांहीं पडल्याच्या आवाजाबरोबर सुकाण्या दचकून 'हें काय' म्हणून ओरडला. पंडितरावानें मागें पाहिलें तो, कमरेवरचा सर्व भाग उघडा असलेला एक जटाधारी मुलगा तक्त्यावर उभा राहून आपला तोल संभाळीत होता.

मांडीवर डोकें ठेवून झोपीं गेलेल्या मुलीला बाजूला ठेवून, उभा राहूना पंडितरावानें त्या मनुष्याचे दोन्ही दंड आपल्या हातानें धरले, व चांदण्याच्या प्रकाशांत तो त्याच्या तोंडाकडे निरखून पाहूं लागला. त्याचा एक नोकर व

दोघे नावाडी जवळ येऊन " कोण तूं? पडावांत उडी कां घेतलीस? बोल-तोस कीं नाहीं? " असे प्रश्नावर प्रश्न त्याला विचारून गोंगाट करूं लागले. तेव्हां पंडितराव त्यांना म्हणाला " थांबा गप्प रहा. गोंगाट करूं नका. हा कोण तें आपोआप कळेलच. " पण त्याच्या या शांत वृत्तीचें खरें कारण असें कीं, त्या मनुष्याचा चेहरा निरखून पाहतां तो कुणकेश्वरच्या देवळांत भेटलेला,व त्याच्या मुलीला हिंडवून आणलेला, गोसाव्याबरोबरचा मुलगा असें त्याला पक्कें आठवलें.

कोकणांत एखादी अकल्पित गोष्ट घडली म्हणजे ती भूत चेष्टा मानण्याकडे लोकांची पहिली प्रवृत्ति असते. नावाडी वगैरे लोक अशिक्षित व भोळसर. पडावांत उडी मारलेला मनुष्य दिसला तरी तें भूत असेंच ते कांहीं वेळ मनानें घ्यावयाचे. म्हणून ते कावरेबावरे झालेले पाहून त्यांना शांत करण्याकरितां पंडितराव म्हणाला " अपरात्रीं पडावांत उडी मारली हें सोडुन द्या. पण हा मुलगा मी पूर्वीं पाहिलेला आहे. तुम्ही घाबरूं नका." मग स्वतः त्यानें खालीं बसून त्या मुलाला आपल्या समोर बसवून घेतला, व नावाड्याना आपल्या कामाला लागा म्हणून सांगितलें.

थोड्या वेळानें ओहोटीच्या प्रवाहावर पडाव आपोआप चालूं लागला. तेव्हां नावाड्यांनीं खाडीची कडा सोडून पडाव मध्यपात्रांत घेतला. आणि तेहि नाळीच्या बाजूला स्वस्थ बसले. फक्त सुकाण्या सुकाणावर हात ठेवून पडावाला हवी तशी गति मधून मधून देत होता.

मध्यंतरी झालेल्या गडबडीनें पंडितरावाची मुलगी जागी झाली.पण तिलाहि त्यानें थोपटून " नीज. कांहीं नाहीं. " असें सांगून फिरून झोंपी घालविली. मात्र खाडीवरील चांदणें पाहण्याची पंडितरावाची जी तंद्री पूर्वीं लागली होती ती यापुढें टिकणें शक्य नव्हतें.त्याच्या विचाराला एक नवाच विषय मिळाला. म्हणून त्यानें त्या मुलाशीं बोलणें सुरू केलें.

" कायरे, कुणकेश्वरास त्या गोसाव्याबरोबर होतास तो तूंच ना? "

" होय. "

" मग तूं एकटाच इकडें कुठें आलास ? "

" एकटा नाहीं आलों. पडावांत मी उडी मारीपर्यंत बुवाजी-माझे गुरुजी-माझ्याजवळ बांधावर उभे होते. मी आंत उडी मारतांच त्यांनीं स्वतः सुकाणूच्या बाजूला खाडींत उडी घेतली. आणि, ते पहा, खाडींतून पोहत पोहत त्यांनीं पर तीर गांठलें असून पलीकडच्या बांधावरून ते चालत आहेत. पाण्यांत उडी टाकतांना " जय शंकर " असा शब्द त्यांनीं केला तो आपण ऐकला नाहीं काय ? "

" होय. ऐकलासा वाटला. पण तुझ्या उडीमुळें आमचं सर्व लक्ष इकडेच लागलं. असो. बरं, तूं अशी पडावांत उडी कां मारलीस ? "

" मला पडावांतून तुमच्याबरोबर यावयाचं होतं. आणि एरव्हीं मला बरोबर न्या असं तुम्हाला म्हटलं असतं तर तुम्ही तें ऐकलं नसतं."

" तें काय म्हणून ? तुलाच काय, तुझ्या गुरूलाही गरीब बिचारे यात्रेकरू म्हणून आम्ही पडावांतून विजयदुर्गपर्यंत नेलं असतं कीं ! "

" हो. तेंहि खरंच. कुणाला कांहीं हंशील न देतां, हव्या त्या लोकांच्या वाहानांतून हिंडण्याची यात्रेकरूंना मोकळीकच असते ! पण मी यात्रेकरू म्हणून निघालेला नव्हतों. यामुळं तुम्ही यात्रेकरूंना नेण्यासारखे सज्जन आहां असं माझ्या लक्षांत आलं नाहीं. "

" तुझ्या गुरुजीनी तुझ्याप्रमाणंच या पडावांत उडी कां घेतली नाहीं ? "

" या खाडीपासून त्यांचे व माझे मार्ग भिन्न व्हावयाचे होते म्हणून. ते खाडीपलीकडे गेल्यावर एकटेच काशी प्रयागाकडे पाय वाटेनें यात्रेला जाणार आहेत. आणि मला कोणच्याच यात्रेला जावयाचें नाहीं. चेला म्हणून मला दीक्षा देण्याचं रहित करून त्यानीं मला ' संसार कर जा ' असा आशीर्वाद देऊन सोडून दिलं. "

" मग अशा असंभावित रीतीनं आगंतुकी करून पडावांत अपरात्रीं उडी घेणं हा संसारांत पडण्याचा पहिला धडा म्हणून तूं गिरविलास कीं काय ? "

" नाहीं. मला गुरुजीनीं आज्ञा केली कीं हे गृहस्थ तुला आयुष्यांतला पुढचा मार्ग दाखवितील. तुझं कल्याण करतील. कुणकेश्वरच्या सभामंडपांत तुम्ही आपल्या मित्रांशीं बोलत होतां. कोकणांतून तरुण मुलं देशावर नेऊन तुम्ही त्यांना अन्नाला लावतां, काम देतां, काम शिकवितां, पराक्रम करवितां, असं दिसलं. म्हणून गुरुजीनीं मला आज्ञा केली कीं माझं चेलेपण सोड आणि या नव्या गुरूचं चेलेपण पतकर. "

" कोणाजवळहि शिष्यत्व पतकरावयाचा तुझा मार्ग अपूर्व व धाडसी दिसतो. पण तूं दिवसा मला भेटून माझ्याबरोबर येण्याची इच्छा मला दर्शवितास तर ? "

" मी गोसाव्याचा चेला कोकणचा मुलगा नव्हे, कोणी उत्तर हिंदुस्तानचा, असं आपणाला वाटलं असतं. गोसाव्यांचा सगळा भर उत्तरेकडे. खालीं कोकणांत ते फारसे दिसत नाहींत. आणि गुरुजीनीं तर मला सांगितलं कीं, तूं कोकणचाच मुलगा आहेस, तेव्हां तुझ्यावर कृपा करून हे गृहस्थ, म्हणजे आपण, मला पदरीं ठेवून नांवारूपाला चढवाल."

" पण तुझ्या गुरुजींनीं तुला कोकणचा मुलगा म्हटलं म्हणून माझी तशी खात्री कशी पटणार ? "

" हो. तेहि खरंच. पण माझे गुरुजी कधीं खोटं बोलत नसतात."

" चांगल्या शिष्याला शोभेल असंच तूं बोललास हें खरं. पण तुझे गुरुजी गेले निघून, माझी तुझी गांठ न घालतां ! आणि आतां तर फक्त तुझी माझीच गांठ. मग तूं कोकणचा मुलगा अशी तूं मला खात्री कशी करून देणार ? "

हें ऐकून तो मुलगा कुंठित झाला. पण किंचित् विचार करून म्हणाला, " मी लहान आहें. तरी गुरुजी म्हणाले त्यावर विश्वास ठेवून मला कोंकणचा मुलगा म्हणून म्हणा. फिरून गुरुजींची गांठ पडेल तेव्हां मी तुमची समक्ष खात्री करून देईन. मी माझ्यापुरतं आज इतकंच म्हणतों कीं, मला कोकण आवडतं म्हणूनच मला कोकणचा मुलगा म्हणा ना ! "

" शाबास तूं हें कारण छान सांगितलेंस. पण तुला कोकण आवडायला तूं पूर्वी इकडे कोठें रहात होतास काय ? "

" नाहीं. आणि म्हणूनच ती गंमत कीं, कोकणांत लहानपणीं न राहतांहि मला कोंकण आवडतं. "

शेवटीं, या मुलाला आडवे तिडवे प्रश्न आणखी विचारून कुंठित करण्यांत अर्थ नाहीं, त्यानें लगट करण्याकरितां हा विलक्षण मार्ग पतकरला खरा, तरी पण तो निरुपद्रवी आहे खास. पोरसवदा कोवळा मुलगा आहे. तरी उत्तराला प्रत्युत्तर देण्याइतका चलाख बुद्धीचा दिसतो. आणि मराठी चांगलें बोलतो. तेव्हां हा प्रत्यक्ष कोकणांत राहणारा नसला तरी कोकणांत राहणाऱ्या लोकांचा नातेवाईक असेल. न जाणो, एखाद्या भोळ्या आईबापांनीं नवस फेडण्याकरितां त्याला या गोसाव्याच्या स्वाधीन केला असेल. आणि त्या गोसाव्यानेंहि देवळांतील आमच्या बोलण्यावरून सुगावा लावून माझ्याशीं अशी गांठ घालण्याचा सल्ला दिला असेल. इतका विवेक मनाशीं करून मुद्याचा आणि स्वाभाविक म्हणून पंडितरावानें एकच प्रश्न केला.

तो म्हणाला " खाडी पोहून गेला तो गोसावी तुझा गुरू. पण तुझे आईबाप कोण ?" तेव्हां कुणक्यानं आकाशाकडे पाहून हात जोडून कापऱ्या आवाजानें त्याला उत्तर दिलं, " माझे आईबाप कोण हे, मी देवाची शपथ सांगतों कीं, देवालाच माहीत. बुवाजी हे माझे वडील नव्हेत. तरी पण माझे आईबाप कोण हें त्यांनी मला कधींच सांगितलं नाहीं. आणि त्यांच्या प्रेमामुळें मीहि त्यांना तें कधीं विचारलं नाहीं. "

हें खऱ्या भावनेचें प्रामाणिक उत्तर ऐकून यापुढें त्याला एकही प्रश्न विचारावयाचा नाहीं असें पंडितरावानें ठरविलें, आणि तो म्हणाला, "कांहीं असो. मुला तूं भला दिसतोस. मी तुला बरोबर तर नेतोंच. पण पुढें तुझं काय होणार, किंवा मी तुला मदत काय करणार, याचा विचार आज नको. आपणाला विजयदुर्गला पोंचावयाला अजून पुष्कळच काळ लागेल, उजाडून तर जाईलच. तेव्हां आतां तूं झोप घे. मीहि पण झोप घेतों."

असें म्हणून हाताशीं असलेला गाशा कुणक्याकडे फेकला. आणि पडावांतील तक्त्यावर नोकरानं त्याचा बिछाना पसरला होता त्यावर लवंडून वर चांदण्यांतून दिसणाऱ्या प्रकाशमान आकाशाकडे पहात हळूहळू तो झोपी गेला. मात्र त्यानें आधीं पडावाचे नावाडी व आपला नोकर यांना बजावून सांगितलें कीं,या मुलानं पडावांत अशी उडी टाकूं नये ती टाकली खरी. पण त्याच्याकडे फारसा बोल नाहीं. विक्षिप्त गोसावी गुरू असले म्हणजे त्यांचे चेले असलेच कांहीं तरी अघटित करावयाचे, ही जगांतली रीतच आहे. आतां कोणी त्याला बोलूं नका. त्याला स्वस्थ निजूं द्या. उद्यां विजयदुर्गला पोंचल्यावर त्याची पुढें काय व्यवस्था करायची तीं मी किंवा तो स्वतः करील.

## २

दुसऱ्या दिवशीं पडाव विजयदुर्गला पोंचलां. सकाळीं पंडितरावाची मुलगी जागी झाल्यावर इकडे तिकडे पाहतां तिची नजर त्या मुलाकडं गेली व तिनें त्याला चटकन ओळखलं. आणि ती आपल्या वडिलांना म्हणाली,"बाबा,हाच मुलगा त्या देवळांत काल आपणाला भेटला की.त्यानंच मला फुलं तोडून दिलीं,जांभळं, करवंदं गोळा करून दिलीं. तो आपणाबरोबरच येणार ना बाबा ?" आणि बापाच्या उत्तराची वाट न पहातां तीच त्याला म्हणाली, " चलरे गोसाव्या आमच्याबरोबर. विजयदुर्गांत देवळं आहेत. फुलझाडं आहेत. आणि जांभळं करवंदहि पण असतीलच."

मुलीचे हे शब्द ऐकल्यावर या मुलाला बरोबर नेऊं किंवा याला कोठें ठेऊं हा प्रश्नच मुळीं पंडितरावाच्या मनाला शिवला नाहीं. अर्थात कांहीं न बोलतां त्यानं त्याला आपल्याबरोबर घेतला.

पंडितरावाची होडी विजयदुर्ग बंदराच्या किनाऱ्याला लागली तेव्हां चांगलं फटफटीत उजाडलं होतं.

कोकणांत समुद्रकाठचा वसंतऋतूंतला प्रातःकाळ फारच सुप्रसन्न आणि उल्हासदायक असतो. शीतल पण ऊबदार वारा वाहण्याला सुरवात झालेली असते. अनेक जातींच्या फुलांचा व मंजिऱ्यांचा संमिश्र सुगंध आनंद देतो. तसेंच वर्षभर एरव्हीं कधीं कानावर न पडणारे अनेक जातींचे गोड आलाप या ऋतूंत पक्षी प्रथमच ऐकवतात. अहाहा ! कोण तें नाजूक स्वर-वैचित्र्य ! आणि कोण ती गोड किलबिल ! असे आळीपाळीनें साद घालतात कीं समोरासमोर वेद-पठणाकरितां बसलेले वैदिकच ! त्यांतच बिचारं रहाटगाडगं ! कर कर आवाज करीत, आपल्या परोपकारी पण श्रमित जीवनाचं रडगाणं ऐकेल त्याच्या कानावर तें बिचारं घालीत असतं.

बंदरावर सुभेदाराच्या कचेरींतले दोन गडी उभे होते. त्यांनीं लगेच पंडितरावांच्या होडींतलं सामान काढून खालीं घेतलं. एकानं नमीचा हात धरून तिला होडींतून हलकंच उतरविलं. दुसऱ्यानं पंडितरावाला हात दिला. पण कुणक्या मात्र कोणाच्या हाताची वाट न पाहतां चेंडू-सारखा टुणकर उडी मारून होडींतून किनाऱ्यावर उतरला. गड्यांपाठी-मागून सर्वजण चालत जाऊन लवकरच सुभेदाराच्या वाड्यांत पोंचले.

वाड्यांत सदरेवर पंडितरावांचे मेहुणे हरीशास्त्री, शुचिर्भूत होऊन, हातांत जपाची माळ घेऊन पाहुण्यांची वाटच पहात बसले होते. आलेल्या सर्वांनीं पाय धुवून कोरडे केले. नमी तडक माजघरांत गेली. पंडितरावांनीं पोषाख उतरून ठेवला आणि चंची सोडली. कुणक्या अपरिचित म्हणून सदरेवर न बसतां दारांत जाऊन उभा राहिला. आणि येणार जाणार

माणूस गुरू न्याहाळून पाहूं लागला. खाडीचाहि कांहीं भाग येथून त्याला दिसत होता.

शास्त्रिबुवांनीं हातांतली जपाची माळ खालीं पोथीवर ठेवली. उभयतांनीं संभाषणाला प्रारंभ केला.

‘ म्हटलं, अगदीं गर्गाचार्यांच्या मुहूर्तावरच गृहप्रवेश झाला पंडितराव !’ शास्त्रीबुवा हंसत हंसत म्हणालें.

‘ शास्त्रीबुवा, मुहूर्त गर्गाचार्याला माहीत किंवा तुम्हांला. आम्ही आपले शिपाई गडी. आमच्या हालचाली मुहूर्ताकरितां कधींच थांबावयाच्या नाहींत. मुहूर्तांनींच वाटलं तर आमच्या हालचालींचा पाठलाग करून त्यांना गांठावं. ’

‘ बरं, संकेताप्रमाणं गावगन्ना सुखाचा संचार झाला ना ? ’

‘ होय. पण त्यांशिवाय त्यांतल्या त्यांत श्री कुणकेश्वराचंही दर्शन घेतलं. अर्धादिवस मोडून आणि वाकडी वाट करून. ’

देवाचं नांव निघतांच ‘ जय शंकर ’ असं मोठ्यानं म्हणून हात जोडून शास्त्रीबुवांनीं नमस्कार केला. मग म्हणाले—

‘ आणि हा तुमच्याबरोबर आलेला मुलगा कोण ? ’

‘ वः तो कुणकेश्वराचा प्रसाद ! ’ असं म्हणून पंडितराव मोठ्यानं हंसले.

‘ म्हणजे ? ’ शास्त्रीबुवांचीं उत्सुकता वाढून त्यांनीं प्रश्न केला. तेव्हां पंडितरावांनीं कुणक्याला हाक मारली. तो येतांच त्याला जवळ बसवून घेऊन ते म्हणाले—

‘ पाहून घ्या शास्त्रीबुवा हा कुणकेश्वराचा प्रसाद. घरच्या बंदराहून नीघतांना हा माझ्याबरोबर नव्हता. होडी दोन तीनशें पावलं गेल्यावर

यानं खाडीच्या बांधावरनं होडींत उडी घेतली. ' अशी प्रस्तावना करून पंडितरावांनीं, कुणकेश्वराच्या देवळांत कुणक्या दृष्टीस पडल्यापासूनची हकीगत खुलवून खुलवून शास्त्रीबुवांना सांगितली.होडींत कुणक्याशीं झालेलं आपलं संभाषणहि सांगितलं.

पण हें ऐकत असतांना शास्त्रीबुवांचं निम्मं लक्ष पंडितरावाच्या बोलण्याकडे तर निम्मं लक्ष कुणक्याच्या चेहेऱ्याकडे होतं.

ते अगदीं टक लावून तो चेहरा न्याहाळीत होते. इतकंच नव्हे तर पंडितरावाची हकीगत सांगून संपतांच, त्यांनीं थोडं पुढं सरकून कुण-क्याचा हात आपल्या हातांत घेतला आणि त्याच्या तळव्यावरच्या रेघा ते तपासूं लागले.

संभाषणांत आपल्याकडून खंड न पाडतां घरांत जाऊन येण्याची ही आयती संधि मिळाली ती पंडितरावांनीं साधली. त्यांना प्रातर्विधी उरकून घेऊन शिवाय घरच्या बायकांशीं दोन शब्द बोलायचे होते.

शास्त्रीबुवा कुणाचाहि हात बघून घेऊन सामुद्रिक चिकित्सा करूं लागले म्हणजे मग ते पूर्वीचं सर्व व्यवधान विसरून जात. घटका घटकाहि त्यांचं चित्त एकाग्र होई. त्याप्रमाणं आतांही झालं. हाताची तपासणी झाल्यावर त्यांनीं कुणक्याचीं पावलं तपासलीं. उजेडाकडे धरून त्याचे डोळे पाहून घेतले. डोकंही इकडून तिकडून चाचपडलं. आणि विचार करीत बसले.

पंडितराव बाहेर आले. त्यांनीं पाहिलं तो कुणक्या शास्त्रीबुवांच्या अगदीं परिचितासारखा चिकटून बसलेला. आश्चर्य वाटून म्हणाले ' अरे, तूं तर शास्त्रीबुवांना सौंगडीच बनविलेंस कीं इतक्यांत ! '

शास्त्रीबुवा म्हणाले ' आहे, पंडितराव, कुणकेश्वरचा हा तुमचा प्रसाद पदरांत घेण्यासारखाच आहे. '

पण ते आणखी यापुढं काय बोलणार तें, कांहीं बरं वाईट कसं असेल तसं, कुणक्याच्या तोंडावर बोललं जाऊं नये या हेतूनं पंडितराव त्याला म्हणाले ' पोरा, तुझ्ने प्रातर्विधी व्हायचे असतील अजून. जा पाहूं खाडीकाठच्या आगरांत फेरी मारून ये. येतांना थोडीं फुलं तोडून पानाचा पुडा करून घेऊन ये. '

कुणक्या उठला व तडक निघाला. आगराची वाट कोणती इत्यादि कांहीं विचारपूस त्यानें केली नाहीं. आपल्या चौकसबुद्धीच्या आधारावर अगदीं आत्मविश्वासानं तो निघून गेला.

तो दूर गेल्यावर पंडितराव म्हणाले ' शास्त्रीबुवा, हा पोर म्हणजे पदरांत घेण्यासारखा कुणकेश्वराचा प्रसाद असं मगाशीं म्हणालांत तें काय ? हस्तसामुद्रिक पाहायला भरपूर वेळ मिळाला वाटतं ? '

' पंडितराव ' शास्त्रिबुवा हसून म्हणाले ' आमचं हस्तसामुद्रिक आपलं आमच्या पुरतं. तुमच्यासारख्या अश्रद्धाळू लोकांना त्याचा फुकट फायदा कां द्या ? पण तुम्ही विचारलंच म्हणून सांगतों. पोर सुलक्षण दिसतो. धीरमर्द आहे. भाग्याची रेषा हजार हातांत अशी पाहायला सापडायची नाहीं. तीरासारखी ताठ. मात्र—'

इतकं बोलून शास्त्रीबुवा थोडे थबकले. त्यांचा आवाज पडला. ते चोरट्या स्वरानं इकडे तिकडे पाहात म्हणाले—' पण पोर अल्पायुषी दिसतो. '

पंडितराव उदासीन वृत्तीनं म्हणाले ' असो बिचारा कुणी कसा ! माझा तर त्याशीं सहवास कालरात्रीं दोन प्रहरभर घडला तो आणि आज दोन प्रहरभर घडेल तो. कारण आज तिसरे प्रहरींच मला इथून निघालं पाहिजे. त्याचं भाग्य पाहून आनंदेल किंवा अल्पायुष्य संपल्यानं दुःखी होईल असं कोणीच दिसत नाहीं या जगांत. पण पोर उमदा लाघवी आहे, कालपासून त्याचं चरित्र दिसलं त्या वरनं. '

'पण याची जात गोत कांहीं माहिती ? त्याची श्मश्रु झालेली नाहीं. कानाच्या पाळीपर्यंत पिंगट लव वाढलेली दिसते. केस कोवळे मऊ म्हणून अजून जटा झाल्या नाहींत. गळ्यांत किंवा कमरेला जानवं आहे कीं नाहीं कुणाला ठाऊक ? कान टोचलेले आहेत. यामुळं हा गोसाव्यासारखा दिसला तरी उत्तर हिंदुस्तानी नाहीं खास.

'ते आतां तुमचं तुम्हाला: हळू हळू कळून येईलच शास्त्रीबुवा. गोसाव्याबरोबर होता चेल्यासारखा, म्हणून गोसावीच म्हणाना. या पलिकडे मला त्याची माहिती नाहीं.'

'मग तुम्ही त्याला बरोबर कुठपर्यंत नेणार ?'

'मुळींच नाहीं. मी इथच त्याला तुमच्या घरीं सोडून जाणार आहें. मला मुलुखगिरीवर जायचं. त्यांत याची सोबत म्हणा अडचण म्हणा काय कामाची ? लक्षण चांगलं दिसलं ठेवून घ्या. या वाड्यांतल्या एवढ्या परिवारांत तो कांहीं अधिक नाहीं. बरं, वर्तन नीट दिसलं नाहीं तर खुशाल जा म्हणून सांगा. त्याला ठेऊन घेऊन सांभाळण्याची जोखीम जामीनगत आपल्यावर कांहींएक नाहीं. मी तसा वचनानें कुणाला बांधलेलाहि नाहीं. सडा पोर आहे पोरका. पण आहे चवदा पंधरा वर्षांचा. धरील कुणाकडेहि नोकरी. नाहीं तर गोसावी तो गोसावी. त्याला काय ? सारं जग मोकळंच आहे. आणि तोही असा खंबीर दिसतो कीं कुणाचा आधार नाहीं म्हणून भिऊन गांगरूनही जायचा नाहीं. उनाडपणांत एवढा तरी गुण असतो नव्हे, शास्त्रीबुवा !'

शास्त्रीबुवा म्हणाले, 'असो हो. त्या पोराचं काय विशेष म्हणा ! पण तुम्ही आज दुपारी म्हणजे इतक्या तातडीनं जाणार म्हणतां ? आलात तसे रहाल कीं नाहीं आणखी चार दिवस ? वरचेवर या विजयदुर्गला तुम्ही थोडेच येणार ?'

‘ राहिलों असतों पण करणार काय ? देशावर जाऊन अवचित-गडाचा कबजा घेण्याबद्दल मला साताऱ्याहून जरूरीचं आज्ञापत्र आलं आहे. गड ताब्यांत यायचा तर थोडी बहूत लढाई मारामारी करावी लागणार. आणि ती करूनहि तो गड पुढें ताब्यांत ठेवायचा तर पाऊस काळाच्या आधीं त्याची किरकोळ बंदिस्ती करायची, दाणा गोटा चंदी वैरण भरून ठेवायची, दारूगोळा वर नेऊन अंबारं बंद करायचीं, हीं कामं लवकर उरकलीं पाहिजेत ना ?

‘ बरं, बुवा, तुम्हा सरदार शिपायांच्या आड कोण येणार ? पण नमीचं काय ? तिला आणखी कांहीं दिवस इथंच ठेवा. तुम्ही फटिंग. पुनः लग्न करा म्हटलं केलं नाहींत. नमीची वेणी फणी करायलाहि तिकडे घरचं बायको माणूस नाहीं. राहू दे ती इथंच. घरच्या बायकांचा लळा तिला पूर्वीच्या ओळखीनं चांगला लागला आहे.

पण पंडितरावानं ना–खुषीनं या गोष्टीला मानेनेंच नकार दिला. मग शास्त्रीबुवा म्हणाले—‘ पण आज दोन प्रहरीं निघण्याला मुहूर्त चांगला नाहीं म्हणून आपलं म्हटलं रहा म्हणून. ’

पंडितरावानं ही हरकत मोठ्यानं हंसून पण तोंडच्या हलक्या वाऱ्यानं उडवून लावली. तो म्हणाला ‘ शास्त्रीबुवा, आम्हा शिपाई गड्यांच्या पडशींत पंचांगाला जागाच नसते. त्याला काय करणार ? शांततेच्या वेळीं घरच्या घरीं बसून धर्मकृत्य करणाराला पंचांगाचा उपयोग. चिलखत ढाल तलवार काढणी आणि घोडा या पांच अंगांनीं आमचं आपलं पंचांग सिद्ध होतं. आमचा पुण्यग्रह धनी यजमान. पापग्रह शत्रू. कामगिरी हाच आमचा मुहूर्त. ’

इतक्यांत घरांतनं शास्त्रीबुवांची बायको गंगाबाई हातांत पत्रावळी-वर फणसाचे गरे, व कोंवळया खोबऱ्याचे तुकडे घेऊन व आणि नमीला पुढं करून, सदरेवर आली. तिनं ती पत्रावळ शास्त्रीबुवा आणि पंडितराव

यांच्या पुढं ठेवली आणि म्हणाली, ' आतां इतक्यांतच झाडावरनं फणस उतरला. चांगला पिकला आहे. चार गरे खाल्ले तर बरे लागतील. '

उभयतांनीं चूळ भरून टाकून गरे खाण्याला सुरवात केली. नमी उभीच होती. तिचं तोंडधुणं वेणी फणी करून, कुंकू लाऊन, चार तांब्ये अंगावर पाणी घालून, गंगाबाईनीं तिला धुतलेली साडी चोळी लेववली होती. यामुळं तिच्या सर्वांगावर तेज खेळत होतं. तिच्या खांद्यावर हात ठेवून गंगाबाई हळू हळू हेल काढीत म्हणाल्या, ' म्हटलं, आतां मी या माझ्या भाचीला इथंच ठेवून घेणार आहें. तिच्यासारख्या लहान मुलाला कोकणची छायाच बरी. त्या रुक्ष घाटावर स्वाऱ्या शिकाऱ्या आणि धांवपळ करण्याचं ज्यांनीं मागं लावून घेतलं त्यांनीं तें आपलं आपणच करावं की. आणि इथ कोकणांत लग्नाची स्थळं मिळत नाहींत असं थोडंच आहे. आपलीं दोन्ही कडचीं मूळचीं घरं कोंकणचींच. '

पण पंडितरावांचा रुकार येईना.

दोन प्रहरीं जेवणींखाणीं गप्पागोष्टी झाल्यावर पंडितरावांनी विश्रांति घेतली. आणि तिसरे प्रहरीं गडी बोलावून सर्व सामान घेऊन ते बावड्या घाटाकडनं देशावर जायला निघाले.

कुणक्याला जवळ बोलावून ते म्हणाले, ' काय गोसावी महाराज आतां काय करणार ? चाकरी करून पोट भरणार की भिक्षा मागणार ?

कुणक्या हंसून म्हणाला, ' जशी शास्त्रीबुवांची आज्ञा. आणि आपली आज्ञा ! आपणच दोघे आतां माझे गुरुजी. चाकरी भिक्षा दोन्हीला माझी तयारी आहे. आपण मला देशावर नेत असाल तर यायची माझी इच्छा आहे. मी नर्मदेपर्यंत मुलूख पाहिला आहे. तीर्थ-यात्रा केल्या आहेत. असेल नशिबांत तर यापुढें लष्करी नोकरी करीन आपल्या हाताखालीं. मला शिपाईगिरी फार आवडते. '

पंडितराव म्हणाले, ' करीन पुढं मागं त्याचा विचार. तूत इथं रहा विजयदुर्गला शास्त्रीबुवांजवळ. आणि ते सांगतील तें काम कर. असली शिपाईगिरी तुझ्या नशिबांत तर इथंहि त्याला संधि मिळेल. या पुढं दिवसें दिवस कोकणांतही शिपाईगिरीची कामं वाढायचीं आहेत. कमी व्हायचीं नाहींत. जमिनीवरच्या नोकरी प्रमाणच पाण्यावरची नोकरी. हिंमत हुषारीचं चीज कुठंहि होणारच. '

( ३ )

पंडितराव निघून गेल्यावर कांहीं काळ असाच गेला मग एक दिवस कुणक्या शास्त्रीबुवांना म्हणाला, ' शास्त्रीबुवा मला कांहीं काम सांगा ना !

खरं पाहिलं तर तो आपण होऊन घरकाम बरंच करी. सकाळचा गोठा त्यानं आपणाकडे घेतला होता. सकाळ संध्याकाळ गाईची धारहि तोच काढी. बागांतून हिंडून फुलतुळशींचा भरपूर पुडा आणी. सकाळ दुपार अंगण व ओटी झाडून शास्त्रीबुवांची बैठक साफ करून मांडी. परसां' तली जळण काटुकाची व्यवस्था करी. आल्यागेल्याची बरदास्त ठेवी. तथापि इतकं करून त्याला प्रहरोगणती रिकामा वेळ मिळे आणि त्याचं काय करावं हें त्याला सुचेना. शास्त्रीबुवा आपणाला किल्ल्यांत नेऊन कचेरीच्या अधिकाऱ्याकडे कांहीं काम लावून देतील तर बरं असं त्याला वाटे. पण कांहीं केल्या तो विचार त्यांच्या मनांत येईचना. ते त्याला म्हणत, 'कुणक्या तूं अजून पोर आहेस. सरकारी नोकरी तुझ्या लागी नाहीं. मोठा झालास म्हणजे पाहूं पुढं मागं. तूर्त करतोस तेंच काम कर. पोटभर जेव आणि खुशाल रहा. वेळ जाईनाच तर बंदरावर फिरून येत जा ! समुद्र येवढा जवळ असल्यावर करमणुकीला काय कमी ' !

तात्पर्य, शास्त्रीबुवा आपणाला कांहीं पुढचा मार्ग तूर्त दाखवितील असं कुणक्याला दिसेना. पण ते त्याला कोणच्या प्रकारचं बंधनहि घालीत नसत. यामुळं कुणक्याला आपल्या इच्छेला येईल त्याप्रमाणं हिंडाफिरायला

भटकायला मनमुराद सांपडे. एखादे दिवशीं संध्याकाळीं त्याला बाहेरून यायला अवेळ झाला तरी ते त्याला उशीर कां झाला म्हणत नसत. येऊन जाऊन त्याचं या वेळचं काम धार काढायचं ते स्वतःच हौसेनं करीत.

कुणक्या उत्तर देशावर पुष्कळ हिंडला फिरला होता. त्यानं नर्मदेची एक सबंध प्रदक्षिणा आपल्या गुरुबरोबर केली होती.यामुळं त्याला सृष्टिशोभेची आवड पुष्कळच जडली होती खरी. पण आतां समुद्र दर्शनानं त्याचं चित्त असं कांहीं ओढून घेतलं कीं, सातपुडा व विंध्याद्रि यांतली शोभा त्या पुढं रद्द असं त्याला वाटे. नुसत्या दर्शनानं समाधान होईना तेव्हां तो आपल्या आपणच समुद्रांत पोहायला शिकला. समुद्रस्नानाचं इतकं वेड त्याला लागलं कीं पुढं पुढं त्याचं स्नान घरीं पडेच ना! स्नान झाल्यावर तो वाळवंटावर किंवा खडकावर आपले कपडे वाळत घाली. आणि घरीं जाई तो शुचिर्भूत होऊन. शास्त्रीबुवा त्याला एखादे वेळीं म्हणत, 'अ' बेट्या, भरती सुकती नीट पाहून समुद्रस्नान करावं. जाशील ना एखादे दिवशीं अविचार केल्यानं समुद्रांत वाहून.' त्यावर कुणक्या थट्टेनं म्हणे 'तर तर! समुद्र मला बुडवितो! मी त्याचा बाप लागून राहिलों आहें!' तेंच घेऊन शास्त्रीबुवा घरीं कोणी स्नेही आले म्हणजे, एखादे वेळीं थट्टेने कुणक्याकडे बोट दाखवून, त्यांना म्हणत 'हा पहा आमच्या घरीं समुद्राचा बाप वास्तव्य करतो आहे. तुमचं त्या समुद्राविरूद्ध कांहीं गाऱ्हाणं असलं तर सांगा याला. देईल नीट करून.'

प्रथम प्रथम कुणक्या समुद्र किनारीं वाळवंटांत तासान तास बसे. येतांना वाळवंटांतील सुंदर शिंपले, वाळल्या फेसांच पुंजके, एखादी रानटी फुलांची डहाळी घेऊन येई. पण पुढं पुढं तो केव्हां समुद्रकांठानं तर केव्हां डोंगरांतनं लांब मजलाहि मारूं लागला. होडींतून बसून हिंडावं असं त्याला फार वाटे. खाडीतल्या प्रवासापलीकडे त्याची मजल फारशी जात नसल्यानं समुद्रांत दूरवर जाऊन हिंडण्या फिरण्याची त्याची इच्छा अतृप्त राही. पण कोळी व दालदी यांच्याशिवाय एका दिवसांत

समुद्रांत जवळच्या जवळ हिंडून परत मुक्कामाला घरीं येणारे दुसरे कोण असणार ? कोळी दालदी यांचा समुद्र प्रवास केवळ मासे मारण्याकरितां. मग त्यांची संगत ब्राह्मणाघरच्या मुलाला काय उपयोगी ?

एके दिवशीं सकाळीं चार घटका दिवस आला असतां कुणक्यानं, विजयदुर्गपासून अर्ध कोसावरच्या वाळवंटांत, कोळी जातीचा एक तरुण मुलगा पाहिला. तो उद्योग असा कांहीं न करितां, समुद्राकडे तोंड ठेवून, डाव्या हातानं उजव्या हातावर–उजव्या हातानं डाव्या हातावर–वाळू उडवून झेलून खेळत होता, व तोंडानं गाणं गात होता. जवळच मासे धरण्याचीं जाळीं वाळत घातलीं होतीं. त्यांत एकदोन बुरडी शिपतरांत कांहीं मासे होते. त्यावर कावळे कोठून तरी येऊन झडप घालीत. तेव्हां मात्र मागं तोंड फिरवून, तो वाळूची मूठ भरून घेऊन, त्यावर भिरकावून त्यांना उडवून देत असे.

हें दृश्य पाहून ‘ याहून सुख म्हणतात तें अधिक काय असणार ?’ असा विचार क्षणार्धांत कुणक्याच्या मनांत चमकून गेला. तो या कोळयाच्या मुलाजवळ जाऊन आपणहि त्याच्यासारखी मांडी घालून बसला. समवयस्क मुलांना एकमेकांची ओळख दुसऱ्या कोणी करून द्यावी लागत नाहीं. तीं एकमेकांना त्वरितच विश्वासांत घेऊं शकतात. कोळयाच्या मुलानं हंसून कुणक्याचं स्वागत केलं. पण या दुसऱ्याचं प्रत्यक्ष नांव विचारण्याचं धाडस कुणक्यानंच केलं. तो म्हणाला ‘ गड्या , तुझं नाव काय रे ? ’

कोळी म्हणाला ‘ माझं नाव होय ! धाकल्या. ’

कुणक्या हंसून म्हणाला ‘ वा! बरं आहे कीं नांव. थोरल्याचा धाकटा भाऊ म्हणून धाकल्या असंच ना ? ’

यावर उभयतांचं संभाषण सुरूं झालं.

' थोरल्याचा धाकटा भाऊ म्हणायला आहे कुठं मला थोरला भाऊ' अन् माझ्यापरीस धाकला तरी ? ' ' बरं पण गड्या तुझं नांव काय आणि आईबाप कुठं आहेत ?

कुणक्या म्हणाला ' मला कुणक्या म्हणतात. मला माझे आईबाप माहीत नाहींत. माझा गुरु होता त्यानंहि मला सोडलं. आणि ज्याच्या पदरांत म्हणून माझ्या गुरुनं मला घातलं तोही सरदार गेला मला टाकून.

'अस्सं ! पण काय रे गड्या, तुझं कुणक्या हें नांव तर कधींच कुणी ऐकलेलं नाहीं. बरं तूं इथं कुणाकडं असतोस ? '

' ते ज्योतिषी बुवा आहेत त्यांच्याकडं. त्यांना शास्त्रीबुवा म्हणतात.

' हां. ते आहेत खरे इथं सगळयांच्या ओळखीचे. जो तो त्यांना हात दाखवायला जातो. मुहूर्त विचारायला जातो. पत्रिका दाखवायला जातो. मोठा भला माणूस. देवानं तुला चांगल्याच्या पदरीं घातलं. '

कुणक्या म्हणाला ' बरं धाकल्या ? तुझ्या वडिलांचं नांव काय अन् तुम्ही कुठं राहतां ? '

' माझ्या वडिलाचं नांव भागूजी नाईक. ते या पाच कोसातल्या कोळ्यांचे नाईक आहेत. त्यांचं वजन सरकारांत चांगलं आहे. सरखेल साहेब कान्होजीराव आंग्रे यांच्या पुऱ्या मर्जीतले आहेत ते. '

' तुला त्यांनीं काय शिकवलं आहे ? काय काम सांगितलं आहे ? '

' ते आपलं कोणतं काम मला सांगत नाहींत असंच विचार ना ! मासे धरण्यापासनं सरखेल साहेबांची गुप्त चिटीचपाटी पोंचविण्यापर्यंत. सरखेलांच्या महालावरचा खास पहारा वेळीं वक्तीं करण्यापर्यंत.'

आपण ज्याच्याशीं बोलतों आहों त्याचं हें वर्णन ऐकून कुणक्या मनांत आपल्या क्षुद्रतेबद्दल खजील झाला. पण त्याला मनांतलं आत्मविश्वा-

साचं बळ होतं. म्हणून आपण दडपून गेलों नाहीं असं दाखविण्याकरितां त्यानं धाकल्याशीं तसंच संभाषण पुढं चालु केलं. म्हणाला—

' मग आज तूं इथं मोकळा कसा ? '

' समुद्रांत मासे धरायला जायची आज माझी पाळी नव्हती. शिवाय स्वतः भागूजी नाईकच गेले आहेत, मासे धरायला होड्या घेऊन समुद्रांत. तें दोन घटकांनीं परत येतील. त्यांना कांहीं खासगी निरोप सांगायचा आहे सरकारी कचेरींतला. म्हणून बसलों आहे त्यांची वाट पहात. '

' मग भागूजी नाईक तुला नाहीं का कांहीं काम देत सरकार-कचेरींत लावून ? '

'मला ? अन् सरकार कचेरींतलं कायमचं काम ? थुः त्या कामाच्या जिंदगीवर. अरे, आहे काय त्या कचेरीच्या कामात ? ना· मिळकत ना मान. चार रुपड्या देतील, पण त्याकरतां सारा दिवस राबीवतील ! वाटेल तें हलकं काम करायचं. अन् वर शिव्या लाथा खायच्या ! कुणा लेकाला हवं असलं काम ? मी माझ्या पडावांत बसून समुद्रावर निघालों म्हणजे वाटतं कीं, जसा काय मी समुद्राचा राजा. काय आमच्या दादांची—भागूजी बुवांची—मिजास ! खबरदार कोण फिरकेल या बंदरा-च्या आसपास सरखेलांच्या परवानगी शिवाय ! घातलीच त्यांच्यावर भागूजी बुवांनीं झडप. घेरलंच त्याचं होडगं होडी फतेमारी काय असेल तें. आणलाच त्याला बंदरांत त्याच्या मालासकट. अन् माल गेला गोठ्यांत, गुरांच्या सोबतीं रात्र काढायला ! बरीचशी खंडणी नजर देईल तेव्हां होईल सुटका. अन् अशीं तशीं नाहींत आमच्या बाबानीं पकडून आणलेली माणसं. हिंदु व्यापारी तर राहोतच. पण अरबस्तानचे मुसलमान फेरीवाले. अन् तांबड्या तोंडाचे फिरंगी सुद्धां ! आहेत ठाऊक ? '

कुणक्या या सर्व वर्णनानं मनांत अगदीं चूर झाला. मोहून गेला. त्याची आकांक्षा जागृत झाली. त्याला वाटलं कीं, शास्त्रीबुवांकडं आपण

नेहमीं काम द्या म्हणून तगादा लावतों. त्याला कंटाळून त्यांनीं आपणाला अजून कांहीं काम लावून दिलं नाहीं हें एकाअर्थी बरंच झालं. आशेला हिमतीला, उमेदीला आज एक नवं द्वार दिसलं. असं पाहून तो म्हणाला—
‘ गड्या विचारूं का तुला एक गोष्ट ? ’

‘ हां हां विचार कीं बेलाशक ’ धाकल्या तत्परतेनं म्हणाला. कुणक्या परका खरा. पण त्याच्या चेहऱ्यावर असं कांहीं स्वाभाविक तेज होतं कीं, त्याला पाहतांच याची संगत सोबत जडली तर हवी असंच धाकल्याला वाटलं.

कुणक्या म्हणाला ‘ गड्या शास्त्रीबुवांकडं मला कांहीं कमी नाहीं. पण मी त्यांचं अन्न खाऊन जन्म कसा काढणार ? माझं भवितव्य त्यांनीं हात पाहून कांहींतरी हेरलं आहे खास. पण तें भविष्य ते मला अजून सांगत नाहींत. किंवा माझ्या नोकरीचीहि कांहीं तजवीज करीत नाहींत. तेव्हां मला वाटतं भागूजी बुवाचेच पाय धरावे आणि मार्ग दाखवा असं म्हणावं. ’

‘ कांहीं हरकत नाहीं. मीच तुझी अन् त्यांची ओळख करून देतों आज ते समुद्रावरनं आले म्हणजे. मग तुझं तूं पाहून घे. ’

## ४

हें बोलणं होत आहे तों समुद्राच्या बाजूनें दोन तीन मोठे पडाव किनाऱ्याकडे येतांना दिसूं लागले. आणि थोड्या वेळानं वाऱ्याच्या जोरा-वर ते किनाऱ्याशीं येऊन थडकले सुद्धां. नोकर माणसांनीं पडावातलीं जाळीं व मासे जमिनीवर उतरले. भागूजीबुवा खालीं उतरतांच ते धाक-ल्याला म्हणाले ‘ कायरे, पोरा, हा तुझा नवा सोबती कोण ? ’

धाकल्यानं कुणक्याच्या कानांत हळूच मंत्र सांगितला. त्याप्रमाणं कुणक्यानं भागूजी नाइकाच्या पायावर डोकं ठेवलं, आणि म्हणाला ‘ मला आपल्या पदरांत घ्या. मी एक पोरका पोर आहे.’ धाकल्याहि लगेच म्हणाला

' हा एक मला नवा सोबती भेटला आहे आज बाबा. सरखेलाकडं नोक-रीला लावा म्हणतो. मग जशी तुमची मर्जी. '

भागूजी बुवानं कुणक्याला नखशिखांत एकवार नीट न्याहाळून पाहिलं. आणि म्हणाला, ' सरखेलांची नोकरी म्हणजे हा पोरगा काय परसांतली भाजी समजतो कायरे, धाकल्या ? आणि ती मिळाली तरी सुळावरची पोळी आहे म्हणावं ! पोरगा तर तरतरीत दिसतो. अन् याला पोरका व्हायला काय झालं रे धाकल्या ? जगांतल्या आईबापांनी जणूं काय विडाच उचलला अशीं पोरं मागं टाकून मसणांत जायचा ? असो. ज्याचं नशीब त्याच्या बरोबर. बरं आहे बाबा. बघतों प्रयत्न करून. पण हा काय दर्यावर जाणारा खलाशी होणार ? कीं किल्ल्यांतल्या कचेरीचा शिपाई होणार ? '

कुणक्या घाईनं म्हणाला, ' छेः छेः मला ती शिपायाची नोकरी करायची नाहीं. मला शिकवा. मी खलाशी होईन. समुद्रावर जाईन. आणि सांगाल तें काम करीन तुमचं. '

भागूजी हंसून म्हणाला, ' हंः शिकवा म्हणे याला खलाशी व्हाय-ला ! माशांना पाण्यांत वावरायला कुणी शिकवतं वाटतं ? असेल अंगांत तर दिसेल ढंगांत. बरं तें राहूं दे. भेट रे पोरा पुन्हा केव्हांतरी. मग पाहीन काय होतं तें. '

मग धाकल्याकडं वळून म्हणाला,'बरं धाकल्या, तूं काय म्हणतोस बोल ? '

' कांहीं नाहीं बाबा. पण सरखेल साहेबांनीं तुम्हांला उभ्या उभ्या भेटायला बोलावलं आहे. किल्ल्यांत जरूरीचं काम आहे म्हणे.'

' ठीक आहे. मासेमारीचं हें एक काम झालं. आतां दुसरं. '

असं म्हणून भागुजी किल्ल्याची वाट चालूं लागला. जातांना मागं राहिलेल्या कोळ्यांना म्हणाला, ' आज मासळी तर खूप गवसली रे

लेकाच्या हो ! जा घरीं चैन करा. पण जर का दारूपाणी करून झिंगलांत तर सांभाळा एकेकाच्या अंगाची चांबडी लोळवीन.'

या दिवसापासून धाकल्या आणि कुणक्या यांची चांगलीच गट्टी जमली. सरखेलांच्या आरमारांत नोकरी मिळवायची तर आधीं नावाड्यांचं खलाशाचं काम शिकायला पाहिजे ही गोष्ट कुणक्याच्या लक्षांत तेव्हांच आली. पण ब्राम्हणांच्या घरच्या होड्या असल्या तरी त्या खाडींत वावरणाऱ्या. त्या समुद्रांत शिरावयाच्या नाहींत. आणि समुद्रांत वावरणाऱ्या होड्या चालविण्याचं काम शिकायचं, तर प्रथम मासेमाऱ्या कोळयांची संगत करूनच शिकलं पाहिजे हीहि गोष्ट उघड होती.

एक दिवस घरीं शास्त्रीबुवांजवळ बसून लाघवीपणानं गप्पागोष्टी करतांना कुणक्या हळूच त्यांना म्हणाला—'शास्त्रीबुवा, मला समुद्राची आवड मनातनं वाटते. ती काहो ? तसं कांहीं माझ्या हातावरच्या शिरांवरून दिसतं का हो तुम्हांला ?'

या प्रश्नानं शास्त्रीबुवांना हसूं आलं. ते म्हणाले, 'तुला समुद्र संचाराचा योग आहे हें भाकित मी पूर्वीच वर्तवून ठेवलं आहे.'

'मग मला नाहीं सांगितलंत ते ? पण समुद्रांत शिरल्याशिवाय समुद्रसंचार माझ्या हातनं कसा होणार ? आणि तुमचं भाकीत कसं ठरणार खरं ?'

'अरे नशिबांत असेल तर तेंच तुला ओढून नेईल. तुझी जात अजून चांगलीशी उमगलेली नाहीं तुझ्या हातावरनं मला.'

'मग मी एखाद्या कोळयाची संगत करून त्याच्या होडीनं समुद्रावर जाऊं लागलों तर ?'

'कोळयाची संगत करून मासे मारणार कीं काय ?'

'मला मासेमारी आवडत नाहीं मनांतनं, खरंच सांगतों मामा ! पण कोळयांची संगत करून मला होडी पडाव चालवायला शिकतां येईल. तें शिकूं कां' ?

'हो. त्याला काय हरकत ? अरे बाबा, विद्या ही ईश्वरानं सर्वांना वाटून दिली आहे. तुला खलाशाची विद्या आवडत असेल तर ती शीक. कदाचित् मच्छीमार न होतां तुला व्यापारी फत्तेमारीचा तांडेल होतां येईल.

ही पडत्या फळाची आज्ञा मिळाल्यावर कुणक्यानं धाकल्याशीं संधान बांधलं. प्रथम त्यानं खाडीतल्या खाडींत मच्छीमारीला निघणाऱ्या होडींत बसून हळूहळू वल्हीं मारण्यास सुरुवात केली. तसंच बंदरी माल पोंचविणाऱ्या दोन होडीवाल्यांची मैत्री मिळवून, ताज चालविणं, सुकाणू धरणं, शीड लावणं उतरणं, हीं सगळीं कामं त्यानं शिकून घेतलीं. होडी-वाल्यांना काय ? त्यांना आयता एक हौशी फुकट्या गडी चाकर मदतनीस मिळाला. मोबदला न मागतां खूब राबणाऱ्या या तरुण मुलाचं होडीवा-ल्यांना मोठं अगत्य वाटे. म्हणून ते एखादे वेळीं कुणक्याला एखादा नारळ देत. तो स्वीकारून तो घरीं शास्त्रीबुवांना नेऊन देत असे. शास्त्री-बुवांना नारळांना कांहीं कमी होतं असं नाहीं. पण कुणक्यानं आपल्या मिळकतीचा म्हणून नारळ आणून दिला म्हणजे त्याचं त्यांना कौतुक वाटे. आणि हा नारळ त्याला कुणाकडून मिळाला हें कळलं म्हणजे ते विचारीत 'हं ? तुझी खलाशी विद्या कुठवर आली !'

(५)

एक दिवस कुणक्यानं सरखेलांचं दर्शन घेण्याची इच्छा प्रगट केली. ती धाकल्यानं त्याच दिवशीं सफळ केली. कारण दैवयोगानं त्याच दिवशीं सरखेलांची स्वारी शिकारीला गेली अशी बातमी होती. म्हणून संध्याकाळी शिकारीहून परत येण्याच्या वाटेवर ते दोघेजण तिसरे प्रहरीं जाऊन बसले.

आतां दिवस चार घटका उरला असेल, तों विजयदुर्ग घेऱ्याच्या दक्षिण बाजूनं शिंगांची ललकारी ऐकू आली. सरखेल येण्याचीच ती खूण होती. थोड्या वेळानं शिकारी लोकांचा एक थवा येतांना दिसला. तो थाट काय विचारावा ? अग्रभागीं लोक शिंग वाजवीत होते. त्यांच्यामागं

गळयांत ढोल अडकविलेले वाजंत्री तीं वाद्यं तालावर वाजवीत ठेक्यावर पावलं टाकीत येत होते. त्यांच्या मागनं खांद्यावर भाले व तरवारी टाकलेले, डोक्याला पागोटीं बांधलेले, शिपाईप्यादे ऐटीनं चालत होते. त्यामागून शिकारींतले हाके लोक, हातांत साध्या काठ्या व खांद्यावर घोंगड्या घेऊन, बक्षिशीच्या आशेनं येत होते. त्यांच्या मागनं दहा पांच शिकारी. पैकीं कुणी, शिकारींत मारलेले, लहान मोठे ससे किंवा पक्षी खांद्यावा दोऱ्यांत अडकवून चालत होते. त्यांच्या मागून बारा बारा गड्यांचीं दोन टोळकीं येत होतीं.दोरखंडांनीं पाय बांधून, त्यांतून लांब बांबू उभा घालून, याला आडव्या काठ्या लावून,त्या खांद्यावर घेऊन, उलटा टांगलेला एकेक प्रचण्ड रानडुक्कर प्रत्येक टोळक्यानं चालविला होता. आणि या सर्वांच्या मागून सरखेल कान्होजी आंग्रे यांची स्वारी दोघा शिकारी सोबत्यांच्या खांद्यावर हात टाकून थाटानं डुलत आस्ते कदम चालत येत होती.

विजयदुर्ग किल्ल्याच्या दक्षिणेला अर्ध कोसावर एक देवीचं जुनाट देऊळ व त्याच्यापुढं एक विस्तीर्ण मैदान होतं. तिथं आल्यावर ही मिरवणूक थांबली. सर्वजण गवतावर मांडी घालून बसले. विश्रांति घेण्याकरितां शिकारीचीं जनावरं खांद्यावरून खालीं उतरून ठेवण्यांत आलीं. फक्त सरखेलांपुरती शिंदीच्या पानांची एक मोठी चटई आंथरण्यांत येऊन, वर जाजम पसरलं होतं. सरखेल मांडी घालून जाजमावर बसतांच शिंग्यानं शिंग वाजवून सर्वांना इशारा दिला.

त्या काळच्या कोकण प्रांतींच्या मराठे सरदारांत कान्होजी आंग्र्या इतका पराक्रमी कोणी नव्हता.तसाच मर्दानी सौंदर्यवान असाहि कोणी नव्हता. रंगानं काळसावळा, पण चेहऱ्यावरचे सर्व अवयव अगदीं रेखीव व तरतरीत. नुसतं त्याचं सरळ उठावदार भरदार नाक पाहून तो हजारांत एक असा वाटे. त्याचे डोळे काळे कुळकुळीत आणि टपोरे होते. पण टपोऱ्या डोळयांत प्रायः जो पाणीदारपणा नसतो तो कान्होजीच्या डोळयांत असून, त्यानं कोणावर आपली नजर रोखली म्हणजे त्या दुसऱ्याला त्याच्याशीं

आपला डोळा भिडविणं अशक्य होई. त्याच्या मिशा पीळदार असून त्याचे उभे आडवे कल्ले गाल झाकून टाकीत. त्याचा आवाज खोल आणि पुरामर्दानी होता. तो जोरानं ओरडला म्हणजे अस्मानांत गडगडाट झालासा वाटे.

आंग्र्यांची स्वारी बसतांच खिद्मतगारानं एक पंचरंगी हातरुमाल पुढं केला. तो घेऊन घामानं डबडबलेलं आपलं तोंड कान्होजीनं पुसून काढलं. लगेच दुसरा एक खिदमतगार पुढं येऊन हात जोडून उभा राहिला. आणि अदबीनं म्हणाला 'शाहाळी सोलूं ? कीं ताजी माडी धरून ठेवली आहे ती आणूं ?' त्यावर माडी आणण्याची आज्ञा होतांच तो गेला, आणि त्या गरम रसानं भरलेला एक मातीचा लोटा आणि पेला आणून त्यानं धन्यापुढं ठेवला. कान्होजीनं पेला भरून तो तान्हेल्याप्रमाणं देनतीन घोटांत रिकामा केला. आणि दुसरा पेला भरण्याकरितां पुन्हा हातांत घेतल्यावर, आसपास नजर टाकून, बोलण्याला सुरवात केली

जवळच भागूजी नाईक कोळी बसला होता त्याकडं वळून सरखेल म्हणाला' कां भागूजी नाईक ? आज शिकारीला रंग चढला होता नाहीं ?'

भागूजी म्हणाला, 'तें काय विचारावं धनी साहेब ? आपण समु-द्राप्रमाणं जंगलाचेहि राजेच आहां. जसा वल्हा तसा आपला भाला. दोन्ही सारखींच यशस्वी ठरलेलीं. आपण हीं रानडुकरं मारलीं त्यानं पांच पन्नास तरी शेतकरी सुखी होतील. आणि आपणाला दुवा देतील, सरकार. आपला तो आरमाराचा वल्हा आपला हात न लागतां केवळ आपल्या हुकमतीनं यशस्वी होतो. आणि भाला तर प्रत्यक्ष आपल्या हातांतच असतो. मग त्याला यश यायला काय उशीर ' ?

'पण शिकारींत यश यायला झालं तरी मदतनीस लागतातच तुमच्यासारखे, भागूजी नाईक ! आजचीच गोष्ट घ्याना ! तो पहिला डुक्कर माझ्या भाल्याच्या पहिल्याच फेकीनं लोळला. पण दुसऱ्यानं माझ्यावर थोडीशी बाजू परतवली होतीच कीं नाहीं ? एका बाजूनं माझ्या भाल्या-

बरोबर, दुसऱ्या बाजूनं तुमचा भाला नेमका घुसला त्याच्या दुसऱ्या बरगडींत. म्हणून निभावलं. नाहींतर तो बहाद्दर माझी डावी मांडी कापल्याशिवाय राहता ना. कसंहि असो–' कान्होजी विनोद बुद्धीनं थट्टेचा स्वर काढून म्हणाला ' गरीब निरपराधी मासे मारून, भागूजी नाईक, तुम्ही रोज पातकं करतां, पण उलट शेतकऱ्यांना उपद्रव देणारीं, त्यांच्या उभ्या पिकांचा सत्यनाश करून त्यांच्या पोटावर पाय आणणारीं, हीं रानडुक्कर मारून, तुम्ही थोडंबहुत त्या पापाचं क्षालन करतां असं मी तर म्हणेन. '

भागूजी नाईकदेखील आपल्याच्या पुरतं थोडं धर्मशास्त्र थोडं नीति शास्त्र जाणत होता. कान्होजीनं पापक्षालनाचा जो अनुकूल निवाडा या मासेमाऱ्याला दिला, त्यानं त्याचं समाधान न होतां, मुळांत त्याला जें पाप चिकटविण्यांत आलें तेंच त्याला खपलं नाहीं. तो हंसून म्हणाला ' थोडं बोलतों, धन्याच्या परवानगीनं. रानडुक्कर शेतकऱ्यांना उपद्रव करीत असले तरी ते कंदमुळंच खातात. जिवंत प्राणी मारीत नाहींत––आपलं पोट भरण्याकरितां. '

' आणि मासे ? '

' पण धनीसाहेबांना माहीतच आहे कीं, माशाची जात मोठी अधाशी आणि दुष्ट. तो आपलं पोट, आपल्याहून लहान मासे खाऊन, म्हणजे दुसऱ्याचा प्राण घेऊन भरतो. तेव्हां त्याला आम्ही कोळी मारतों तें मुळांत पापच होत नाहीं सरकार !'

हा युक्तिवाद ऐकून सगळींच मंडळी हंसली. कान्होजी म्हणाला ' खरं बोललां तुम्ही भागूजी नाईक. आपण पाप करून दुसऱ्याला नावें ठेवण्याची रीतच सगळ्या जगांत आढळते. समुद्रांतले जसे मोठे मासे तसेंच समुद्रावरचे हे चोरटे फिरंगी ! आपण चाचेगिरी करितात. आणि आमच्या सारख्याना मात्र चाचे म्हणून दोष देतात. '

हें बोलणं होतं आहे इतक्यांत विजयदुर्गच्या किल्ल्याकडनं एक शिपाई कांहीं निरोप घेऊन आला. निरोप असा होता कीं 'इंग्रजाकडचा एक आरमारी वकील, सरकारी अधिकाऱ्याचं एक पत्र घेऊन, आला असून सरखेल साहेबांची जरूरीनं गांठ घ्यायची आहे असं म्हणतो.'

निरोप ऐकून कान्होजी तिरस्कारानं म्हणाला 'आला असेल वकील तर बसू दे त्याला किल्ल्याच्या देवडीवर! मी येईन तेव्हां येईन. मी काय इंग्रजांचा गुलाम आहें म्हणून मला या सरखेलाला इतक्या जरूरीनं बोलावतो? हे तांबड्या तोंडाचे फिरंगी मोठे चढेल झाले आहेत. पिवळ्या फिरंग्यांनां ना–मोहरम केल्यापासनं यांना वाटूं लागलं आहे कीं आम्हींच या कोकण समुद्राचे राजे झालों आहों. पण त्यांना म्हणावं या सरखेलाला तुम्ही अजून पुरं ओळखलं नाहीं. या समुद्राचा खरा राजा हा मराठा गडी, हा दर्यावर्दी सरदार, आहे. मी तुमच्या गमजा चालूं देणार नाहीं.'

आलेल्या निरोप्याकडे वळून कान्होजी म्हणाला 'कायरे? हा फिरंगी वकील व्यापारी जहाजांतनं आला कीं लढाऊ गलबतांतनं? त्याचा परवाना कुणी तपासला होता कीं नाहीं? बिगर परवाना आला असेल तर मी जहाजच्या जहाज जप्त करीन. आणि सगळ्या खलाशांना शिपायांना हशमाना कैदेंत टाकीन. आणि त्यांचा म्होरक्या टोपीवाला स्वतःला वकील म्हणून मोठं नाव घेत असला तरी म्हणावं सुटणार नाहींस माझ्या तावडीतनं. अशा कांगावखोर चोरांना विजयदुर्गच्या किल्यांतलं तळघर पुरून उरण्यासारखं आहे. सुरतकर मुंबईकर गव्हर्नर व्हातील आपल्या वखारींत! इथं म्हणावं या आरमारी लढाऊ सरदाराशीं गांठ आहे!'

पण या प्रश्नानां तो बिचारा निरोप्या काय उत्तर देणार?

कान्होजीनं बसल्या बसल्या बेगुमानपणानं माडीचे चार पेले झोकले. त्यांनीं त्याला निशा न आली तरी, आंतून किंचित उन्माद चढूं लागला होता. यानं रानांतून मारून आणलेलीं डुकरं शिकारी लोकांच्या स्वाधीन बक्षीस

म्हणून केलीं, आणि म्हणाला ' गड्या हो जा आतां घरोघर. निवाऱ्याची जागा बघून हीं जनावरं कापून चांगली मेजवानी करा. उद्यां तुम्हांला सरकारी नोकरीवर येण्याचं कारण नाहीं. घरीं बसून आजच्या शिकारीचा शीण घालवा. पुन्हा शिकारीचं ध्यानांत येईल तेव्हां सूचना मिळेल. उद्यां या फिरंगी वकीलाशीं हुजत घालण्यांत माझा सगळा दिवस खर्च होणारसं दिसतं !'

असं म्हणून कान्होजी जाजमावरनं उठला. ही संधी साधून जवळच उभा असलेल्या धाकल्यानं आणि कुणक्यानं त्यांच्या पायाला हात लावून राम राम केला. हीं दोन तरुण पोरं, मोठ्या माणसाना मागं टाकून, अवचित पुढं आलेलीं पाहून कान्होजीला कौतुक वाटलं. तो म्हणाला ' कोण रे हे पोरगे ? मोठे धीट दिसतात. माझ्या पायाला हात लावायला त्यांना भीति वाटत नाहीं ?'

भागूजी नाईक पुढं होऊन म्हणाला ' एक तो माझा पाळलेला मुलगा आहे सरकार ! त्याचं नाव धाकल्या. तो आपल्या कोळ्याच्या कामांत मोठा पटाईत झाला आहे. जाळीं फेकण्या–ओढण्यांत, होड्या पडाव चालविण्यांत, तो आम्हां पर्डालधाऱ्या माणसांना मागं टाकतो. त्याला मच्छीमारीच्या कामावर पाठविला कीं होड्या पडाव भरभरून येतात मासळीनं. बेट्याचा हात गुण चांगला आहे. तो कोळ्यांचा नाईक होईल पुढं मागं आपल्या आशीर्वादानं ! '

' आणि तो दुसरा पोरगा ? तो तर कोळी दिसत नाहीं ! तो कोकणचा कीं देशावरनं आला आहे गम्मत पहायला कोकणची ? '

' कसंहि म्हटलं तरी पोरगा मोठा चिमखडा आहे सरकार ! पूर्वी देशावरनं आलेल्या तरण्या पोरांनीं कोकणांत नुसती गम्मत पाहून हौस भागविली नाहीं सरकार. त्यांनीं दर्यावर्दीपणांत आम्हां कोळी दालदी भंडारी लोकांवर ताण केली आहे. आणि त्यांच्या पुढच्या पिढीनं तर सरखेली स्थापली. दर्यावरचं राज्यच कमावलं. धनी जाणतातच ! '

भागूजी नाईकानं ही आपल्या बापाची आणि व्यक्तिशः आपली स्तुती, वेळ पाहून मोठ्या नाजूकपणानं, केली हें कान्होजीच्या लक्षांत आल्याशिवाय कसं राहील ? आपला बाप मूळचा देशावरचा मराठा असतां कोंकणांत कसा आला, त्यानं देशावर कधीं न मिळणारं दर्यावर्दीपणाचं शिक्षण कोंकणांत आल्यावर नवीन कसं संपादन केलं, आपल्या मराठे गड्याच्या शिपाईगिरीच्या स्फूर्तीनं त्यानं आरमारी गलबतांचा जहाजांचा उद्योग कसा सुरू केला, आणि त्याच्या शिक्षणानं तरबेज होऊन स्वतः आपण मराठ्यांच्या सरकारी आरमाराची सरदारी कशी मिळविली, —हा सर्व वृत्तांत एका क्षणांत कान्होजीच्या मनांत आठवून चमकून गेला. भागूजीच्या या दरबारी पण यथार्थ स्तुतीनं कान्होजीला आपल्या कर्तृत्वाचा गर्व वाटला असला तर तो यथार्थच होता.

कोंकणच्या कोळी भण्डारी लोकांत दर्यावर्दीपणाचं कसब पुरेपूर असलं तरी, त्यांच्यांत लढाऊ लष्करीवृत्ति फारशी जागृत झाली नव्हती. ती मराठ्यांच्या पुढारीपणामुळं उदयाला आली. ती इतकी कीं त्यांच्याच बळावर शिवाजी महाराजांना कोंकणांत मराठी आरमाराचा पाया घालण्याची उमेद आली. हा सर्व इतिहास कान्होजीच्या डोळयापुढंच घडलेला होता. यामुळं देशावरचे मराठे व कोंकणचे कोळी भण्डारी यांचा सारखाच अभिमान त्याला वाटे.

या आठवणीचा परिणाम असा झाला कीं, कुणक्या हा देशावरनं आलेला मुलगा असेल या कल्पनेनं कान्होजीचं विशेष लक्ष त्याच्याकडे वेधलं. तो म्हणाला ‘ भागूजी नाईक, कोकण काय देश काय ? दोन्ही प्रांत पुण्यभूमी म्हणण्याला सारखेच योग्य आहेत. कारण त्यांच्यावर त्या छत्रपति शिवाजी महाराजांची पायधूळ सारखीच पडलेली आहे नव्हे कां ? बरं, हा दुसरा पोर काय करूं म्हणतो ? ’

‘ धनी, त्याला मच्छीमारी विद्या येण्यासारखी असली तरी सरकारी आरमारी हशमगिरीच्या नोकरीकडं त्याचं मन झुकतं असं मला दिसतं मग जशी धन्याची मर्जी. ’

कान्होजी म्हणाला, ‘ नाईक, तरुण तरतरीत मुलं शिपाईगिरी करण्याची इच्छा धरणारी पाहिली कीं माझा तर जीव त्यांच्याकरतां उफाळून वर निघतो जसा कांहीं. अजून आमचं आरमार पुरं नावारूपाला याचचं आहे. त्यांत शूर होतकरू तरुणांची भरती करूं तेवढी थोडीच होईल नव्हे का ? एकच काय, याच्यासारखी शम्भर तरुण पोरं मिळाली तरी त्यांना काम द्यायला आज मजजवळ आहे. द्या या पोराला किल्ल्यांत माझ्या तैनातीला पाठवून. पाहीन काय आरमारची शिपाईगिरी शिकतो आणि करतो ती.’

पण तें बोलणं त्या दिवशीं तितक्यावरच संपलें. भागूजी तें विसरून गेला. आणि कुणक्याला त्याची आठवण करून देण्याचं धैर्य होईना.

( ६ )

शेवटीं एके दिवशीं कुणक्या शास्त्रीबुवा पुढें येऊन उभा राहिला. आणि कंटाळा झाडून टाकल्याप्रमाणें अंगाला आळेपिळे देऊन म्हणाला गुरुजी. कांहींतरी काम सांगा हो! रिकामपणांनं कंटाळलों. मन रमण्यासारखं कांहीं काम न सांगाल तर फिरून नर्मदाकाठच्या मठाची वाट धरीन. यात्रा करण्यान स्वार्थ परमार्थ दोनहि बरे साधतात. ’

शास्त्रीबुवानीं कुणक्याच्या तोंडाकडे एकवार न्याहाळून पाहिलें. आणि हांसून म्हणालें. ‘ अस्सं ! तुला मन रमण्यासारखं काम पाहिजे काय ? बैस तर खालीं बघूं! कुणक्या खालीं बसल्यावर त्यांनीं तोंडात तंबाखूचा नवा बार भरला. डोळ्याला चाळशी लावली. पोराचा उजवा तळहात आपल्या डाव्या हातात घेतला. आपल्या उजव्या हातानें तो ताठ व साफ केला. जशा कांहीं एकाद्या पत्राच्या घड्या काढून टाकून वाचण्यायोग्य करावं.

कुणक्या हंसून म्हणाला ‘ गुरुजी रोज नव्यानं हात काय पाहतां ? त्यावर रोज नव्या नव्या रेघा उमटतात कीं काय ? ’

‘ अरे, पोरा रेघा त्याच. पण तुझा प्रश्न जसा नवा तसं जुन्या रेघांचं परीक्षणहि मला नव्या दृष्टीनं करायला पाहिजे. ’

कांहीं थोडा वेळ पण अगदीं एकाग्र दृष्टीनें हातच्या रेघा पाहून झाल्यावर शास्त्रीबुवा एकदम अकल्पित प्रकाश दिसावा त्याप्रमाणें मोठ्यानं उद्गारले. ‘ पोरा. चल, झाली परीक्षा. तुझं भविष्य दिसलं. तूं सरखेलांच्या नोकरींत शिरून भाग्याला चढणार. पण शेवटीं—’ इतकें बोलून त्यानीं पुढचे शब्द आवरले, आणि दीर्घ सुसकारा टाकला.

कुणक्या म्हणाला ‘ आधीं नोकरींत शिरणार आणि मग भाग्याला चढणार. दूरच्या गोष्टी. ’

‘ पण शेवटीं ’ हे शब्द त्याच्या खिसगणतीतहि आले नाहींत.

कुणक्या पुढें म्हणाला—

‘ पण मला स्वतःला कोण विचारतो ? तुमचा शब्द सरखेल फुलासारखा झेलतील. तो एकदां माझ्या करतां थोडा खर्च कराना ! ’

कुणक्यावर उपकार करण्यापेक्षां स्वतःचें भविष्य खरें ठरविण्याकरितां म्हणाना, शास्त्रीबुवांना उद्योग करणें प्राप्त झालें. ते म्हणाले, ‘चल आज तिसरे प्रहरीं मी तुला सरखेलांच्या भेटीला नेतों. तोंडानं बोलत, तसाच जणुं कांहीं तुझ्या हातावरच्या रेषांनीं मला आज आदेशच दिला, आजच्या वेळेचा गुण कांहीं वेगळाच दिसतो. ’

तिसरे प्रहरीं शास्त्रीबुवांनीं नेसूच्या पंचावरून हात फिरवून तो नीट केला. खांद्यावर शालजोडी टाकली. हातांत काठी घेतली. आणि कुणक्याला पुढें घालून किल्ल्याकडे निघाले. दोन प्रहरची वामकुक्षी संपवून विडा तंबाखू खाऊन डोक्याला पट्टेदार पागोटें गुंडाळून सरखेलांची स्वारी सदरेवरील बैठकीवर विराजमान झाली होती. शेजारीं कारकून हातांत कागद व कलमदान घेऊन उभा होता. पाठीशी हुजऱ्या कंबरेला तलवार लावून पाहऱ्याला सज्ज होता.

शास्त्रीबुवाना पाहतांच सरखेलानीं उठून खडी ताजीम दिली व उजव्या हाताशीं मांडलेल्या एका लहानशा गादीवर बसण्याची विनंति केली. कुणक्या हात जोडून शास्त्रीबुवांच्या मागें उभा राहिला. मग उभयतां प्रतिष्ठितांचें संभाषण सुरूं झालें.

' आज गुरुजींनी या शिष्याला भेट देण्याची कृपा अकल्पितच केली म्हणावयाची '

' होय धनी. आज एक विशेष काम निघालं म्हणून धन्यांना तसदी द्यायला आलों. ' इतकें बोलून त्यांनीं मागें वळून कुणक्याकडे पाहिलें व म्हणाले—

' पोरा बघतोस काय ? पुढं हो, धन्याचे पाय धर. '

' कुणक्यानें ही सूचना तात्काळ अमलांत आणली.

अँ ! 'हा कोण तरुण मुलगा ? पूर्वीं कधीं पाहिलेला आहे का ? हा माझे पाय कां धरतो' ? सरखेलानी आश्चर्यानें विचारलें.

' सांगतो धनी, ऐकून घ्या ' असें म्हणून आपला मेहुणा पंडितराव याच्याशीं कुणक्याचा संबंध कसा आला, व त्यानंतर तो आतां आपणाजवळ राहून काय करतो, इत्यादि हकीकत सांगून शास्त्रीबुवा म्हणाले ' मी माझ्या ज्योतिष सामुद्रीक विद्येची स्तुति करावी असं नाहीं. धन्याला तिचा अनुभव आलाच असेल यापूर्वी. '

' होय गुरुजी ' सरखेल हात जोडून मान किंचित लववून आदरबुद्धीनें म्हणाले. ' आपण सांगितलेलीं भविष्यं बहुतेक सगळीं बरोबर आलीं. म्हणून कोणतंहि मोठं काम हातीं घ्यायचं तर तें आपण काढून द्याल त्याच मुहूर्तावर मी करीत असतों. आणि ही काहीं मीं उगाचि तोंड देखली स्तुती करीत नाहीं. मग आज माझ्याकरितां असंच एखादं भविष्य आपल्या दिव्यदृष्टीला दिसलं कीं काय ? '

' भविष्य असं कांहीं नाहीं धनी आपल्या संबंधाचं. पण आज या मुलाचा हात पाहिला. त्या वरनं मला दिसलं की याला जलसंचार योग पुष्कळ आहे. पराक्रमी निघेल. धन्यानीं हातीं धरला तर स्वतःच नाव करील तसंच धन्याचीहि कामगिरी करील. म्हणून त्याला धन्याच्या पायांवर घालायला मुद्दाम घेऊन आलों इतकंच '

' हात्तिच्यारे ' सरखेल हंसून म्हणाले ' एकच काय पण तुमच्या अशा शिफारशीचीं जितकीं तरुण मुलं येतील तितक्यांना कामाला लावायाला मी तयार आहे. गुरुजी पाहताच कीं, श्रीशिवरायाच्या कृपेनें आणि वडिलांच्या आशीर्वादानं आम्ही आरमार सजवायचा केवढा मोठा उद्योग हातीं घेतला आहे. त्यांत तरांडीं बांधण्यापासून तीं लढविण्यापर्यंत ज्याच्या त्याच्या बुद्धीनुसार कितीतरी वेगवेगळ्या प्रकारचीं कामं पुढं वाढून येत आहेत. मालवण-वेंगुर्ल्यापासून अलीबागेपर्यंत मी एवढा व्याप मांडून ठेवला आहे कीं तो संभाळण्याला नव्या दमाची पण त्याहिपेक्षां नव्या दृष्टीचीं शेंकडों हजारों तरुण मुलं मिळालीं तर हवीच आहेत. एका पिढींत - संपणारं हें काम नाहीं. एवढंच काय एका पिढीनं झाड लावावं तेव्हां तिसऱ्या पिढीला त्याचीं फळ खायला खरीं मिळतील असं आहे हें काम. आणि हल्लीं माझी चिंता म्हणाल तर हुषार आणि निधड्या छातीचीं पराक्रमी माणसं हवी तशी हवी तितकी कशी मिळतील हीच आहे. '

' त्याची चिंता कशाला ? धनी कोकण दर्याचे राजे होणार असं भविष्य मी वर्तविलं आहे. त्याचा अर्थच धन्याना आरमारी प्रजा आणि फौज कमी पडायची नाहीं. '

' कामाच्या मानानं माणूस. कोकण पट्टी मोठी. पण बंदरं अशी थोडीं. नव्हे ? कोकण पट्टीस माणूस मुबलक आणि मेहनतीहि.?'

' होय गुरुजी. देश आणि कोकण दोन्हीचा मला थोडाथोडा अनुभव आहे. त्यावरन कोकणी माणूस अधिक मेहनती यांत शंका नाहीं.

भोई कोळी परिश्रमी, भंडारी शूर, दालदी व्यापारी बुद्धीचे–पण देशावरच्या मराठ्यान स्वराज्याची जी चाड दाखवली ती कोकणच्या लोकांत नाहीं. शिवाजी महाराज कोकणांत उतरून आपल्या चैतन्याची ओळख पटवीपर्यंत हे सर्व लोक मोंगल विजापूरकर हबशी आणि आतां टोपीकर यांच्या अमलाखालीं खुशाल राहिले. तरांड्यांत बसून दर्याच्या कृपेनें बंदरं गाठणाऱ्याला बळ अधिक ? कीं किनाऱ्यावर पाय रोवतां येणाऱ्याला डोंगरांच्या आश्रयान मारा करतां येणाऱ्याला–बळ अधिक ? पण अंगी पराक्रम असतां तो प्रगट करण्याला आंतून उठावणी लागते ती या कोकणी लोकांत नव्हती. म्हणून शिवाजी राजाला आरमारं सजवायी लढवावी असं वाटूं लागल्यावर त्याला देशावरचे मराठेच घाटाखालीं उतरवावे लागले. माझी वतनवाडी घाटावर आहे हें गुरुजींना माहीतच आहे, पण आतां पुढच्या पिढ्यांची मायभूमी कोकणच होणार. बरं पण या मुलाची जात कोणती ? '

' अनाथ पोर. त्याचे आईबाप सगे सोयरे कुणीच पाहिलेले नाहींत. तो एका गोसाव्यानं वाढविला. पण तो स्वतः गोसावी राहून जन्मभर यात्रा करणार नाहीं, संसार नाही तरी लौकिकातले पराक्रम करील, असं माझं सामुद्रिक शास्त्र मला सांगतं धनी. त्याची जात कोणतीहि असो. कुळ हें दैवानं पण पराक्रम हातान म्हणतात ते खरं नव्हे कां धनी ? '

' होय, गुरुजी, व्यक्तीगुणाला मी महत्व देतोंच. पण त्याला कुळाच्या गुणाचा आधार मिळाला तर ती दुधात साखरच नव्हे का गुरुजी ? '

' पण जातिवंत झाड झालं तरी तांबड मातींत लागल्यानं तें फळ फुलं देईल तितकीं माळजमिनींत लागल्यानं देणार नाहीं. हा मुलगाच घ्याना ! ज्या जातींत तो जन्मला ती तो आतां बदलूं शकत नाहीं. पण

त्या जातीचे गुण फलप्रद व्हायला कर्तबगारी दाखविण्याची जागा मिळाली पाहिजे. दैवयोगानं तो इकडे न येतां जन्मभर गोसावी राहून यात्राच करीत बसता तर परलोकीं त्याला पुण्याईचा लाभ काय व्हायचा तो झाला असतां. पण लौकिक अभ्युदयाच्या दृष्टीनं त्याचा जन्म फुकट नसतां का गेला ? मनुष्यानं दोन्ही फळांची आशा धरावी. '

' पण काय हो गुरुजी ? यानं हा वेष तर अजून गोसाव्याचाच ठेवला आहे. डोईभर केंस वाढलेले. वय कोवळ म्हणून त्याच्या राठ जटा वळल्या नाहींत इतकंच. आणि गालावर हनुवटीवर ही केसाची लव म्हणून आज दिसते पण ती तशींच वाढूं दिली तर दाढीमिशांची जाळी बनेल. त्याच्या बरोबरीच्या देशी कोंकणी पोरांत तो दिसून पडल्याशिवाय रहायचा नाहीं. तो यापुढें गोसावी होऊन यात्रा न करतां माझी नोकरी करणारा झाला तर त्यानं कोंकणी पोरासारखी डोईची हजामत करून लांब शेंडी ठेवावी. '

' पोराची जात. मी त्याला हें प्रथमच सांगितलं होतं. पण त्याचे गुरुभक्ति मोठी जाज्वल्य दिसते. तो म्हणतो ' फुढं मागं मला माझे गुरुजी भेटणार आहेत. त्यांनीं मला पहातांच ओळखावं म्हणून मी हा वेष ठेवला आहे. ते भेटले म्हणजे मग तो वेष टाकून देईन. ' आणि त्याच्या या वेषामुळं त्याच्या सोबत्यांनीं त्याचं नांव बुवाजी असं ठेवलं सुद्धां आहे. '

सरखेल म्हणाले ' पोर निष्ठावंत दिसतो. ती निष्ठा याच्या कोणत्याहि आवडत्या कामाला लावली तर तो तें काम फत्ते केल्याशिवाय रहायचा नाही. असो. द्या या मुलाला माझ्या दिमतीला. मी ठेवून घेतों. आणि पहातों कोणत्या कामाला तो उपयोगी पडेल. '

शास्त्री बुवांना आपली खेप यशस्वी झाली असें पाहून फार आनन्द झाला. ते उठले व मुजरा करून पाठमोरे झाल्यावर कुणक्याला हाक मारून म्हणाले, ' पोरा तुझं नशीब सवाई

शिकंदर दिसतं. धन्यानी माझ्या विनंतीचं चीज केलं. राहा तूं आतां इथंच. तरी पण मधून मधून घरीं येऊन मला आणि तिला भेटत जा, तुझा उत्कर्ष झालेला पाहिला म्हणजे आम्हां दोघांनाहि बरं वाटेल.'

कुणक्या शास्त्रीबुवाना दारापर्यंत पोंचवून परत आला. आणि पहिल्याच जागीं हात जोडून मान खालीं घालून उभा राहिला. सरखेलजी त्याला म्हणाले, 'कायरे पोरा ! तुझी अन् समुद्राची कितीशी ओळख आहे ?'

कुणक्या म्हणाला, 'मला लहानपणची आठवण आहे तेव्हांपासून धनी'!

'ती कशी?'

'ती अशी धनी ! या इकडच्या कोकणांतच कुठल्याशा एका गावाजवळ एक भलं मोठं देऊळ उंचावर होतं. त्याला लागून खालीं समुद्र होता. एक दिवस मी आईबरोबर समुद्राच्या स्नानाला देवळाखालीं आलों. खूप गर्दी झाली होती स्नानाला, मला कडेला वाळवंटांत बसवून आई स्नानाला समुद्रांत गेली—अन गेली ती परत आलीच नाहीं. मी वाट पाहून पाहून कंटाळून झोंपी गेलो. आणि मग जागा झालों तों एका गोसाव्याच्या कडेवर ! मी आईकरतां रडलों रडलों, पण उपयोग झाला नाहीं. मग गोसाव्यानच मला माया लावली. त्यान मला आपल्या बरोबर वर नर्मदाकांठीं नेलंस आठवतं. मी थोडा जाणता झाल्यावर तो गोसावी हेच माझे आईबाप झाले धनी. त्याच्या बरोबर केदार गंगोत्री पर्यंत यात्रा केल्या. मग सुमार १२ वर्षांनीं मला घेऊन माझा गुरु कुपकेश्वराला आला. पूर्वी पाहिलं तसंच देऊळ. पूर्वी पाहिला तसाच तिथच समुद्र. समुद्र स्नानाला गर्दीहि तशीच ! तेव्हां मला लहान-पणची जुनी आठवण पुसट पुन्हां आली धनी. पण त्या दिवशीं मला देवळांत नेऊन माझ्या गुरुन वेगळंच कांहीं सांगितलं. तो म्हणाला अतां

माझी संगत सोड. इकडच रहा. यात्रा करायचं टाकून दे. शिपाई हो खलाशी हो. पराक्रम कर. नाव काढ. मी तुला पुन्हा केव्हां तरी असाच भेटन. आणि मग त्यानं सांगितल्या प्रमाणं वाघोटणाच्या खाडींतली होडी बंदराकडं निघाली तेव्हां मी तिच्यावर उडी टाकलीशी पाहून गुरुजींहि खाडींत उडी टाकून पोहून पैलतीराला गेले. मी शास्त्रीबुवांच्या घरीं आल्याची हकीकत आतांच शास्त्रीबुवांनी धन्याच्या पायाजवळ सांगितलीच आहे.'

'अस्सं.' आश्चर्य दाखवुन सरखेल म्हणाले–'तर मग तूं शिपाई होणार?'

'जशी धन्याची आज्ञा. मला घोड्यावर बसतां येतं धनी!'

'बरं तूं खलाशी होशील?'

'जशी धन्यांची आज्ञा! मीं शास्त्रीबुवांच्या घरीं राहिल्यापासून खाऱ्या पाण्यांत खेळायला शिकलों धनी!'

'बरं तर. आजपासून तूं माझ्याजवळच रहा. सांगेन तें काम करीत जा. मग पुढं तूं आहेस अन तुझं नशीब आहे'!

इतकं बोलणं झाल्यावर कारकुनाला हांक मारून सरखेलानी त्या दिवशीं लिहावयाचीं चार पत्रें होतीं तीं लिहविलीं. किल्ला कामगार, गोदी कामगार, मुजरा करायला आले त्यांच्या वर्दी घेतल्या, आणि कुणक्याला घेऊन कोठीकडे गेले.

## ७

काही माणसांचें नशीब असे असते कीं, त्यांचे पाउल केव्हाहि पुढेच पडावयाचे तें मागें पडावयाचे नाही. कुणक्याला सरखेलानी आपल्या बरोबर जो घरीं नेला तो तेथेच कायमचा होउन बसला! मनुष्याला वश

करण्याची विद्या त्याला उपजतच चांगली साधली होती. पण या विद्येचा दुरूपयोग त्याच्या कडून झाला नाहीं.

या विद्येंत चंचलपणा हा मोठा दोष असतो. पण कुणक्याला लाघवी स्वभावा बरोबर निष्ठावन्त पणाची जोड मिळाली होती. त्याने गोसाव्याच्या वेषांत असतां आपला गुरु बदलला नाहीं. आणि त्याच्या गुरूनेच त्याचा गोसावीपणा थांबवून त्याला प्रवृत्ति मार्गाला लावलें नसतें, तर त्याने आपल्या लहानपणच्या गुरुचीच सेवा जन्मभर केला असती.

पण आता तो या नव्या मार्गाला लागल्यावर जो पहिला धनी त्याला, लाभला त्याच्या शींच निष्ठावन्तपणे सेवक म्हणून राहण्याचे त्याने ठरविलें. त्याच्या निष्ठेला यश देणारा मुख्य गुण म्हटला म्हणजे निर्लोभीपणा. गोसाव्याचा शिष्य या नात्याने या निर्लोभीपणाचें शिक्षण त्याला मिळालेच होतें. परंतु तें त्याला नव्या परिस्थितींतहि उपयोगी पडलें.

बाल्यावस्था संपून तारुण्याच्या सीमेवर त्याने पाय ठेवला होता. या पुढे पराक्रम करणे, दर्जा मान्यता मिळविणे, लग्न करून संसार थाटणे, इत्यादि मोहक अभिलाषाच्या गोष्टी त्याच्या डोळ्यापुढे सहजच येणाऱ्या होत्या. नवी दिशा लागलेले जीवन यशस्वी करावें, म्हणजे हे वर सांगितलेले पुरुषार्थ मिळवावे व भोगावे, अशी बुद्धि त्याला सुचल्यास त्यांत वावगे काय होते ? पण ही बुद्धि सुचूनहि निर्लोभी पणाचा, फटींग वृत्तीचा, संस्कार त्याच्या मनावर थोडाबहुत राहिलाच होता.

कोकणच्या लोकाना हा कोणी तरी एक परका माणूस कोकणांत आला, असे त्याचा पोशाख पेहराव बोलण्याची धाटणी इत्यादिकांवरून वाटे. पण हाडाने तो कोकणा व महाराष्ट्रीयच असल्यामुळे, नवीन परिचयाच्या कोकणी जनतेशीं समरस होण्याला त्याला अडचण पडली नाहीं.

'अरे, आतां तूं इकडचा रहिवाशी झालास, तुझे गोसावीपण सुटलें तेव्हा आतां तूं डोकेभर वाढणारे जटा सारखे केस काना खाली गालावर

उगवणारी ल्व,ही काढून टाक कशी! आणि कोकणच्या पोरांसारखी हबा-मत करून शेंडी ठेव. म्हणजे तुझ्याकडे परकीपणाने कोणी पाहाणार नाही' असे शास्त्रीबुवा त्याला मधून मधुन म्हणत. परंतु तो म्हणे 'माझ्या गुरुजींनी मला नव्या मार्गाला लावलें तरी त्यांची आठवण मी कधीच विसरणार नाही. आणि ती आठवण म्हणून मी डोक्यावरचे केस असेच वाढविणार. ते फिरुन भेटतील तेव्हा मी ते काढीन. माझ्या केसाशी लोकांना काय करायचें आहे'!

कोणच्याहि विद्येत प्रवेश व्हावयाचा म्हणजे तींत प्रथम कोणालाहि थोडी उमेदवारी करावी लागतेच. ही उमेदवारी दोन तऱ्हेची असते. एक प्रत्यक्ष त्या विद्येतील क्रमवार कामाची. आणि दुसरी उमेदवारी, या उमेदवारी पूर्वीच तज्ज्ञ म्हणून प्रतिष्ठा मिळवून बसलेल्या वरचढाची. कुणक्याला विद्येची व माणसाची अशा दोन्ही उमेदवाऱ्या कराव्या लागल्या.

मनुष्य हा स्थलचर प्राणी आहे. त्याला पाण्यांत वावरण्याची उपजत बुद्धि, बेडूक मासे कासवें या प्रमाणे नसते. त्याला नुसते पाण्यांत तरंगणे पोहणे ही गोष्ट देखील शिकावी लागते.जलचरांची मुलें पाण्यातच जन्मतात व जन्मतःच पोहू लागतात.पण स्थलचरांचें मूल नकळत पाण्यांत पडलें तर गटंगळ्या खाउन बुडतें. पोहावयाला शिकल्यांवर स्थलचराचेंहि तेंच पूर्वीचे शरीर तरंगू शकतें. त्या तरंगण्याची साधनें त्याच्या जवळच असतात. पण पाण्याच्या पहिल्या परिचयांत भीति हीच त्याला बुडविते, व हातीं असलेल्या साधनांचा तरण्याच्या कामीं उपयोग करूं देत नाही.

पण या साधनांचें ज्ञान होउन भीति नाहीशीं झाली, आणि आत्म-विश्वास बळावला, म्हणजे मग मनुष्य त्याच पाण्याला भारी ठरतो. तो असा कीं, समुद्राचें देखील त्याला भय वाटत नाहीसे होतें. समुद्रात अप-घात पावलेली माणसें कित्येक तास तरी पोहून बचावू शकतात. आणि शेवटी तीं बुडतात याचें कारण ती थकतात, किंवा त्यांची उपासमार होते, किंवा एखादा जलचर हिंसक प्राणी त्याना मारतो व खातो.

पण नुसत्या समुद्राशीं टक्कर म्हटली तर पर्वतप्राय लाटानाहि तो दाद देत नाही. मनुष्याला पाण्याच्या भीतिची मर्यादा ओठाशीं व नाकाशीं! ती दोन्ही जो पर्यंत त्याला पाण्यावर ठेवता येतात तो पर्यंत, त्याच्या अंगा-खाली एक पुरुष पाणी काय आणि हजार पुरुष पाणी काय दोन्ही सारखींच.

शरीरानें पोहण्याप्रमाणें समुद्रस्नान हें देखील पाण्यावर वर्चस्व मिळविण्याचें मनुष्याचें साधन आहे. आणि मौज ही कीं तें साधन जर कां चांगलें सिद्ध झालें तर, पायाचा आंगठाहि भिजविल्याशिवाय मनुष्य सप्त समुद्रांची फेरी करून परत जागेवर कोरडाच्या कोरडा येईल!

प्रत्यक्ष पाण्याशिवाय अवांतर भीतिची कारणें असतात तीं पाण्यातले अनन्त प्राणी हे बहुधा मांस भक्षक असतात. आणि मनुष्य हें त्यांचे आवडते खाद्य होऊं शकते. एखाद्या डोहांत पाणी तीन हात उंचीचेंच असलें—म्हणजे उभा माणूस न बुडण्याइतके असले—तरी देखील सुसर-मगर यांच्या तडाख्यांत तो सांपडला तर तो लोळविला जाईल, आणि अशाप्रकारें हातभर पाण्यातहि बुडून मरेल, हें संभवत नाहीं काय? पण तें लोळणे म्हणजेंच त्या घातक प्राण्यांचा घास होणें होत.

जलवाहने जलयाने बनविण्याची विद्या मनुष्य शिकला तेव्हांपासून तो समुद्रालाहि भारी ठरला आहे. आणि हल्ली महासागर तरून जाणारीं केवढीं अजस्र प्रचन्ड जहाजें गलबतें मनुष्य बुद्धीने निर्माण केली आहेत हे वाचकाना माहित असल्यामुळें मी त्याचें वर्णन येथें करीत नाहीं.

आमचा विषय, ३०० वर्षांपूर्वी कोकण किनाऱ्यावर नौकानयनाची समुद्रतरणाची विद्या जितकी साध्य झाली होती, तितक्या पुरताच आहे.

कोकण किनाऱ्यावरील मराठ्यांचें या वेळचें आरमार हल्लीच्या मानाने कांहींच नव्हते. पण तीनशे वर्षांपूर्वी फिरंगी लोकांचें आरमार झालें तरी तितक्याच बेताचें होते! म्हणून एका पेक्षा एक हटकून वरचढ असे म्हणतां येत नव्हते. यामुळें मराठे व फिरंगी याना,

सारख्याच प्रमाणांत, एकमेकावर जय मिळविता येत, व त्यांच प्रमाणांत पराभव हि सोसावे लागत. मात्र कोणचाहि फिरंगी घेतला तर तो शेकडों–हजारों कोसांवरून अरबी समुद्रांत आलेला. यामुळे नौकानयनाच्या विद्येंत तो थोडासा अधिक प्रविण, अधिक अनुभवी, व सराईत असे. शिवाय जहाजा गलबतावर आत्मरक्षणाची किंवा परक्यावर हल्ला करण्याची जी साधनें, म्हणजे मुख्यत: तोफा व दारुगोळा, यांची विद्या बहुतेक फिरंग्यांच्या देशांत इकडच्यापेक्षा अधिक प्रगती पावली होती. यामुळेच कायतो फरक पडे. कोकणी दर्यावर्दी लोकांचा समुद्र संचार त्या मानाने थोडा. पण भांडणें कुरापती निघाल्या असतां आपण आपल्या घरच्या बंदर किनाऱ्याशीं असल्यामुळें, त्याना फिरंग्यापेक्षा सोयी सवलती अधिक मिळत. हा त्याना विशेष फायदा होता. 'नक्र: स्वस्थानं आसाद्य गजेंद्र मपि कर्षति ' ही म्हण थोडीशी अनुभवाला येई.

बंदुका तोफा यांचा उपयोग करण्याचें ज्ञान त्यांना कमी होतें. परंतु प्रथम तुकोजी आंग्रे यानें आरमार स्थापिलें होतें तेव्हां-पासून, फिरंगी लोकांकडून तोफा व बंदूका मिळविण्याचा, व आपल्या खलाशांना त्यांचा उपयोग करण्याला शिकविण्याचा, पायंडा त्यानें घातला. आणि त्यानंतर कान्होजी आंग्रे यानें तर तो प्रघात पुष्कळच वाढविला. तसेंच कान्होजीनें विजयदुर्गाच्या खाडींत किल्याच्या आश्रयानें एक गोदी बांधली. तींत शेंकडों सुतार खलाशी लहान मोठीं तरांडी बांधण्याचें काम करूं लागलें. गोदीच्या दुसऱ्या अंगाला कान्होजीनं दारूखाना सजवून त्यांत समुद्रांतील अग्निवर्षावाची लहान मोठी निरनिराळीं साधनें सांठवुन ठेविलीं होतीं. तो तोफाही ओती. पण फारच लहान आकाराच्या.

या वेळीं कोकण किनाऱ्यालगत निरनिराळ्या देशचे फिरंगी म्हणजे डच, पोर्तुगीज, फ्रेंच, इंग्रज खलाशी, व्यक्तिश: किंवा त्यांच्या कंपन्या करितां, चांचेगिरीचा व व्यापाराचा धंदा करीत. त्यांच्य त्यांच्यांत चुरस लागून राहिलेली असे. यामुळें आंग्यांच्या आरमाराचें

सहाय्य आपणास मिळालें तर चांगलें असें सर्वांसच वाटे. या सहाय्याचा मोबदला म्हणून कान्होजी त्यांजकडून रोकड नाणें, सोनें, चांदी किंवा व्यापारी माल हीं न घेतां दारूगोळा, बंदुका व तोफा याच मिळतील तितक्या घेई. आणि खाडीच्या तोंडानें हिंडून फिरून आपल्या आरमारावरील खलाशांना त्यांचा उपयोग करावयास शिकवी.

या कामाला उपयोगी असे दोन तीन फिरंगी कान्होजीनें आपल्या नोकरीला ठेविले होते. आणि तसे लोक त्यावेळीं मिळतहि. कारण त्या वेळच्या फिरंगी आरमारांत लष्करी शिस्तीचा कायदा फारसा प्रभावी नव्हता. आरमारांत दाखल होणारा परदेशी खलाशी आपला देश सोडून इतक्या दूर येई कीं, पुन्हा केव्हां स्वदेशाला परत जाऊं तर जाऊं नाहींतर नाहीं, अशा निर्वाण पदावर चढूनच तो निघे. त्याला मग घरदार कसचें ? तो स्वतः चंगी भंगी बे दरकार धाडसी असा असून, त्याच्या संगतींतले इतर लोकहि तसेच असावयाचे. यामुळें कोणत्याहि मोहाला बळी पडण्याला मनानें त्यांची केव्हांहि तयारी असे. कोणाचाहि कसाहि विश्वासघात करण्याचें त्यांना कांहीं वाटत नसे. कैफ आणि बदफैली हे दुर्गुण त्यांच्यामध्यें मूर्तिमंत अवतरलेले. आणि जो नोकरीला ठेवुन जास्ती पगार देईल त्याचीच नोकरी करावी, आणि वेळीं स्वदेशी लोकांच्या विरुद्धहि हत्यार उपसावें याची दिकत त्यांना वाटत नसे

सतराव्या शतकांत आणि अठराव्या शतकांतल्या कांहीं भागांत कोकण किनाऱ्याला अशा या उनाड युरोपियन लोकांचें वरदान खूपच मिळालें होतं. पण आरमारी धाडस व विद्या हे गुण अशाच लोकांच्या अंगीं चांगले असल्यामुळें; कान्होजीला त्यांना नोकरीला ठेवुन आपला मतलब साधावा अशी इच्छा सहजच झाली. आणि त्यानें आपलें आरमार सिद्ध करून कुलाब्यापासून गोंव्यापर्यंत आपलें बस्तान इतकें बसविलें कीं, कोणाहि व्यापारी लोकांना इकडच्या बाजूनें सुरक्षित प्रवास करावयाचा असेल, किंवा बंदरांत शिरून कांहीं व्यापार करावयाचा असेल, तर कान्होजी छापाचा परवाना त्यांना मिळवावा लागे !

तुकोजी आंग्रे हा कांहीं मूळचा कोळी दालदी भंडारी नव्हता. पुणें प्रांतीं आगरवाडी म्हणून एक गांव आहे तेथील तो रहिवासी व नामवंत मराठा. परंतु त्या वेळीं नशीब काढण्याकरितां कोंकणातले लोक जसे देशावर येत, तसेच देशावरचेहि कांहीं कोंकणांत खालीं उतरत. अशांपैकींच तुकोजी हा होता. त्याला समुद्राचा अनुभव नवा, परंतु कांहीं विद्या दुसऱ्याच पिढीला वडिलार्जित म्हणून सुलभ होतात. कान्होजींचेंही असेंच झालें. या विद्येंत तो इतका तरबेज झाला कीं जातिवंत कोंकणीं खलाशांनाही त्याच्या बुद्धीपुढें हार खावी लागे. आणि लढाऊबाणा तर या मराठा गड्यानें वडिलार्जित म्हणून देशावरून नेलाच होता ! शिवाय शिवाजी महाराजानां कोंकण प्रांती आपला अंम्मल बसवावयाचा झाला तेव्हां अशा दुरंगी माणसांची मदत त्यांना फार उपयोगी पडली. आणि कान्होजी हा आपल्या गुणांनीं दर्यासारंग ही बहुमानाची पदवी व अधिकाराची जागा मिळवूं शकला.

अशा होतकरू उदयोन्मुख लष्करी आरमारी सरदाराचें मुख्य धन म्हणजे उगवती तरुण पिढी. नुसत्या डोळयांच्या परीक्षेनें तो होतकरू चिमखडे गर्दीतून निवडून काढी. आणि नांवारूपाला येण्याला त्यांना हरएक प्रकारची संधि देई.

भागूजी कोळी हा तुकोजी आंग्र्याबरोबरच आरमार सजविण्याच्या उद्योगांत पडला. त्याचें पूर्व वय मासे मारीच्या धंद्यांत गेलेले होतें, आणि त्याच्यावर पांच पन्नास कोळी कुटुंबें उपजीविका म्हणुन जगत. यामुळें त्यानें आपला पेशा बदलला असला तरी, आपला जुना धंदा अगदीं सोडला नव्हता. यामुळें एखाद दिवशीं हौसेनें व एखादे दिवशीं गरजेमुळें, अजूनहि तो समुद्रांत मासे धरण्याला जाई. आणि आपला पाळीव मुलगा धाकल्या यालाही त्यानें हेंच दुहेरी वळण लावलें होतें. या दोनही कामाची गोडी कुणक्याला हळू हळू इतकी लागली कीं, शास्त्रीबोवांच्या घरापेक्षां त्याचा मुक्काम अलीकडे कोळी वाड्यांतनं

भंडारा वाड्यांत, विजयदुर्गच्या किल्यांत, किंवा समुद्रकांठीं उभारलेल्या झोंपड्यांतूनच अधिक पडे.

कुणक्याचा मूळचा वेष गोसावी पद्धतीचा होता. यामुळें त्याला घटकेंत शास्त्रीबुवांच्या घरीं पांढरपेशाचा तर घटकेंत दर्यावर्दी लोकांच्या मेळ्यांत कोळ्या खलाशांचा वेष सहज घेतां येई. हळू हळू तो त्यांची भाषा बोली चांगली शिकला. पण फक्त एका गोष्टींत तो आपल्या सोबत्याशीं खेळगड्यांशीं समरस होऊं शकत नसे. ती गोष्ट म्हणजे मासळी खाण्याची. तो स्वतः ब्राम्हण म्हणून मिरवीत नसे. कारण आपली जात काय हें त्याला तरी कुठं माहीत होतें ? आणि कोकणांतील कांहीं जातींचे ब्राम्हणही मासे खातात. यामुळें त्याचे सवंगडी थट्टेनें त्याला मासे खाण्याला बोलावीत. पण तेवढ्या पुरतंच तो त्यांना नाखूष करण्याला तयार होई. तसेंच ताडी माडीला तो केव्हांही स्पर्श करीत नसे. तथापि यामुळें कुणक्या व धाकल्या यांच्या स्नेह्यांत प्रथम अंतर पडलें नाहीं. ते दोघ भावाभावासारखे वागत, आणि भागूजी कोळी हाही कुणक्यावर मुलाप्रमाणें प्रेम करी. दर्यावर्दीपणांत कुणक्या इतका लवकर तयार झालेला पाहून भागूजीला आश्चर्य वाटे. तो म्हणे आमचीं ही विद्या पिढ्यानपिढ्या चालत आल्यी म्हणून ती आमच्या अंगवळणीं पडली हें ठीकच झालं. पण अवघ्या दोन तीन वर्षांत या नवख्या मुलानें ही विद्या आमचे बरोबरीनें हस्तगत केली तेव्हां ईश्वराचा वरदहस्तच त्याच्यावर असला पाहिजे. आणि एखाद्यावर ईश्वराची विशेष कृपा आहे अशी मनुष्याची एकदां कल्पना झाली म्हणजे तोही स्वतः त्यावर तशीच कृपा करूं लागतो.

कोकणी दर्यावर्दी लोकांची नजर रोज समुद्र पाहून मरून गेली होती. म्हणजे नुसत्या समुद्राचें भय त्यांच्या लहान पोरांचेंहि नाहिंसे झाले होते. पण मासेमाऱ्या लहानशा होड्या व नावा यांच्याहून मोठी तरांडी बांधण्याची विद्या आणि ती चालविण्याची विद्या ही त्याना नव्यानें शिका-

वयाची होती. फार तर त्या विद्येचा पुनर्जन्म होता असे म्हणतां येईल. पण ज्या पूर्व जन्मांत कोकणी दर्यावर्दी दूरदूरच्या देशापर्यंत समुद्रावर सफरी करीत, त्या जन्मात आणि या पुनर्जन्माच्या नव्या जन्मांत, मध्यंतरी फारच काळ गेला होता. इतका कीं त्या विद्येचे पूर्व जन्मीचें सगळे संस्कार नष्टप्राय झाले होते. आणि ते संस्कार त्यांना फिरून नव्यानें मिळवावयाचे होते. यामुळें मूळच्या कोकणी लोकांना समुद्राचा परिचय अधिक असला तरी,देशावरून खालीं उतरलेल्या आंगऱ्या सारख्या "देशस्थ" मराठ्यांना आरमार बांधणें चालविणे याची विद्या कोकणी लोकाबरोबरच सुरु करतां आली. म्हणून कान्होजीच्या वडिलापासून या लोकांनीं कोकणी लोकाबरोबरीचें नातें ठेवलें होतें. शिवाय जो बाहेरचा उठून येतो तो केव्हांहि जागच्यापेक्षां अधिक हिकमती व हुन्नरी ठरतो. आंग्रे व इतर मराठे घाटाखालीं कोकणांत उतरलें त्यांचे असेंच झालें. त्यांनाहि ह्या आरमारी विद्येंत विद्या हीच गुरू मानून उमेद-वारी करावी लागली. आणि कुणक्या जेव्हां कान्होजी आंग्र्यांच्या कृपा-छत्राच्या सावलींत गेला तेव्हां त्यालाहि तोच वरचढपणा अंशतः प्राप्त झाला.

कुणक्या कोकणांत आला तेव्हां त्याला गोड पाण्यांत पोहण्याची विद्या येतच होती. कारण उत्तर हिंदुस्थानांत मोठमोठ्या नद्या आहेत आणि यात्रेकरू वैराग्याला बारमास म्हणजे पाऊस काळांतहि प्रवास करावा लागतो. आणि नदीत आंघोळ करण्याचा प्रसंग पुष्कळ. यामुळें पोहण्याची कला त्याला चांगली येत होती.

कोकणी मुलाप्रमाणें समुद्रावरची त्याची नजर मरण्याला थोडा अधिक वेळ लागला. पण याची भरपाई त्यानें, आपल्या बुद्धीमत्तेच्या जोरावर, लवकर प्राविण्य संपादून केली.

रिकामपणामुळें तो पुष्कळ वेळ खाडींत पोहण्यास जाई. पुढें त्यानें असा क्रम ठेवला कीं, एखादे ओळखीचें गलबत खाडींतून समुद्राकडे

निघाले म्हणजे त्याच्याबरोबर पोहत पोहत, किनारा सोडून, आज थोडे उद्यां अधिक, असे पोहत जावे. कारण गलबतातील एखाद्या खलाशी मित्राची नजर आपणावर आहे इतका धीर पोचला तर आपण दमलों तरी बुडणार नाहीं असा विश्वास वाटे. आणि नस्तातून म्हणजे खाडीच्या तोंडातून खळबळणाऱ्या पाण्यांत जो पोहून गेला तो मग पुढें समुद्राला भीत नाहीं.

नस्तातल्या लाटा लहाण पण त्या अनियमित व विश्वासघातकी-वारावादळ नसले तरी तुसत्या दोन प्रवाहांच्या टक्करीमुळें तेथें लाटा आडव्या तिडव्या येतात. उघड्या समुद्रावर ती तरी भीति नाहीं. तेथें लाट केवढीहि मोठी किंवा प्रचंड येवो, तिला सामोरे होऊन हात जोडून नमस्कार केला कीं त्या विनयभावाच्या जोरावरच मनुष्याला तिच्या माथ्यावर चढता येते !

अशा रीतीनें एकदोन वर्षांत कुणक्या हा मोठा बिलंदर जलचर झाला. यांत त्यानें उमेदवारी केली ती लवकरच यशस्वी झाली.

जलतरण विद्येची उमेदवारीहि कुणक्यानें प्रत्यक्ष समुद्राच्या हाता-खालींच केली. तीत श्रम पडले आणि विनोदाला स्थानच नव्हते. समुद्राकडे केव्हाहि पाहिले तर त्याच्याविषयीं आदरबुद्धिच वाटते. हंसू येण्यासारखें समुद्राच्या हातून कांहींच घडत नाहीं. पण अधिकाराची उमेदवारी करावयाची ती अशा माणसांच्या हाताखालीं करणें प्राप्त झालें कीं, ती करिताना कुणक्याच्या विनोद बुद्धीला पुष्कळ वाव मिळाला.

या माणसांपैकीं पहिला धाकल्या. धाकल्या कोळी हा कुणक्यापेक्षां वर्ष दोन वर्षांनीं वडील होता. तो लहानपणीं पोरका झाल्यामुळें पोटीं पोर नसलेल्या भागूजीनें त्याला मुलासारखा वाढविला, आणि शेवटीं एक दिवस यथाविधी दत्तकच घेतला. यामुळें प्रौढामध्यें भागूजीचें महत्व तेंच लहानामध्यें धाकल्याला आलें.

सरखेलानी कुणक्याला आरमारी विद्या शिकवायला भागूजी नाइ-काच्या स्वाधीन केलें. भागूजीनें त्याला धाकल्याच्या स्वाधीन केलें. मग धाकल्याच्या आढ्यतेला काय मर्यादा उरणार ? पण लवकरच कुणक्यानें आपल्या हुशारीनें ती आढ्यता पार नाहीशी करून टाकली.

हुषार खलाशांच्या संगतीनं समुद्रावरील वाहनं चालविण्याच्या विद्येंत कुणक्याची हळू हळू पुष्कळच प्रगति झाली. प्रथम तो धाकल्या व त्याचे जोडीदार कोळी यांच्या बरोबर होड्यांत बसून मासे मारायला जाऊं लागला.

त्या काळीं मासे धरून दूरच्या बंदरीं नेऊन विकण्याचा धंदा चालत नसे. परन्तु कोकणच्या कोळी दालदी लोकांच्या उपजीविकेचें मुख्य साधन मासळी हेंच असे. यामुळें बारमास त्यांना समुद्रांत हिंडावें फिरावें लागे. अगदीं पाऊस मुसळधार पडत असेल, किंवा मोठें वादळ होत असेल, तेव्हांच काय ते हे लोक घरीं बसावयाचे. अशा वेळीं ते शिलकी मासळी वर भागवीत. किंवा नारळ, भाजीपाला वगैरे कोकणीं बागायती माल स्वतःचा किंवा दुसऱ्याचा मिळेल तो घेऊन गुजराण करीत. तसेच या सुट्टीच्या दिवसांतच रिकामपणाचा फायदा घेऊन ते आपले खेळ खेळ-ण्याची हौस भागवून घेत, नाच तमाशे करीत, किंवा आपल्या जातीच्या धर्माप्रमाणें आंबविलेली ताडीमाडी यथेच्छ पिऊन कैफांत दंग होत. याच दिवसांत कायते त्यांच्या हातून गुन्हे घडत. एरव्हीं ते दारूला स्पर्श करावयाचे नाहींत. दारू पिऊन झिंगून दर्याच्या कामाला गेलेला कोळी दालदी कोणी कधीं पाहिलाच नाहीं. आणि तसा कोणी गेलेला दृष्टीस पडला तर त्याचा नाईक त्याला कडक शिक्षा केल्याशिवाय राहावयाचा नाहीं.

वर्षांतले निदान दहा महिने तरी कोळी लोकांचे समुद्रावर जावयाचे. यामुळें त्यांना सर्व तऱ्हेच्या परिस्थितींत समुद्रावरील वाहनें वाहण्याचा प्रसंग येऊन, ते कसे निभावुन जावे याचा अनुभवहि मिळे. कोळी दालदी

लोक फार खोल समुद्रांत जात नाहींत, परन्तु खोल समुद्रांत दूरवर प्रवास करणाऱ्या खलाशापेक्षां या बंदरी खलाशांनाच समुद्रयानाची विद्या अधिक अवगत असे. कारण किनाऱ्याच्या बाजूलाच सर्व तऱ्हेच्या अडचणी अनुभवाला यावयाच्या. या बाजूलाच लहान सहान पण घातक खडक असतात. त्यांतले कांहीं आपलीं डोकीं वर काढतात आणि खलाशांना भिववितात. परन्तु कांहीं खडक घातक स्वभावाच्या माणसाप्रमाणें पाण्यांत लपलेले राहतात. आणि अशांपासूनच खलाशांना खरी भीति असते. खोल समुद्रांत मोठमोठे पर्वतही असतात, पण त्यांच्याही डोक्या-वर फिरून इतकें पाणी असते कीं, जहाज खडकाला लागण्याची भीति असत नाहीं. तसेंच किनाऱ्याच्या बाजूलाच डोंगरावरून वाहून आलेल्या मातींतली वाळू थरावर थर करून सांचून राहते. आणि यामुळें वाळूंत रुतून बसण्याचा जो दुसरा एक धोका जहाजांना असतो तो अर्थातच या बाजूला आढळतो व टाळावा लागतो.

बरें, हे कोळी लोक चार पांच कोसापलीकडे समुद्रांत शिरत नसले तरी, एवढ्याही प्रवासांत त्यांना शिडांचा उपयोग करावा लागतो. तो इतका कीं जेव्हां वाराच पडलेला असेल, आणि शीड फुगत नसेल, तेव्हांच त्यांना वल्ही मारण्याचा प्रसंग असतो. कोळी दालदी लोकांची धांव समुद्रांत थोडी असली तरी त्यांना आपआपसांत किंवा त्याहूनहि परक्या खलाशाशीं युद्ध करण्याचे प्रसंग हरहमेश येत. यामुळें शत्रूवर स्वारी करणं, त्याचं तोंड चुकवून पळून जाणं, जहाजाशीं जहाज भिडवून त्यावर चढून मारामाऱ्या करणं, पकडलेलीं जहाजं आपल्या जहाजांना बांधून बंद-रांत आणणं, बंदरी अधिकाऱ्यांना गोते देणं, अवघड ठिकाणीं किनाऱ्याला जहाजं लावून पाण-उतारा होणं, इत्यादि विद्या त्यांना चांगल्या अवगत होतात.

कुणक्याला सर्व नाविक शिक्षण प्रत्यक्ष मिळविण्याचें काम करायला सांपडलें तें त्याच्या नेमणुकीच्या गलबतावर. या गलबताचें नांव ' वेताळ ' असें

असून, त्यावरील तांडेलाचे नांव 'बकाजीबुवा' असें होतें. परिचितांचें मन आकर्षून घेण्याची विद्या लाघवी स्वभावाच्या कुणक्याला चांगली साधलेली असल्यामुळें, त्यानें लवकरच बकाजीची मर्जी संपादली. आणि बकाजीनें कुणक्याला आपल्या खलाशीविद्येंत लवकरच तरबेज केला. बकाजीचा स्वभाव खेळकर खोडकर विनोदी असल्यामुळें त्याची आणि कुणक्याची गट्टी लवकरच चांगली जमली. आणि श्रेष्ठ कनिष्ठाचें नातें संभाळून कोणा दोघांनी आपला सहवास सुखाचा कसा करावा, हें कुणक्या व बकाजी नाईक या दोघानीं मोठ्या कुशलतेनें अनुभविलें.

जलयानाचीं विद्या कांहीं आपोआप येत असली तरी खरोखर कांहीं मुद्दाम शिकवावीहि लागते. नवी उमेदवार पोरें गलबतावर नोकरी करण्याकरितां राहिलीं म्हणजे त्यावरचे प्रौढ बापये या पोराना निरनिराळ्या रीतीनें शिकवतात. हें शिक्षण म्हणजे कांहीं व्याख्यान नव्हे तर प्रत्यक्ष कामच. कामांतूनच शिक्षण आपोआप निघतें. म्हणून प्रसंगोपात असलेली व नसलेलीहि कामें अशा नवशिक्याना करायला हे प्रौढ खलाशी लावतात.

हें शिक्षण चालू असतां शिवी तर उठल्याबसल्या. पण हाताचे धपके, दोऱ्याचऱ्हाट्यांचे तडाखे, काठीचा मार, हीं सर्व उमेदवाराला सोसावीं लागतात. खलाशाचें जीवन हें जमिनीवरच्या मजुराच्या जीवनापेक्षां अधिक खडतर, अधिक धोक्याचें. यामुळें त्याच्या स्वभावांत फरक पडतो. अधिक गंभीर प्रसंग त्याला येतात म्हणून त्याचा वचपा तो अधिक खेळकरपणानें काढतो. आपला एकलकोंडेपणा आपणाला न जाणवावा म्हणून तो सोबत्याशीं अधिक खेळीमेळीनें वागतो. निकराच्या आवेशानें काम करणाराच्या तोंडी येणारे उपशमाचे उद्गार बेछूट असायचेच ! म्हणून खलाशी भाषा ही खुषकी वरील मजुराच्या भाषेपेक्षां अधिक ग्राम्य अश्लील बनते. समुद्रावरील जीवनांत शिस्तीची जरूरी अधिक. जमिनीवर नोकर उन्मत्त झाला, तो हुकूम ऐकेना, तर त्याचा निर्वाह करण्याला पुष्कळ मार्ग व वाव असतो. पण एखाद्या लहानशा

गलबतांतील दहापांच माणसांतच सर्व वरिष्ठ व कनिष्ठ अधिकार वाटले गेलें असले, आणि तेथें बेबनाव झाला, तर त्याचा निकाल सुखासुखी किंवा नुसत्या तोंडच्या बोलानें लागणें कठीण! हाताशी गांठ लवकरच पडायची.

कुणक्या डोंगर पर्वत फिरलेला, पण समुद्रावरील वाहनें बेसुमार हालडोलू लागली म्हणजे जो उपद्रव होतो तो कुणक्याला प्रथम बराच जाचला. एक दिवस कुणक्या हैराण झालेला पाहून बकाजीनें युक्ति केली. त्यानें बाकाच्या दोरीच्या टोकाला एक लहान आंबेफळ देटानें बांधलें. आणि तें कुणक्याच्या घशांत कोंबलें व गिळण्याला सांगितलें. आणि तें गिळल्यावर वाकाची दोरी हातात घेऊन इतका वेळ खालवर ओढली कीं घशाची खवखव सगळी पार झाली! पोटांत उचंबळतें, ओकारी येते, ही खोडी जाण्याकरितां त्यानें कुणक्याला एका चाकावर घालून इतकें गरगर फिरविलें कीं तो ओकून ओकून हैराण झाला. आणि असें मधून मधून तीन चारदां केल्यावर कुणक्याला गलबत हालण्याडोलण्याची बाधा होईनाशी झाली.

कुणक्या हा उंच डोलकाठीच्या टोकापर्यंत चढायला भितो अशी शंका आल्यावरून बकाजी तांडेलानें एक दिवस ही युक्ती केली. गलबत भर समुद्रांत प्रवास करीत असतां एक दिवस त्यानें इतर सर्व खलाशांना त्यांची न्याहारी त्यांना खाऊ दिली. पण आधींच कुणक्याची न्याहारी एका पानांत बांधून, तिला फडके गुंडाळून, ती डोलकाठीच्या टोकाला एका खलाशाकडून बांधुन ठेविली. आणि कुणक्याला म्हणाला ' पोरा रे, तुझी न्याहारी ती पहा डोलकाठीच्या टोकाशी बांधून ठेविली आहे. भूक लागली असेल तर वर चढून सोडून खा. '

झक मारीत कुणक्या वरपर्यंत चढला. फडक्याच्या गांठी सुटतां सुटेनात. यामुळें डोलकाठी फक्त पायांत धरून, दोन्ही हातांनीं गाठी सोडवून, गाठोडें घेऊन कुणक्या खालीं आला. त्या दिवसाची न्याहारी त्याला फार गोड लागली. आणि त्यानें बकाजीला ती गोष्ट साभिप्राय हंसत हंसत आनंदानें कृतज्ञतेनें सांगितली.

एक दिवस गलबत भर समुद्रांत असतां वारा थोडा उठला होता. अशा वेळीं एक नारळाची पेंडी वाहत चालली आहे असें दिसलें. लगेच बकाजी तांडेलानें गलबतावरची एक लहानगी होडी खालीं सोडली. आणि हातांत एक वल्हें देऊन कुणक्याला म्हणाला ' पोरा, अरे, बघतोस काय ? उतर या होडींत. आणि पकडून आण ती नारळांची पेंडी. तुलाच एकट्याला खायला मिळेल पंधरा दिवस. तूं येईपर्यंत गलबत थांबवून धरतो मी.' त्याप्रमाणें कुणक्या खालीं उतरला. आणि पाठमोरा होऊन होडी चालवूं लागतांच बकाजी तांडेलानें गलबत चालू केलें. आणि किनाऱ्याला पोंचे-पर्यंत होडीला गाठूं दिलें नाहीं !

मात्र हा सर्ववेळ तो होडीकडे दृष्टी देऊन उभा राहीला होता. कारण या होडीला सुकाणू नव्हतें, ती नुसत्या एका वल्ह्यावर चालवून चहूंकडे वळवायची होती. म्हणून कोणताहि धोका वाटतांच कुणक्याच्या मदतीला धावून जावें लागेल हें त्याला माहीत होतें. अखेर कुणक्या नारळाची पेंडी घेऊन सुराक्षित येऊन पोंचल्यावर बकाजीनें सर्व खलाशादेखत त्याची पाठ थोपटली आणि म्हणाला ' शाबास, पोरा, भला धीट आहेस. मर्द होशील. समुद्र जिंकशील. नांव काढशील. देव तुझं भलं करो. '

कुणक्या जातीनेच धोरणी मनुष्यस्वभाव ओळखणारा खरा. पण, समुद्रावरील खलाशाचा स्वभाव जमिनीवरच्या माणसापेक्षां अधिक विकार-वश असतो हें त्याला लवकरच कळून आलें. एक दिवसभर समुद्रांत गलबत असतां बकाजी खालीं झोपून वर आला आणि त्यानें सहज कुण-क्याला विचारलें ' काय रे पोरा, वारा कसा आहे आज ?'

कुणक्या भीत भीत म्हणाला ' तें काय पुसूं नका नाईक ! वारा थेट समोरचा आहे. तोंड फोडतो आहे जसा कांहीं ! शिडाला तर हात लावूं देत नाहीं. सगळ्या खलाशांचे हात वल्ही मारून सुजले. पण गलबत पुढं जायच्या ऐवजीं मागंच जात आहे असा भास होतो.'

वर चढून तकतावर आलेल्या तांडेलाला स्वतःला वारा कसा आहे हें समजत नसायला काय झालें ? पण त्यानें सहज विचायराला आणि कुणक्यानें वरील उत्तर द्यायला गांठ पडली. झालें. कुणक्याच्या गालावर तांडेलाच्या हाताची चपराक अशी सडकावून बसली कीं त्याचा इकडचा गाल तिकडे झाला. यांत कुणक्याकडे काय दोष होता ! पण—

दुसरे एके दिवशीं असाच प्रसंग. तांडेलानें विचारलें 'पोरा, आज वारा कसा आहे ?' त्या दिवशीं वारा काय विचारायचा ? पाठीमागचा वारा ! अगदीं सरळ इष्ट दिशेचा. सगळीं शिडें उभारलीं आहेत. तट्ट फुगलीं आहेत ! चोरून खाललेले पदार्थ साठविलेले माकडांचे गालहि इतके फुगीर नसतात ! गलबत पाण्याला स्पर्श करून जात आहे कीं वरचेवर अधांत्री जात आहे कळेना ! किनाऱ्याकडे पाहावें तों झाडें धूम ठोकताहेत असें वाटे. यांत कुणक्याचा काय गुण ! पण त्याच्या तोंडची खुषखबर ऐकतांच तांडेलानें कुणक्याला आनंदानें मिठी मारली. म्हणाला ' तुझा पायगूण चांगला पोरा.आपण अदमासाआधीं दोन दिवस विजयदुर्गला पोचूं—वारा असा प्रहरभर टिकला तर !' असे म्हणून जे खलाशी रिकामटेकडे म्हणून एकत्र जमले होते त्यांजकडे जाऊन त्यानें त्यांना चिरीमिरी व तंबाखू वाटली. आणि स्वतः त्यांची चिलीम घेऊन एक जोराचा झुरका मारला !

तिसऱ्या एके दिवशीं वारा असा कांहीं पडला कीं बोलायची सोय नाहीं. शीड उभारून पाहिलें तों तें शेळीच्या गलथानासारखें खालीं पडून लिवलिवितपणें लोंबत राहीलें. पूर्वीचे दोन वेळचे अनुभव लक्षांत असल्यामुळें कुणक्यानें विचार करून उत्तर दिलें. 'नाईक, वारा सुटायच्या अगदीं तयारीत आहे बघा. आम्ही शीडें केव्हां उभारायला सांपडतात म्हणून त्यांना हात घालून शीळ वाजवून साद काढला कीं वारा सुटलाच बघा.'

हें चतुर उत्तर ऐकून बकाजी तांडेल कुणक्याच्या पाठीवर हात फिरवुन म्हणाला 'शाबास, धीर सो गंभीर ! पोरा, आपला हा खलाशाचा जन्म ! समुद्र अन् वारा अशा तऱ्हेवाईक तिस्मारखानाशीं गांठ ! तेव्हां आशा बाळगून राहावं नेहमीं ! त्यांच्यावर रागावल्यानं ते थोडीच दाद देतात ' !

असो. खलाशी जीवनांतील अशाच आणखी किती तरी गमती सांगतां येतील !



# ३ पहिला पराक्रम

## ( १ )

विजयदुर्ग शेजारच्या एका वाडींत भिवा बांधकर नावाचा एक घरंदाज कोळी राहात असे. तो घरचा सुखी संपन्न असा होता. कोळ्यांची संपत्ति म्हटली म्हणजे त्यांच्या अंगणांत मासे धरण्याचीं जाळीं किती, आणि खाडींतल्या बंदरांत त्यांच्या होड्या किती, या वरून मोजायची असते. त्या दृष्टीनं भिवा बांधकर सधन होता. तो आतां वृद्ध झाला असून पुष्कळसा घरीं बसूनच राही. ठराविक सणावारीं तो काठी टेकीत खोकत खोकत किल्यांत सरखेलांना मुजरा करायला जाई आणि मानाचा नारळ घेऊन येई. त्याचा सर्व चालता धंदा त्यानें आपल्या सग्या सोयऱ्यांना भागीदारीनें दिला होता. त्याची बायको पूर्वीच वारलेली. आणि त्याला मुलगा नव्हता. फक्त घरीं त्याची एकुलती एक मुलगी रतन नावाची होती. तीच घरचा सर्व कारभार करी.

रतन उपवर झाली होती. पण बापाच्या प्रेमामुळें, लग्न करून त्याला सोडून नवऱ्याच्या घरीं जायला ती तयार नव्हती. तिला नवऱ्याच्या गुलामगिरीपेक्षां बापाच्या घरचीं स्वतंत्रता अधिक आवडे.

रतन रूपानें फारच देखणी होती. ती कोळीण पण तिची वस्त्रें नेहमीं धुतलेलीं असत. ती आंगांत कांचोळी घाली ती आतां तारुण्या-मुळं तंग बसू लागली होती. तिच्या गळ्यांत पण गळ्याबरोबर नेहमीं एक दोन तांबड्या पोवळ्यांच्या माळा असायच्याच. पण मधून मधून एखादी फुलांची माळही ती आवडीनें घाली. हातांत चार दोन मोजकीं काकणं पण तीं मनगटाला घट्ट बसणारीं. ती आपल्या केसांची फारशी काळजी घेत नसे. पण वाऱ्यावर भुरुभुरु उडणाऱ्या तिच्या कुरळ्या केसांची शोभा वेणी फणीनेंहि आणतां येण्यासारखीं नव्हती. मात्र केसांत एखादं फूल असायचंच. तिनं कासोटा घातला म्हणजे वाटे कीं· ही कोणी कोळीण बंद-रावर निघालेली नसून, एखादा शिपाई गडीच लढाईवर निघाला आहे! जाड बोटांनीं तिनं कपाळाला लावलेलं आडवं कुंकू अस्ताव्यस्त दिसे. गाव देवीचा प्रसाद म्हणून ती दोन भिवयामध्यें भंडाऱ्याची एक टिकली इतकी आंखीवरेखीवं लावी कीं, बंदुकीच्या तोंडावर निशाण मारण्याकरतां लावलेली लोखंडी माशीच जशी कांहीं! आणि या खुणेवरून, दोन्हीं भिवयांमधून तिनं एखाद्यावर आणलेल्या दोन्ही डोळ्यांची नजर एक करून रोखली म्हणजे या लक्ष वेधानं ती त्याची शिकारच करीत आहे असं वाटे. अंगानं सडपातळ असल्यामुळं तिचे अंगविक्षेप सहज लीलेनं होत. आणि सामानाच्या किंवा माणसाच्या गर्दीतून ती बगल घेऊन स्पर्श चुकवून वाट काढूं लागली म्हणजे वाटे कीं, भितीनें ग्रासलेला साप बिळांत शिर-तांना किंवा पाण्यांत लवणारी मासळी क्रीडा करितांना याहून नी चप-लाई ती काय दाखवील? तुतारीच्या किंवा शिंगाच्या आवाजासारखी तिची हाक खणणणीत असे. आणि तिनं कोणाला दटावून किंवा हुकूम

करून तोंडानं शब्द काढला म्हणजे त्याची अवज्ञा करण्याची छाती कुणालाहि होत नसे.

रतनचा व्यवसाय व कारभार कोळिणी बायकांपेक्षांही पुरुषांतच अधिक चाले. कारण या कामी तिनं आतां आपल्या बापाचीच जागा घेतली होती. सरकार दरबारीं तिचं विशेष काम कसलं ? परंतु किल्यांत सरखेलांच्या पुढं एखाद्या निमित्तानं जाण्याचा प्रसंग तिला येई. तेव्हां ' भिवा बांधकराचा मर्द प्रतिनिधी आलारे आला ' असं थट्टेनं म्हणून ते तिला कामकाज विचारीत किंवा सांगत. आणि बापाला पोंचविण्याचा मानाचा नारळ तिला देत.

पण सगळ्या कोळीवाड्यांत मातबर आणि वजनदार म्हटला म्हणजे भागूजी नाईक. सरखेलांचा तो डावा उजवा हात असेच लोक मानीत. यामुळं त्याच्या पाळीव मुलाला म्हणजे धाकल्यालाच रतन सांगून जाईल अशी लोकांची अपेक्षा. तशीच भागूजीची देखील. आणि स्वतः धाकल्याचीहि तीच अपेक्षा नव्हती कोठें ?

भिवा बांधकरानं भागूजी बुवांशीं बसल्या बसल्या ही गोष्ट एक वेळ काढिलीहि होती. पण रतनच्या कानावर ही कुजबूज गेली तेव्हां तिनं थोडा कांगावा केला. ती बापाला म्हणाली ' दादा, मी काय तुम्हाला नकोशी झालें आहे कीं काय ? म्हणून तुम्ही मला घरांतनं घालवून देण्याचा विचार चालविला आहे ? '

भिवा म्हणाला ' बाळ असं कसं होईल ? पण आतां यापुढं तुला लग्नाची ठेवली तर लोक मला हसतील ना ? कुळाची चाल रीत पाहिली पाहिजे. वाटेल तर तुझ्या नवऱ्याला मी घरजावई करून तुला घरीं ठेवुन घेईन. पण बाळ लग्नाच्या विचाराला मोडा घालूं नको. '

हा युक्तिवाद निरुत्तरच नव्हे काय ? यामुळं रतनला गप्प बसावं लागे. पण आधी जावई होणार,आणि मग तो घर जावई होणार ! जावयाची

पसंती सासऱ्याच्या मनानं केली होती. पण वधूला ती पसंत नव्हती. धाकल्याचें नांव निघालं कीं, ती कपाळाला आठ्या घाली. आणि मनांत म्हणे " मोठा राजबिंडाच शोधून काढला कीं नाहीं मला द्यायला ? काय त्याची सुरत अन् काय त्याची मुरत ? मासे धरायचीं जाळीं चांगली फेकील, पण माणसाला काय नुसते मासे खाऊनच जगायचं नसतं. मासे मारण्यापेक्षां इतर पराक्रम जगांत पुष्कळ आहेत. आमच्या सरखेलांनीं येवढी गोदी बांधली, हा विजयदुर्गचा किल्ला बांधला, तो काय मासे मारून आणून वाळत घालायला ? मासे वाळण्याला समुद्राचं वाळवंट वाटेल तेवढं रिकामं पडलंच आहे कीं ? मासळीवर झडप घालणारे कावळे जाळ्यांवरून उडवून देण्याचं काम एखादं लंगडं पांगळं पोरहि बसल्या बसल्या करील. पण हे फिरंगी कावळे आमच्या दर्यांत गरीब गुरीब खलाशांवर आणि प्रवाशांवर झडपा घालतात, त्यांचा बंदोबस्त जाळीं फेंकून किंवा वल्हीं उगारून थोडाच होणार ? त्याला बंदुका आणि तोफा उडवायला शिकलं पाहिजे. तरवारी चालविल्या पाहिजेत. भांडीं खणाखण वाजविलीं पाहिजेत. समुद्रांत शिरून सामने केले पाहिजेत. "

या युद्धविद्येंत धाकल्या पटाईत नव्हता. कुणक्याची मर्दुमकी मात्र हळूहळू आपोआप दिसून येत होती. हें लक्षात घेऊन रतन म्हणे ' भित्र्याचं' तुळतुळीत अंग काय पाहायचं ? शूराचं खडबडीत अंगच अधिक चांगलं. धाकल्या रूपानं पाहिला तर कुणक्यापेक्षां अधिक चांगला. पण कुणक्याच्या तोंडावरच्या मर्दानी तेजानं त्याला येणारं रूप कांहीं वेगळंच होतं.' त्यावरच रतनची नजर ठरून राही. तेंच तिला पहावंसं वाटे.

हळू हळू रतन कडून होणारा हा पक्षपात धाकल्याच्या नजरेला येऊं लागला होता. आणि यामुळं कुणक्याचा हेवाही तो मनांतून करी. पण अशा गोष्टी एकदम बाहेर बोलून दाखविण्याच्या नसतात. म्हणून धाकल्या मनांतल्या मनांत चूर असे. वरकांति कुणक्याचा स्नेह तो अबाधित राखी. पण रतनचा उल्लेख निघाला कीं तो मनांतून विरमे आणि त्याच्या कपाळाला लहानशी आठी पडे.

कुणक्याची अक्कल हुषारी, त्याचं प्रसंगावधान, त्याचं धैर्य, त्याची मर्दुमकी, हे सर्व गुण आपणापेक्षां त्याच्यामध्यें अधिक आहेत ही गोष्ट धाकल्याच्या नजरेस पडली होती. ती त्याला नाकबूल करितां येत नव्हती. पण त्यामुळं रतन सारखी बायको हातची जाणार ही कल्पना आली कीं त्याची मत्सरबुद्धि आड येऊन कुणक्याच्या आंगचे हे वरील गुण नाकबूल करण्यापर्यंत त्याची मजल जाई. धाकल्यानं रतनला एकटी गांठण्याचा प्रयत्न करून युद्ध प्रसंगाच्या गोष्टी मुद्दाम काढाव्या, आणि त्या प्रसंगांत आपण केलेले पराक्रम फुगवून सांगून कुणक्याच्या पराक्रमांची किंचित अवहेलना करावी. पण धाकल्याच्या अंगावर एक ओरखडाहि न उठतां, कुणक्याच्या तोंडावर व छातीवर जखमा व्हाव्या या गोष्टीनं खरी हकीकत कुणाच्याहि लक्षांत येण्यासारखीं ती रतनच्या लक्षांतून कशी जाईल ?

एक दिवस ती कपटबुद्धीनं पण थट्टेनं म्हणाली देखील—'मला वाटतं, धाकल्या, कुणक्यानं आपली मर्दुमकी सरखेलांना दाखवायला या जखमा आपल्याच हातानं कदाचित् करून घेतल्या असतील.' आणि यावर धाकल्या काय म्हणतो याकडे तिनं मार्मिकपणानं लक्ष लावलं.

धाकल्याला या प्रश्नाला होय म्हणवेना कारण त्याचं मन त्याला खात होतं. पण 'छेः छेः तसं नाहीं. तसं कसं कुणी म्हणावं ?' असा निर्वाळा देऊन खरं कबूल करण्यालाहि त्याचं मन घेईना. त्याच्या मौनावरून रतननं ताडायचं तें ताडलंच. आणि धाकल्याच्या या असत्य सूचनेचा, हीन वृत्तीचा, मनांतून तिला तिटकाराच आला.

याच्या उलट युध्द प्रसंगाच्या गोष्टी कुणक्याशीं बोलण्याची पाळी येई. तेव्हां आपल्या पराक्रमाचं वर्णन न करतां जें काय झालं तें धाकल्यानं आणि आपण दोघानीं मिळून केलं असं तो भासवी. या उदार

स्वभावामुळं तिचं त्याच्यावरचं प्रेम दुणावे. ती मनांत म्हणे 'या कुणक्याला ना आई ना बाप, ना वतन ना घरदार, पण तो केवळ आपल्या गुणांनीं कसा नांवारूपाला येतो आहे पहा. प्राणी उमदा आहे खरा. अशाची जोड आयुष्यांत मिळाली तर'—

पण युध्द प्रसंग सोडून ख्याली खुशालीचे किंवा हास्य विनोदाचे प्रसंग असले, तरी त्यांतहि कुणक्याची बुध्दी आपलं डोकं वर काढी. हें रतनला दिसून आलं. लवकरच कोजागरी पौर्णिमेचा दिवस आला तेव्हां धाकल्या रतनला म्हणाला 'चला, आपण आज रात्रीं होडी काढून खाडी-तनं वर जाऊन चांदण्याची सहल करूं.' रतनला या सूचनेचा हेतू न कळण्याइतकी ती जड बुध्दीची नव्हती. पण तिनं थोडा कांगावा केला. ती म्हणाली 'फार चांगली गोष्ट. पण सहलीला कोण कोण जायचं?'

धाकल्या म्हणाला 'कोण कोण काय विचारतीस? मजेनं जायचं. आपण दोघंच दोघं जाऊं. त्याला ताज चालविणारा गडी तरी कशाला हवा? बसून वल्हं मार तूं. मी उभ्यानं ताज चालवीन. आणि थोडासा वारा निघाला तर शीडच आपलं दोघांचं काम करून आपल्या हातांना मोकळीक देईल.'

रतन म्हणाली 'ठीक आहे. ये बंदरावर चांद असा कासराभर वर निघाल्यावर. मी होडी तयार ठेवायला सांगते.'

धाकल्या मनांतनं खूप आनंदला. कारण दोघंच दोघं होडींत अस-ल्यानं आज तिच्याशीं मन मोकळं करून बोलायला मिळेल, तिच्या मनां-तलं किलमिष काढून टाकून तिची मनधरणी किंवा जरूर तर पायधरणी करायला सापडेल, अशी आशा त्याला उत्पन्न झाली. पण रतनच्या मनांतला डाव वेगळाच होता. तिनं आधीं कुणक्यालाच निरोप पाठवून ठरल्यावेळीं बंदरावर येण्याची सूचना दिली. चांगली आठ माणसं बसतील येवढी मोठी होडी तयार ठेवण्याचा हुकूम कोळी नोकरांना केला. तापलेलं मसाल्याचं दूध आणि शाळीं बरोबर घेण्याची योजना केली.

धाकल्या रात्रीं बंदरावर येतो तों होडींत रतन आणि कुणक्या दोघंहि आधींच येऊन बसलीं होती. धाकल्या आलेला पाहून रतन म्हणाली ' वः किती वेळ तुझी वाट पाहिली मी ! आणि तूं येत नाहींस असं वाटलं तेव्हां, सहलीचा बेत फुकट जाऊं नये म्हणून, कुणक्याला हाक मारली. तूं काळजी करूं नको. तुलाहि इथं जागा आहे बसायला. नाहींतर वल्ह चालवायला. '

मूळ ' दोघंच दोघं जायची ' तें जाऊन ' तुलाहि बसायला जागा आहे की' इथपर्यंत मजल आलेली पाहून धाकल्याला मनांतनं खूपच राग आला. पण करणार काय ? आपली फजिती झाली हें त्याला बाहेर दिसूं द्यायचं नव्हतं. तो निमूटपणं होडींत चढला. समोरासमोरच्या फळ्यांवर कुणक्या व रतन एकमेकांकड तोंड करून बसलेली. तेव्हां धाकल्याला तिसऱ्या वेगळ्या फळीवर बसावच लागलं. आणि तेंहि रतनच्या मागच्या अंगाला. तिच्या पाठीकडं तोंड करून ! बसल्या जागेवरनं त्याला रतनचं तोंड न दिसतां फक्त तिची पाठ दिसे. आणि समोर बसलेला म्हणून कुणक्याचं तोंड दिसे ! त्याच्या मनांत फार बोलण्याची हौस उरली नाहीं. आणि रतनच्या पाठमोरा म्हणून त्याला फार बोलणं सोईचं नव्हतं. दोघांत तिसरा बोलायला आणखी कुणीतरी हवा, म्हणून रतननं आपला एक तरुण स्नेही खलाशी या चांदण्याच्या सफरीकरितां बरोबर घेतला होता. तो कुणक्याच्या पाठीशीं बसला होता. त्याचं आणि रतनचं बोलणं सुरूं होतें.

रतन त्याला म्हणाली ' माणक्या, कामाच्या वखतीं उगाच गळा काढून गाणी म्हणतोस तो आतां होऊं द्याना पराक्रम. तुला तोंड आवर म्हणायला इथं आतां कुणी नाहीं. आमचे हात वल्हीं मारायचं काम करतील तर तुझ्या तोंडाला गाणीं म्हणायचं तरी काम लाव. '

माणक्या म्हणाला ' वाग बया ! आम्ही तर रोज गाणीं म्हण-णारे. पण हे राव तुझ्यासमोर बसले आहेत ना आज. ह्यानांच आज

गाणीं म्हणायला सांग ना. त्यांच्या तोंडचं गाणं आम्हाला कधींच ऐकायला सांपडत नाहीं. आम्ही सांगितल्यानं तो थोडंच म्हणणार. पण तूं सांगितलंस तर मात्र म्हणेल खचित. '

कुणक्या म्हणाला ' माणक्या, मी कांहीं तोंड न उघडण्याची शपथ घेऊन आलों नाहीं. पण मला तुम्हा खलाशी लोकांचीं गाणीं येत नाहींत मग कशी म्हणूं ? '

' अरे आधीं गाणीं शिकावीं आणि मगच हातीं वल्हं धरावं असा आम्हा खलाशी लोकांचा शिरस्ता आहे. आमचीं गाणीं न शिकतां आमच्या या धंद्यांत कशाला पडलास ? '

' अरे, कुणक्याला खलाशांचीं नसलीं तरी इतर कांहीं गाणीं येत असतीलच. '

' मला जें कांहीं गळयावर म्हणतां येतं तें मी म्हणेन. पण तुम्ही त्याला खलाशी गाणं म्हणाल कीं नाहीं कुणाला ठाऊक ? माझं सगळं लहानपण बैराग्या गोसाव्याच्या संगतींत उत्तर हिंदुस्थानांत गेलेलं. मला फक्त दोहरे आणि भजनं म्हणतां येतात. तीं हवीं तर म्हणतों. '

रतन म्हणाली ' आणखी काय पाहिजे ? खलाशांचीं गाणीं आम्हीं रोज ऐकतों. भजन आणि दोहरे आम्हाला कशानं ऐकायला मिळणार ? म्हण रे कुणक्या भजन आणि दोहरे.'

कुणक्याचं पाठांतर चांगलं होतं. त्याच्यापाशीं निवडक प्रासादिक भजनांचा संग्रह होता. तो म्हणाला ' रतन ऐक भजन ' असं म्हणून त्यानं गोड गळयानं एक हिंदी भाषेतील भजन म्हटलं.

भजन ऐकून रतन तल्लीन झाली. पण त्या भजनाचा अर्थ कळला नाहीं म्हणून ती म्हणाली ' कुणक्या, तुझ्या भजनाची हिंदी भाषा आम्हाला समजत नाहीं. आतां म्हटलेल्या भजनाचा अर्थ सांग ना, ' कुणक्यानं त्याचा अर्थ सांगितला. तो रतनला फारच मोहक वाटला.

तरुण माणसांना एखादेवेळीं देखील ही वैराग्यपर गाणीं आवडत नाहींत असं नाहीं. शिवाय या भजनामध्यें नाविन्य होतं. खलाशी लोकांचीं कांहीं गाणीं चांगलीं असलीं तरी तीं नित्य कानावर पडणारीं. जें गाणं रोज कानावर पडतं त्याच्या अर्थाकडं सहजच लक्ष जाईनासं होतं. आणि खलाशांच्या पुष्कळशा गाण्यांना तर अर्थच नसतो. त्यांत यमक असतं, ताल असतो. पण अर्थ आपला असा तसाच ! कांहीं घरगुती बोलणं असतं. एखादा झगडा असतो. एखादा उखाणा असतो. दालदी कोळी लोकांची जशी संस्कृती, त्या बेताचींच त्यांचीं गाणी. पण श्रम घालवायला अशा गाण्यांचा फार उपयोग असतो. ठेक्यावर तालावर वल्हीं मारलीं तर तें श्रमाचं काम न वाटतां एकप्रकारची करमणूक होते.

कुणक्यानं भजन म्हणून दाखविल्यावर माणक्याला गाणीं म्हण म्हणण्याचा हक्क त्याला सहजच आला. तो म्हणाला ' ' माणक्या, चल निघूंदेत आतां तुझ्या ठेवणींतील गाणीं.

माणक्या म्हणाला ' मी म्हणेन. पण रतन तूं एक म्हणावं आणि त्यावर मी एक म्हणावं अशीं म्हणेन. कोण हटेल तें पाहूं.'

भजन म्हणून दाखविल्यामुळं कुणक्याला रतनलाहि गाणं म्हणण्याचा आग्रह करण्याचा हक्क प्राप्त झाला होता. तोही म्हणाला ' रतन ' तुझ्या तरी तोंडचीं गाणीं मला ऐकायला कधीं मिळणार ? तुझ्या होडींत बसून जाण्याचा प्रसंग मला पूर्वी कधीं आला नव्हता. '

रतन म्हणाली ' ठीक. होऊन जाऊंद्या आज. पुरुषांपेक्षां बाय-कांनाच गाणीं अधिक येतात हें मी तुम्हांला दाखवितें. '

रतननं सुरवात केली. ती म्हणाली—

' हाकार हाकार रे व्हलकारा
ह्ये नार चालली म्हायेरा
म्हायेरासनं आणीन मी

फळफुलं नामी नामी
पाठवूं नग रे बोलावणं
परतुन लाविन मी पाव्हण
चढली हंडी चुलीवरी
भरलया तुपानं घागरी
खाऊन पिऊन फुगल्यावरी
येईन परतुन तुझ्या घरीं
हाकार हाकार रे भरतारा ॥

यावर माणक्या म्हणाला ‘ रतन आतां समुद्र काय म्हणतो तें ऐक.’

रतन म्हणाली ‘ समुद्र काय म्हणतो अन् कुणाला म्हणतो ’ ?

माणक्या म्हणाला ‘ तुझ्यासारख्या तरण्या गर्विष्ठ होड्या समुद्राच्या पाठीवर ऐटीनं दिमाखानं धावतात मिरवतात. त्यांना समुद्र काय म्हणतो तें ऐक ’

‘ किती बुडविले किती तुडविले याद राख साजणी
जरि डौलानें ठुमकत मुरडत चाललीस याक्षणीं
हीं शिडें नव्हत हे गाल तुझें गोरटे
फुगवूनी हंससी तूं मला खचित उद्धटे
मम अंगावरूनी बेगुमान धावसी
अशि कोळुन प्यालिस मर्यादा तरि कशी
वाकुल्या दाविसी माना वेळुनि मला
परकऱ्या पोरिचा नाच न शोभे तुला
बहकलीस अगदीं बेसुमार तूं जाशि अल्लड तरुणी

रतन हंसून म्हणाली ‘ ऐकलं तुझ्या वेड्या समुद्राचं म्हणणं. सगळ्या म्हाताऱ्यांना सगळ्या तरुण मुली उद्धट वाटतात. पण तो नुसता तरुणपणचा आनन्द असतो. असूंदे. ऐक तर माझ्या होडीचं तुझ्या समुद्राला उत्तर.

कां वृथा भरतसा रागें मज सागरा
मनिं विचार करूनी बघा मजकडे जरा
मधु वसंत आला भेटाया कुल-सखा
घेऊनी सर्वे या रम्य लोल तारका
मम बंधू प्रेमळ शीत वात मजसवें
घेउनी धावतो स्वगृहीं जाया जवें
मी काय अनादर केला तुमचा बरें
सांगाना उकलुनि अन्तरंग तें खरें. '

आतां फिरून माणक्याची पाळी आली. तो म्हणाला रतन आतां माझं गाणं आणखी-एक—

लगीन पहावं करून रे
झिरपा घ्यावा धरून रे
नीरा पेला भरून रे
शिडात वारा भरून रे
समुद्र जावा तरून रे
त्याशी गमजा करून रे
स्वर्ग पहावा मरून रे

अशी गाण्याची उत्तर प्रत्युत्तरं झाली. पण यांत धाकल्या मुळीच भाग घेईना. हें पाहून कुणक्या म्हणाला 'गड्या, धाकल्या, आम्ही सगळ्यानी गाणी म्हटली. पण तूं आपलं तोंड मुळींच उघडीत नाहींस हें बरं नव्हे. म्हणना एखादं गाणं तुला येत असलं तर ?

पण आंबुसल्या तोंडानं धाकल्या म्हणाला 'मी आज इथं आलों हेंच चुकलं माझं. उगाच तुमच्या दुधांत माझा मिठाचा खडा कशाला ?

मग रतनला वाटलं कीं धाकल्याला अगदीं नाखूष करणं बरं नव्हे. म्हणून तिनं हातातलं वल्हं आंत ओढून खालीं ठेवलं. आणि उठून

धाकल्या बसला होता त्या फळीवर त्याच्या जवळ जाऊन बसली. तेव्हां कुठं धाकल्याच्या तोंडाची कळी थोडी उकलली. तो म्हणाला 'आतां होडीची मालकीणच गाणं म्हण म्हणती तर म्हणतों.' असं म्हणून त्यानं खालील गाण म्हटलं.

पान तुसी ग कात मसी ग
चुना कुणा पाशी मग मागूं ग
सारी सारी रात माझी वाऱ्यावरी जात
आता बात माझी कुणापाशीं सांगू ग

तेव्हां रतन म्हणाली 'हे घे माझं उत्तर'

बाजाराला बंदराला
तुम्ही याल काय बोला
बंदरीचे पोहे लागती गोड
खाली बसा तुम्हा सांगते तोड

कुणक्या म्हणाला 'जमलं आतां न् काय? आतां बाजाराला बंदराला आम्हाला कोण बोलावणार?

तें ऐकून सगळेजण हसले. धाकल्या खुषींत आला.

रतन म्हणाली चला आतां. होडी बांधाला लावून आपण सगळी जणं उतरूं आणि मैदानांत चांदण्यांत बसून दूध पिऊन शाहाळी खाऊं.

मग किनाऱ्याला लागण्याच्या वेळचं ठराविक गाणं सर्वांना पाठ असतं, त्याचा एकेक चरण एकेकानं म्हटला.

'भले रे खाशी'
'बंदर वाशी'
'कोण बंदर'
'विजयदुर्ग बंदर'

सगळे मिळून म्हणाले 'भेटव भेटव भेटव!'

होडी बांधाला लागली आणि सगळेजण बांधावर उतरले.

या प्रसंगानंतर रतनच्या संगतींत हास्यविनोद करण्याचा असाच दुसरा एक प्रसंग चालून आला. त्याचा प्रकार असा.

सरखेलांच्या आज्ञेवरून कुणक्याच्या नाविक विद्येंतील प्रवेशाचा विधियुक्त समारंभ व्हावा असं ठरलं. कुणक्याचं नाविक शिक्षण यथाविधि सुरू करण्याचं काम भागूजी बुवानीं आपल्याकडं सोंपाविलं आहे.

असें पाहून धाकल्यानें एखाद्या गुरुजीचा आव घातला. तो म्हणाला ‘ कुणक्या, उद्यां तूं नारळ सुपारी घेऊन ये. बरोबर आपल्या शास्त्रीबुवाना आण. म्हणजे मी तुझ्याकडून समुद्रपुजा करवीन. ’

‘ आणि त्याबरोबर गुरुपुजा ’ कुणक्या मुद्दाम म्हणाला. ’

‘ हं. तेंहि होईल. आणि झालं पाहिजेच. आपल्या दर्यावर्दी नावाडी लोकाना गुरु पुजावाच लागतो ना ’

‘मी झालं तरी तेंच म्हणतों. व्हायचं सगळं धर्माप्रमाणें होऊं दे ना. दादा ! नाहींतर माझी विद्या फळाला यायची नाहीं ’

कुणक्याच्या अंतरंगातले खरे स्नेही सख्या आणि डाम्या असे दोघे होते. धाकल्या हा त्या तिघांचाहि थट्टेचा विषय असे. उद्यां समुद्र-पुजेंबरोबर धाकल्याची गुरुपुजा व्हायची आहे असं कुणक्यानें त्याना कानांत सांगतांच ते हंसू लागले. म्हणाले ‘ अरे वः याला आपली लंगोटी सावरतां पुरेवाट होते अन् हा म्हणे, समुद्रविद्येंत तुझा गुरू. बरं आपण राहूं या गुरूपुजेला हजर. अन् करूं गमत त्या चढेल पोराची ! उगीच सरखेलानी भागूजी नाइकाला अन् या धाकल्याला चढवून ठेवलं आहे दोघांचाहि शेंदूर आपण उतरूं ’

दुसरे दिवशीं दहा घटका दिवसास कुणक्याचा दीक्षाविधी ठरला बहिरी नावाची एक मोठी होडी खाडीकांठीं नांगरून ठेवली होती. त्यावर बसून तो विधी व्हायचा होता. गुरुपुजा करून घेण्याकरितां धाकल्या नवें

मुंडासें बांधून धुवट कांबळें घेऊन डुलत डुलत आला. इकडून शास्त्रीबुवा व कुणक्या आले. तिकडून सख्या व डाम्या बरोबर आणखी चार दोन खेळगडी घेऊन आले. त्यातलें कांहींजण होडीवर चढले. शास्त्रीबुवा किनाऱ्यावरच आपली पूजा सांगण्याची पोथी घेऊन बसले. त्यांनीं मंत्र म्हणण्याला सुरवात केली. कुणक्यानं गंधफूल घेऊन तें खाडीच्या पाण्यावर वाहिलं. मग आणखी गंधफूल घेऊन तें धाकल्याच्या डोक्यावर टाकलं. तेव्हां सख्या म्हणाला ' अर नारळ बिरळ कांहीं आणलास कीं नाहीं गुरुजीच्या डोक्यावर फोडायला ? '

कुणक्या म्हणाला, 'मला काय माहीत मी गुरुजीला नारळ द्यायचा म्हणून ? मला वाटलं गुरुजींनीच प्रसाद म्हणून नारळ मला द्यायचा असेल म्हणून आणला नाहीं.'

सख्या म्हणाला ' भिकारडारे भिकारडा शिष्य. अरे नारळ नाहीं तर निदान सुपारी तरी ! गुरु काय तुला फुकटच्या फाकट समिंद्राच्या मांडीवर घालणार हाय ? अरे, नारळ नाहीं तर सुपारी तरी ! '

हे तो म्हणतो तोंवर खाडी काठी असलेल्या पोफळीच्या झाडावरून फळें धरलेली एक खांदी धाकल्याच्या डोक्यावर येऊन आदळली. आणि झाडावर आधींच जाऊन चढून बसलेला डाम्या टाळी वाजवून ओरडून म्हणाला ' अरे भिकारड्यानो एक सुपारी काय म्हणून, हा सुपाऱ्यांचा घडच्याघड दिला कीं मीं कुणक्याकरितां त्याच्या गुरूजीला. "

त्या आघातानें हुळहुळें झालेलें आपलें डोकें धाकल्या चोळू चेपू लागला. इतक्यांत आणखी एक मौज झाली. होडीच्या दोनही कडांवर मिळून एक फळी आडवी घातली होती. ती थोडी दोहों अंगानीं बाहेर आली होती. तिच्या एका कडेवर धाकल्या बसला होता. दुसऱ्या कडेवर डाम्या बसला होता. यामुळें फळी तोलून धरली गेली होती. पण पोफळीची ढापी डोक्यावर पडून डोक्याला इजा झाली त्या धांदलीत धाकल्या

असतां, सख्या एकदम फळीवरून उठून बाजूला झाला. आणि सगळें वजन एका अंगाला होऊन फळी उलथल्यामुळें धाकल्या सरळ खाडीच्या पाण्यांत पडला. मग काय विचारतां? सर्वजण खो खो हंसू लागले. कर्मधर्मसंयोगानं याच वेळीं रतनची फेरी या बाजूला कां व्हावी? पण झाली खरी.

धाकल्या पाण्यातून वर येऊन निथळत्या अंगानं ओल्या कपड्या-निशी होडीच्या बावखडीला धरून वर चढत होता त्याला हटकून रतन म्हणाली ' अर वा तुम्ही सगळे होडीवर! अन् धाकल्यालाच एकट्याला कशी हौस आली खाऱ्यापाण्यांत बुडी मारायची! अन् अंगावरच्या कपड्यानिशी कुणी आंघोळीला पाण्यात पडतात जणुं!'

डाम्या म्हणाला ' अग रतन, तुला माहीत नाही कांहीं एक यातलं असं दिसतं. अग, सरखेलांच्या हुकमान धाकल्यान आज कुणक्याला आपला शिष्य केला. त्याला तो आजपासून खलाशाची विद्या शिकवणार आहे. पण कसला भिकारडा शिष्य! गुरूला पुजायला त्यानं एखाद नार-ळाचं बोंड आणलं नाही का सुपारी.'

' अन् म्हणून कुणक्या करितां मी एक सुपारीच काय पण पोफ-ळाची सबंद खांदीच वाहिलीना या या गुरुजीच्या डोक्यावर!' डाम्या हसून म्हणाला.

' अन् देवा प्रमाणं गुरुची पूजा करायची तर त्याला अंघोळ घालावी लागती! म्हणून मी या फळीच्यां टोकावरचा उठून ती धाकल्याला घडवली!'

' अर वार गुरु अन् वार शिष्य ' रतन हसून म्हणाली, 'या धाकल्याला हातांतलं व्हलंहि नीट पेलेना, आणि हा म्हणं कुणक्याला खलाशी विद्या शिकवणार! तोंड बघा त्या गुरुचं.''

धाकल्या अंग निथळून करड्या नजरेनं रतनकडं पाहू लागला. ' अन् म्हणीला तुला भवानीला या वक्ती इथं कुणी ग बोलावणं पाठविलं होतं? हाइस अजून रिकाम टेकडी उनाडाया.'

रतन कंबरेवर दोनहि हात ठेवून ऐटींत उभी राहून धाकल्याच्या आवाजाची नक्कल करून म्हणली. ' भल्या माणसा, गिराण लागलेला चन्द्रच बगावा म्हणतात. एरवीचा चन्द्र तर रोज दिसतो. आज तूं कुणक्याचा गुरु झालास नव्हे ? पण गुरु होऊन एक क्षण झाला नाहीं तर पाण्यांत कोसळून पडलास. ही मौज एरवी कशी पाहायला मिळणार ? अन् काय म्हणालास ? मी रिकाम टेकडी उनाडायला ? लगीन झालं नाहीं म्हणूनच रिकाम टेकडी नव्हे कां ? पण कायरे तुझं तरी लगीन कुठं झालं आहे अजून ? मग तूं देखील रिकाम टेकडाच कीं नाहीं माझ्या सारखा उनाड ? '

' मग घालवूं ना आपण दोघं मिळून आपली उनाडकी ? ' धाकल्या आपलं मुण्डास पिळीत म्हणाला.'

' वाजी वा ! अन् शास्त्रीबुवाहि आयतेच आहेत. जवळच्या जवळ. मंगलाष्टक अन् मंत्र म्हणायला ? पण बाबा, बाईल अशी सुखानं मिळत नसते. ती पराक्रमानं मिळवावी लागते. मी सहज इकडं फिरकलें तों तुझी फाजिति दृष्टींला पडली. त्यांचं असं वाईट वाटून घेऊं नको. पाण्यांत पडलेल्या खलाशी बहाद्राचं अंग आधीं कोरडं होऊं दे. मग बोहल्यावर चढायची तयारी कर. '

हीं सर्व उत्तर प्रत्युत्तरं ऐकून शास्त्रीबुवा हंसत होते. धाकल्या, रतन आणि कुणक्याची खेळगडी मंडळी या सर्वांना ते ओळखीत होते. कुणक्या-बद्दल त्यांना उमेद व अभिमान होता. धाकल्याला ते मनांतून तुच्छ मानीत. आणि रतन ही कोळ्याची पोरं असून चाणाक्ष समजूतदार होती याचं कौतुक करणारे शास्त्रीबुवा होते.

ते म्हणाले ' धाकल्या, पोरा, रतननं अगदीं वर्मावरच घाव घातला तुझ्या. पण तुम्ही दोघंहि बोहल्यावर चढायला तयार झालां तरी मंगलाष्टक म्हणायला मी तयार पाहिजे ना ? कुणक्याच्या समुद्र पूजेला मंत्र म्हणायला मी आलों होतों. अवचित भेटणाऱ्या उनाड नवरा नवरींचं

लगीन लावायला आलों नव्हतों. लग्नाच्या संकल्पाची माझी पोथी घरीं राहिली रे बुवा.'

असें म्हणून शास्त्रीबुवा आपली शालजोडी सरसावून घराकडे निघाले.

कुणक्या धूर्त होता. तोहि मनांतनं धाकल्याला मूर्ख म्हणून तुच्छ मानीत होता. तरी भागूजी नाईकासारख्या प्रतिष्ठाचा तो मुलगा, 'हें लक्षांत ठेवून त्याला वरकरणी मोठेपणा देऊन तो त्याला नुसता खेळवीत असे. भागूजी नाईकानीं कुणक्याला समुद्रदीक्षा देण्याला धाकल्याला सांगावं अशी काय धाकल्याची योग्यता होती ? पण आपल्या कामाशीं गांठ घालून त्याहि हास्यापद गोष्टीला कुणक्यानें संमति दिली होती.

आपल्या संवंगड्यानी धाकल्याची मुद्दाम कुचेष्टा केली तिला वरकरणी दोष देण्याकरितां सख्या डाम्या यांच्या अंगावर ओरडून तो म्हणाला ' कायरे लेकाच्याहो ! माझ्या दादाची खोडी काढतां कायरे ? पण ध्यानांत ठेवा. मी कसा झालं तरी आतां त्याचा चेला झालों आहे. तुम्हांला बदडून काढीन संभाळा ! होय कीं ग नाहीं रतन ! '

## ( २ )

असो. एक दिवस मासे मारण्याच्या कामात धाकल्याला सुट्टी होती. तेव्हां तो म्हणाला 'गड्या, आज रात्र चांदणी आहे. समुद्र शांत आहे. तेव्हां आपण दोघे होडी काढून समुद्रांत उगीच सहल करायला जाऊं. कुणक्याला ही गोष्ट आवडण्यासारखीच होती. म्हणून दोघांनीं एक मोठीशी होडी पसंत करून पाण्यांत ढकलली. बरोबर दोन वल्ही, ताजेची काठी, एक शीड, धार लावलेले दोन कोयते, आणि चार ओले नारळ इतकी सामुग्री घेऊन ते होडीवर चढले.

प्रथम वारा बेताचा होता म्हणून त्यांनीं वल्हीं आडवीं टाकून दिलीं, शीड उभारलें, आणि सुकाणूहि हातीं न धरतां होडीला स्वच्छ-

दानें जाण्याला सोडली. कारण वारा किनाऱ्याकडून येत असून होडी केवळ शिडाच्या आधारावर अफाट समुद्राकडे खेचली जात होती. प्रथम त्यांनीं एकदोन ओले नारळ सोलून फोडून पाणी पिऊन थोडे कोवळें खोबरें खाल्लें. मग पानाच्या पुड्यांत घालून आणलेले ओले काजूचे गर खाल्ले. आणि मग त्यांच्या गप्पा गोष्टी सुरू झाल्या.

कुणक्या म्हणाला ' धाकल्या, या फिरंगी लोकांचे मला मोठं कौतुक वाटते. काय तो त्यांचा वेष ? काय ती त्यांचीं हेंगाडी भाषा ! पहावं तों सदा कैफांत धुंद ! पण बेशुद्धीत दिसले तरी त्यांची व्यापारी बुद्धी सदा जागी ! ती कधींच झोंपीं जात नाहीं. सौदा करण्यांत ते मोठे कुशल दिसतात. आणि हत्यार चालविण्याची वेळ आली म्हणजे त्यांतहि स्वारींची तयारी. असले हे चमत्कारिक लोक, यांचा देश आहे तरी कुठं ? वारुळ फुटून मुंग्या मुलखभर पसराव्या तसे हे बंदरानिहाय आढळतात. समुद्रावर तर त्यांची येरझार सुरुच आहे. असा एकही दिवस जात नाहीं कीं दुरून त्यांचे तरांडीं दिसलीं नाहींत. '

धाकल्याला तरी या विषयीं अधिक माहिती कोठून असणार? पण तर्क लढविण्याचं शहाणपण दाखविण्याकरितां तो म्हणाला ' यांना मुळीं त्यांचा म्हणून देशच नसेल. यांची जात तरांड्यावरच जन्मली ती तरांड्या वरच जगणार. '

कुणक्या हंसून म्हणाला, ' तूं वेडा आहेस. माणसांची जात अशी कांहीं समुद्रावर जन्मून समुद्रावर मरत नाहीं. त्यांचा म्हणून कुठें तरी स्वदेश असेलच. वाईट इतकंच वाटतं कीं,आमच्या देशावर येऊन ते धाड घालतात, तशी उलट आम्हांला त्यांच्या देशावर जाऊन धाड घालतां येत नाहीं. हे फिरंगी व्यापारी माल इकडे विकावयाला आणतात. तो कांहीं जहाजांतल्या जहाजांत ते तयार करीत नाहींत खास. असेच कोठे तरी त्यांचे कारखाने असतीलच. परवां किल्यांत दर्यासारंगांनीं आपल्या नोक-रींत ठेविलेला गोरा खलाशी आहे त्याला मी हळूहळू विचारलं. तेव्हां मला

आपल्या देशाची हकीकत त्यानं सांगितली. त्या देशांचीं नांवं सांगितलीं तीं लक्षांतही राहात नाहींत. म्हणे त्यांच्या देशाभोंवतीं असेच दर्याकिनारे आहेत. आणि असणारच. कारण एरव्हीं हीं त्यांचीं जहाजें कुठें जाऊन लागतील ? आणि मालाच्या कारखान्याप्रमाणं त्यांच्या बाजारपेठाहि असणारच. कारण इकडून ते मलमल, मसाले, नारळ असले पदार्थ नेतात ते विकत घेणारे व्यापारीहि तेथें कोणी असणारच. मला फार हौस येते कीं त्यांच्या एखाद्या जहाजावर नोकरी धरावी आणि त्यावरून जाऊन त्यांचा देश पाहून यावं. '

धाकल्या म्हणाला, ' ती गोष्ट बोलूंच नको. ते आमच्या लोकांन नोकर म्हणून आपल्या जहाजावर घेत नाहींत. पण गुलाम म्हणून सांपडेल त्याला घेऊन जातात. आणि असे जे कोणी गेले ते परत आलेले मी पाहिले नाहींत. मग त्यांचे ते काय करितात देव जाणें ! '

कुणक्या म्हणाला, ' असंच कोणाला तरी दुसऱ्या गोऱ्या लोकांना गुलाम म्हणून विकीत असतील झालं. '

' मग आम्ही तरी त्यांना असे गुलाम म्हणून कां विकूं नयें ? '

'खूप विकाल, पण विकण्याआधीं त्यांना धरले पाहिजेत ना ? गोऱ्या फिरंग्याचा व्यापारी माल बंदरीं मिळाला तर आम्ही धरून आणूं. पण जनावरांसारखी माणसं धरून आणून विकण्याची चाल आमच्यांत कुठं आहे ? आणि ती पडेल असंही वाटत नाहीं. कारण आम्ही गोरा फिरंगी धरून बंदरांत आणला तर तो कसा वागतो हे आपण पहातोंच. पाण्यांतनं ओढून बाहेर काढलेल्या सुसरीसारखा तो चळवळ करीत असतो. धडपड करीत असतो. शेपटीसारख्या लाथा झाडीत असतो. रानटी जनावर घरीं आणून कोणाला पाळतां येतं काय ? तीच गत या गोऱ्या फिरंग्याची. आणि गुलाम म्हणून वागवावयाचं तर राहिलेंच, पण नोकर म्हणून पदरीं ठेवला, तरी कसा दिमाखानं वागतो हें तुम्ही आम्ही रोज पहातोंच तो

नोकरी मेहनतीनं करील, पण सुट्टीची वेळ झाली, खाण्याची वेळ झाली, म्हणजे बेगुमानपणं धन्याकडे पाठ फिरविल्यावांचून राहणार नाहीं. '

हें बोलणें होत आहे त्या सुमारास दूर अंतरावर एक तांबडा दिवा चमकल्यासारखा दिसला. धाकल्या तो दिवा पाहून भ्याला. आणि म्हणाला ' अरे आज अमावास्या नाहीं. आणि हा वेताळाचा दिवा कुठून दिसतो ? '

कुणक्या म्हणाला ' कुठेंहि गेलं तरी तुझा वेताळ तुझ्याबरोबर पाठीराख्यासारखा येतोसा दिसतो मला. आज अमावास्या नाहीं हें खरंच. पण अमावास्या असली तरी खरोखरीचा वेताळ कुठचा ? आणि त्याचा तांबडा दिवा हा सगळा तुम्हां भोळ्या लोकांच्या कल्पनेचा खेळ असतो.'

' मग आपल्या गांवीं अमावास्ये दिवशीं ओसाड बेटांतल्या उंच वडाच्या झाडावर अगदीं टोंकाला तांबडा दिवा दिसतो तो कोण लावतो रे ? आणि तो अमावास्येच्याच दिवशीं कां लागावा ? एरव्हीं कां लागू नये? आणि तो दिवा पाहून जो कोण नमस्कार करून पैसा.नारळ सुपारी न ठेवून पुढें जाईल, त्याला दुसरें दिवशीं हटकून वाख्याचा उपद्रव कां होतो ?'

'मी देतों त्याचें उत्तर. तुम्हा लोकांना काळीकुट्ट आमावास्या म्हणज काळ रात्रच वाटते. काळ रात्र म्हटली म्हणजे त्या रात्रीं कोणी तरी देवाचा दूत नाहीं तर शत्रू आपल्या मानगुटीला बसायला येतो असं तुम्हा लोकांना वाटतं. आणि मग त्याला तुम्हीं पैसा सुपारी नारळ ठेवतां. आणि त्यानें कृपा करावी अशी हात जोडुन प्रार्थना करितां' !

' हो तर ! पैसा सुपारी नारळाची येवढी मोठी रास त्या दिवशीं पडते तीं काय उगीच ! '

' उगीच कोण म्हणतो ? ती रास लुटून नेण्याला कोणी लुच्चा सोदा तयार असतोच ना ! वेताळाचा दिवा राहिला झाडावर. पण ही

लूट पार्टीत भरून न्यायला तिथं जवळच वाटेवर मनुष्य बसलेला असतो तो तूं पाहिलाच असशील. या वरनं झाडावर दिवा कोण टांगुन ठेवतो हें तुझ्या लक्षांत सहज यावं. तो लूट नेणारा माणूस वेताळाचा सगासोयरा असेल नाहीं ? पण तुम्ही हीं कोकणचीं खुळीं भोळीं भितरी भुतं ! तुम्हाला लुबाडुन खायला असा एखादा बेताळ न भेटला तरच आश्चर्य ? थांब येत्याच अमावस्येला मी तुझं हें वेताळाचं वेड डोक्यांतनं कायमचं काढून टाकतो. '

'तें कसं ? '

'तें असं कीं, त्या रात्रीं अगदीं मध्यान्हीला तुला साक्ष ठेवून त्या वडाच्या झाडावर चढतों, आणि तो दिवाच उतरून खालीं तुझ्या पायाशीं आणून ठेवतों. आणि मग पाहतों कीं पैसा, नारळ, सुपाऱ्या यांची लूट मारणारा तो वेताळाचा पुजारी काय करतो ते. तुम्ही कोकणी लोकांनीं या भुताखेतांचं बंड फारच माजवून ठेवलं आहे. आणि तसंच देव देव-स्कीचं. तुम्हाला दररोज दहा वेळां एवढ्या तेवढ्या कामाला मुहूर्त पाहावे लागतात. मला वाटतं कीं तुम्हीं लोक मुहूर्त पहावयालाहि मुहूर्त पाहूं लागाल तर बरें होईल. '

धाकल्या हसून म्हणाला 'ते रे कसं ? '

कुणक्या म्हणाला 'ते असं कीं मुहूर्त पहायलाच मुहूर्त काढूं लागलं' म्हणजे कांहीं वेळां तो न मिळतां प्रत्यक्ष मुहूर्त काढण्याचं काम तुमचं अडूं लागल, आणि तें अडूं लागलं म्हणजे मग तुम्ही मुहूर्त पाहायचं टाकून द्याल. '

धाकल्या म्हणाला 'अरे तो बघ लाल दिवा दिसत होता त्या ऐवजीं आतां पांढरा दिवा दिसूं लागला. '

कुणक्या म्हणाला 'मग याचा अर्थ तूं काय करणार ? वेताळ जाऊन त्या कोणी समंध आला असा कीं काय ? पण राहूं दे. ही थट्टा. तुलाहि

माहीतच आहे कीं दुरून दिसणारा तो दिवा एखाद्या गलबतावरचा असावा. मग तें आपल्या लोकांचं असो कीं फिरंग्यांचं असो. ''

धाकल्याची भीति जाऊन त्याला आतां आनंदाची उर्मी आली. तो म्हणाला,' हां हां ! बरी संधी सांपडली सरखेलांची कामगिरी बजावायला. त्यांचं आम्हांला नेहमीं सांगणं असतं कीं, पोर हो, समुद्रावर जाल तेव्हां डोळे उघडे ठेवीत जा. माझा परवाना काढल्याशिवाय या बाजूनं कुणालाही गलबत वाल्याला मीं जाऊं देणार नाहीं. म्हणून जहाज, गलबत, फतेमारी, मचवा असलं कोणचंही तरांडं दिसलं कीं त्याला अडवून परवाना कोठें आहे म्हणून विचारीत जा. तुमच्या पाठीमागं आम्ही आहों. बिनपरवान्याचं तरांडं फिरतं आहे असं कळलं कीं, वाघासारखीं धावणारीं आमचीं गलबतं जाऊन त्यांना धरून कैद करून आणल्याशिवाय राहणार नाहींत. चला तर आपण आपली होडी त्या दिव्याच्या रोखानंच नेऊं. '

कुणक्या म्हणाला, ' आम्हांला त्या तरांड्याकडं जाण्याची गरज नाहीं. कारण तेंच पहा आमच्याकडं वेगानं येत आहे असं दिसतं. तो पांढरा दिवा हळू हळू नाहीं का मोठा दिसायला लागला ? '

धाकल्या म्हणाला, ' तर मग आयतं बरंच झालं देवच पावला म्हणायचा. '

कुणक्या म्हणाला, ' हे तूं जरा थांबून बोल ना ! कारण देव पावला कीं सैतान पावला हें ते तरांडं समोरासमोर आल्याशिवाय कळणार नाहीं. ते गरीब व्यापारी आहेत कीं भामटे फिरंगी आहेत हें दुरून पाहिलं पाहिजे. आणि त्या धोरणानं वागलं पाहिजे. मात्र आपले कोयते कमरेला लटकावले पाहिजेत.भामट्यांशीं गांठ पडली तर त्यांची गरज लागायचीच.'

दोघांनीं आपापलीं वल्हीं आंत ओढून घेतलीं. होडीचं शीडही ढिलं केलं. वारा नव्हता. आणि समुद्र शांत होता. यामुळें अशी ही थांबवून धरलेली होडी जागच्या जागीं उभी राहिली.

सुमारं पाव घटका गेली न गेली तोंच तें दूर दिसणारं जहाज समोर आलं. त्यांतल्या खलाशांनींहि आपलें शीड उतरलं. फक्त या दुसऱ्या होडीची लगट करण्याकरितां त्या रोखानं आपली वल्हीं धिमेपणानें चालू ठेविली होतीं.

आतां या दोन तरांड्यांत चार सहा हातांचं अंतर राहिलें होतें. त्या परक्या जहाजांतील एक खलाशी उठून उभा राहिला. धाकल्याला वाटलें कीं तो आपल्याशीं बोलण्याचालण्याकरितांच जहाज थांबवून उभा राहिला. आणि ओरडून म्हणाला 'तुम्ही कोण असाल ते थांबा. पुढं जाऊं नका. हा सरखेलाचा मुलुख आहे. इथं त्यांचं राज्य आहे. त्यांच्या परवान्याशिवाय इकडं समुद्रावरनं कोणालाच फिरकण्याची मोकळीक नाहीं. तर दाखवा तुमचा परवाना कोठें आहे तो.'

याला उत्तर म्हणून तो उभा मनुष्य कांहींसं बोलला, त्याचा त्या दोघांनां कांहींच बोध झाला नाहीं. तो कोणत्या तरी फिरंग्याच्या भाषेंत बोलत होता. धाकल्याच्या प्रश्नाला उत्तर म्हणून त्यानं कांहींच हालचाल केली नाहीं. पण आपल्या खलाशांना खुणा करून व कांहीं खुणेचे शब्द बोलून, त्यानं आपलं जहाज या दोघांच्या होडीला आणून भिडविलं. जहाजांत उभ्या राहिलेल्या फिरंग्याशिवाय दुसरा एक फिरंगी व एक देशी इसम होता. त्यांनीं चपलाई करून या होडीचा काठ धरला. दोऱ्या टाकून त्या होडीवरील वल्ह्याच्या खुंट्यांना गच्च बांधल्या. आणि ते दोघे होडींत उतरूं लागले. अर्थात हें लक्षण कांहीं स्नेहभावाचं नाहीं असें उघड दिसलं.

जहाजांतल्या एका माणसाला कोंकणी भाषा येत होती तो त्या फिरंग्याच्या सांगण्यावरून म्हणाला 'दोस्त हो तुम्हाला आमचा परवाना पहायचा आहे ना? मग ठीक आहे. तो परवाना आम्ही भिंगाच्या चवकटींत डोलकाठीच्या दांड्याला खिळ्यांनीं पक्का करून बसविला आहे. आमच्या जहाजावर या आणि पहा तो.'

कुणक्याला हें लक्षण ठीक दिसलं नाहीं. कांहीं म्हटलं तरी फिरंगी जहाजांत तिघे जवान भर भक्कम. शिवाय चिव्व्यांच्या तबकडीखालीं जहाजाच्या पोटांत आणखी एकादा असेलहि. तेव्हां आपण दोघांनीं ? आपली होडी सोडून त्यांच्या जहाजावर चढून त्यांच्या आधीन व्हावं हें कांहीं बरं नव्हे. म्हणून तो धाकल्याला म्हणाला ' धाकल्या, खबरदार! आपल्या होडीच्या खुंट्यांना दोऱ्या बांधल्या त्या सोडविल्या पाहिजेत. म्हणजे मग आपली होडी आपल्याला हवी तशी वळवून वाटेल तशी फिरवितां येईल. '

पण हें सर्व करण्याला जहाजातल्या लोकांनीं वेळ दिला कुठं ? तो फिरंगी मोडक्या तोडक्या कोकणी भाषेंत म्हणाला ' दोस्तहो, असें भितां कां ? सुदैवानं आपण यावेळीं या अफाट दर्यांत एकमेकांना भेटलों तेव्हां आपण मित्रासारखंच वागलं पाहिजे. शत्रू मानण्याचं काय कारण ? तुम्ही कोण आहां ?'

धाकल्या ऐटीनें म्हणाला 'आम्ही सरखेल कान्होजीराव आंग्रे यांचे आरमाराचे खलाशी आहों. आणि दर्यावरील तरांड्यांचे परवानें पहाण्याचें काम आमच्याकडं आहे. '

हें ऐकून जहाजांतला तो इसम म्हणाला ' वाः मग फारच चांगली गोष्ट. आम्ही सरखेलांचा परवाना काढूनच हिंडतों, त्या अर्थी आम्हीं त्यांचे अंकित व स्नेहीच ठरतों. या आमच्या जहाजावर या. तुमच्या जवळ कांहीं निशापाणी असेल तर आम्हाला द्या. आमचं तुम्ही घ्या, आणि स्नेह्यासारख्या चार गप्पागोष्टी करा. मग तुमची वाट तुम्हांला आहे आमची आम्हाला आहे. तुमची ही लहानशी होडी बहुधा बंदर किनाऱ्यानंच फिरणारी दिसते. फार हलकी आहे. दोघांनीं वल्हविली तर अर्ध्या घटकेंत किनारा गांठाल. आम्हीच जरा संकटांत आहोंत. कारण वारा पडला आहे. शीड अंग धरीत नाहीं. तेव्हां आम्हाला वल्ही मार-

ण्याचे श्रम करूनच वाट चालावी लागणार. आणि आम्हाला मजल तर लांब गांठायची. '

कुणक्याला अजून विश्वास पटेना. पण धाकल्याचंहि बोलणं थांबेना. धाकल्या म्हणाला ' असं असेल तर कांहींच हरकत नाहीं. तुमचं जहाज बरंच मोठं दिसतं. माल काय काय भरला आहेत ? '

जहाजांतील मनुष्य म्हणाला, ' तें काय तोंडानं सांगूं ? एकदां मुक्कामाला पोचूं द्या तर खरे. म्हणजे सहा महिन्याची राखण लागेल. मालपण माल आहे. उमदा आहे. गिऱ्हाईक आंखून धरून ठेवलं आहे. गोव्याच्या बंदरांत जहाज नांगरण्याचाच अवकाश, कीं मालाच्या गोण्या किनाऱ्यावर आणि किंमतीचे पैसे आमच्या हातांत. मग परत येतांना विजयदुर्गला उतरण्याचा आणि सरखेलांचं दर्शन घेण्याचा आमचा विचार आहे. दोस्त, तुम्ही तर सरखेलाचे खास नोकर. आम्हांला त्यांची भेट होण्याचे कामीं मदत करालच. '

इतकं बोलून तो इसम होडींत उतरला. त्यानं धाकल्याचे माने-भोंवती हाताचा विळखा एखाद्या जिवलग मित्राप्रमाणं घातला. आणि त्याला जहाजावर ओढून नेऊं लागला. त्या परक्या खलाशाचा विश्वास वाटून धाकल्याचेहि पाय जहाजावर चढूं लागले. तेव्हां कुणक्या काय करणार ? त्याला एकटा या लोकांच्या हातीं जाऊं देणं बरं वाटेना. बरें, या संधीचा फायदा घेऊन होडीच्या खुट्यांना बांधलेल्या दोऱ्या सोडवून आपली होडी काढून पलीकडे न्यावी तर धाकल्या तितका अधीकच दुरावणार. बरं तर बरं. नाहींतर त्याला मदत करायला आपल्याशिवाय दुसरा कोण ? मग जें काय व्हायचं असेल तें दोघांचं होवो. असा विचार करून, होडी जहाजाला जखडून बांधलेली तशीच ठेवून, कुणक्या उठला आणि धाकल्याच्या मागोमाग फिरंगी जहाजावर चढून गेला.

हे दोघेही जहाजावर चढले तेव्हां होडींत तिसरं कोणी नाही, असं पाहून जहाजांतील फिरंग्यानं होडीकडून तोंड फिरविलं. आणि घोव्याच्या

टापीसारखे आपले पायांतले जोडे जहाजाच्या फळ्यांवर खाड खाड आपटीत तो पुढें आला. त्यानं आपल्या कमरेवर दोन्ही हात ठेविले आणि मान खूप लववून मोठ्या अदबीनं करावा तसा मुजरा केला. आणि स्वागतादाखल म्हणून गोड हेल व आवाज काढून कांहीं शब्द तो बोलला. नंतर त्या देशी खलाशानं जवळचा एक कंदील घेऊन तो मध्यें ठेवला. जवळची पेटी उघडून तिच्यातून थोडी सुकी मासळी व सुकामेवा काढून तो एका लोखंडी तबकांत या दोघांपुढें ठेवला. आणि म्हणाला ' दोस्त हो यांतलें कांहीं तुम्ही घेऊन खाल्ल्याशिवाय आम्हांला बरें वाटणार नाहीं. वेळ किती शांत आहे चांदणं कसं पिठासारखं स्वच्छ पडलं आहे. अशा वेळीं देवानचि आपली गांठ घातली असं नव्हे काय ?

लवकरच तो फिरंगी जवळच्या दुसऱ्या एका लाकडी पेटीवर बसला आणि त्यानं तिसरी एक पेटी उघडून त्यांतून एक मद्याची सुरई व पेले काढले आणि म्हणाला, ' तुम्ही आम्ही दोस्त आहों. तर होऊन जाऊंद्या या पेल्यांची सलामी. '

कुणक्यानं त्या पेल्यांना हात लाबून दुरूनच नमस्कार केला. धाकल्यानें दारू भरलेला पेला हातांत घेतला. कारण तो जातीचा कोळी असल्यानं ताडीमाडीसारखे मादक पदार्थ पिण्याची त्याला संवयच होती. पण मद्यें मद्यें झालीं तरी त्यांची जात वेगळी तसा त्यांचा वासही वेगळा. फिरंग्यानं पेल्यांत ओतलेल्या दारूचा वास धाकल्याला फार उग्र वाटला. तथापि भलेपणाला बळी पडणारा तो असल्यामुळें, त्यानं तो पेला तोंडाला लावला आणि तोंड वाईट करीत दोन घोट घेतलेच.

इकडे या दोघांशीं ते बोलत बसले असतां जहाजांतला तिसरा खलाशी उठला, आणि त्यानें जहाजाला होडी बांधली होती त्या दोऱ्या सोडून ती हातानं थोडी दूर ढकलली. हें पहातांच कुणक्याला विश्वासघाताचा संशय आला, आणि ' होडी कां सोडली ? धाकल्या ऊठ, दगा

दिसतो, तूं मूर्ख आहेस, असें म्हणत कुणक्या रागानें उठून उभा राहिला. तोंच फिरंगी व देशी खलाशी यांनीं जवळची एक दोरी घेऊन मोठ्या सफाईनें ती कुणक्याच्या गळ्याभोंवतीं घालून ओढली. हे पाहून कुणक्यानें आपला कोयता कमरेचा काढून हातीं घेतला, व तो हात उचलून उगारून मारणार इतक्यांत होडीच्या दोऱ्या सोडून परत आलेल्या तिसऱ्या खलाशानें कुणक्याचें मनगट घट्ट धरलें.

धाकल्याच्या लक्षांत हा प्रकार आल्याशिवाय राहिला नाहीं. पण त्या पेल्यांतील दारूनं त्याचं निम्मेअधिक काम केलं होतं. तो उठला तोंच भोवळ येऊन खालीं पडला. हां हां म्हणतां त्या तिघां खलाशांनी या दोघांचे हातपाय बांधून त्यांची गठडी केली. फिरंगी खलाशी आपल्या बोलीनं देशी खलाशाला कांहीं बोलला. बहुधा तेच घेऊन देशी खलाशी म्हणाला, ' तुम्हांला कान्होजी आंग्र्याचा परवाना पहावयाचा होता ना ? तो त्या डोलकाठीच्या दांडीला लावला असं मघाशीं मी म्हटलं. पण तें साफ खोटं होतं. आतां त्या परवान्या ऐवजीं तुम्हां दोघांनाच डोलकाठीच्या खांबाला बांधून टाकतों. म्हणजे आंग्र्याचे आणखी कोणी दर्यावर्दी पहारेवाले आमचा परवाना पहावयाला मागतील तर त्याऐवजीं तुम्हालाच दाखवूं म्हणजे झालं. तुम्हीच आमची जामिनागिरी पटवा कशी ! '

फिरंग्यासह तिघेही खलाशी खूप मोठ्यानं हसले. त्यांनीं टाळ्या वाजविल्या. मांड्यांच्या बाजू थोपटल्या. तो मुख्य फिरंगी खास जहा-जाचा नाखुदा होता. तो म्हणाला 'या दोघांना आतां जहाजाच्या तळाशीं नेऊन ठेवा. आणि वरून बांबूच्या ताट्या ओढून घ्या. त्यावर चांगलं वजन ठेवा. म्हणजे त्यांना बाहेर पडतां येणार नाहीं. बसूं देत तेथें आमचा परवाना तपाशीत. नाहीं तर बिनपरवाना चालविलेल्या व्यापारी मालाचे गोण मोजीत. '

त्यानं फिरून आपली दारूची शिशी काढली आणि तिचं बूच उडवून दोघां सोबत्यांसह पेल्यावर पेले झोंकले. अजून वारा निघाला नव्हता. म्हणून त्यांतलि दोघे वल्हीं मारण्याला बसले, आणि बडा फिरंगी सुकाणूजवळच्या फळीवर बसून अर्धवट गुंगींत गाणीं म्हणूं लागला.

( ३ )

कुणक्या व धाकल्या यांच्या शिवाय खालीं जहाजाच्या तळ घरांत तिसरं कोणीच नव्हतं. यामुळं त्यांना एकमेकांशीं हलक्या आवाजानं पण मोकळ्या मनानं बोलण्याची सोय झाली. तळघरांत अंधार असल्यामुळं एकमेकांच्या अंगाला दोऱ्यांनीं कुठं कसं जखडुन बांधलं होतं हें पाहण्यास मार्ग नव्हता. परंतु आपल्या अंगची बांधलेली मोटकुळी चेंडुसारखी ढकलीत नेऊन कुणक्या धाकल्याच्या अगदीं जवळ गेला. तेव्हां दोघांनाही आपल्याला बांधलेल्या दोऱ्या कुठं कशा आहेत हें दोऱ्यांच्या लपेटीवरून चाचपून अजमावतां आलं.

कुणक्या म्हणाला 'माझा कोयता त्या दुष्टानं प्रथमच काढून घेतला. पण तुझ्या कोयत्याचं काय झालं' ?

धाकल्या म्हणाला ' दैव आपलं म्हणून माझा कोयता तपासून काढून घेण्याची बुद्धी त्यांना झाली नाहीं. मला उभाच्या उभाच त्यांनीं आवळला. माझा कोयता माझ्या कंबरेच्या बाजुला दोरींत सांपडलेला आहे. तो माझ्या अंगाला खुपतो आहे. पण तो खुपल्याचं दुःख मानावं कीं सुटकेचं साधन सुदैवानं चुकून जवळ राहिले म्हणून त्याचा आनंद मानावा हें सांगायलाच नको. '

कुणक्या म्हणाला, ' ठीक, ही ईश्वराची कृपाच म्हणावयाची. तर आतां तूं आपल्या आंगच्या दोऱ्या सैल करतां येतात कीं काय याचा अंदाज लाव. आणि मीही तेंच करितों. पण संभाळ, आपल्या हालचालीचा यत्किंचितही आवाज होऊं देऊं नको. दोघांच्या लक्षांत ही गोष्ट आली

कीं, कोठें कोठें अंग आंत ओढून घेतल्यास दोरी किंचित् त्या जागीं सैल होईल. अशा रीतीनें दोऱ्या सैल केल्यामुळं बांधल्या जागेच्या वेदना किंचित् कमी झाल्या, व योग्य वेळीं आणखी प्रयत्न केला तर एखाद्या दोरीतून हात किंवा पाय मोकळा करतां येण्याचा संभव त्यांना दिसूं लागला.

कुणक्या हळूच म्हणाला, 'आम्ही मोकळे झालों तरी दोघेच दोघे, व ते तिघे आहेत. आमची हालचाल ऐकल्याबरोबर ते तळघरांत येऊन दोऱ्या आणखी घट्ट करावयाचे. किंवा समोरासमोर उभे ठाकून त्यांच्याशीं लढण्याचा प्रसंग यावयाचा. म्हणून या ठिकाणीं आपण कांहीं कपट कावा केला तरच तो उपयोगी पडण्याचा थोडा संभव. म्हणून मी तुला सांगतों तसं कर. बोलण्याचं सगळं काम मजवर सोंपीव. तूं फार तर कोणच्याही बोलण्याला नुसता हुंकार देत जा. आणि मधून मधून कण्हत कुंथत जा. उद्यां दिवस उजाडला म्हणजे त्या दुष्टांची धुंदी उतरेल,त्यांचं आमचं कांहीं बोलणं होऊं लागेल, आणि कोणत्या धोरणानं बोलत गेल्यास सुटकेचा कांहीं मार्ग सांपडेल तें मी पाहून ठेवीन. मी त्यांना असं सांगणार आहे कीं तूं एका श्रीमान शेतकऱ्याचा मुलगा असून मी तुझा नोकर आहे. जवळच्या एका बंदरालगतच्या गांवीं तुझे आईबाप राहतात. पैकीं तुझा बाप अंथरुणावर पडून अगदीं मरायला टेकला आहे. तूं कामानिमित्त विजयदुर्गला येऊन राहिला होतास. मीही तुझा नोकर सोबती म्हणून होतों. तुझ्या बापाच्या आजाराची बातमी विजयदुर्गला कळली म्हणून एखाद्या मोठ्या गलबताची वाटहि न पाहतां तूं मिळाली ती लहानशी होडी काढून त्या बंदरीं दुखणाईत बापाच्या समाचाराला निघालास. किनाऱ्या किनाऱ्याकडूनच होडी जावयाची. पण वारा पडल्यानं शीड अंग धरीना. आणि ओहोटी असल्यामुळें होडी समुद्रांत दूरवर खेंचून नेली गेली. यांची गांठ पडल्यावर खरं तें सांगून आपण आपल्या मार्गानं जावें तें न करतां, तूं माडी दारू प्यायला होतास म्हणून, आपण सरखेलांचे शिपाई आहों, असं

सांगावयाची दुर्बुद्धी तुला झाली याहून दुसरं तिसरं कांहीं नाहीं. म्हणून त्यांनीं तुला पुढच्या बंदरावर खालीं उतरावं अशी त्यांची विनवणी मी करणार आहे. तूं आधीं कांहीं बोलूं नको. रडण्याचं काम तुझं, बोलण्याचं माझं. आणि तूं बोललासच तर मी आतां सांगितल्या या बहाणेदार हकीकतीला धरून बोल. सरखेलाचे शिपाई असल्याचं मुळांत खोटं असलेलं सोंग टाकून दे. याच्याहि उपर आणखीं कांहीं वेगळा प्रसंग उत्पन्न झाला तर मी आयत्या वेळीं गुप्त किंवा उघड सूचना देईन त्या प्रमाणं वागण्याचं धोरण ठेव म्हणजे झालं.'

असो. ती रात्र अशीच गेली. त्या बंदीवानाना झोंप कोठून येणार? म्हणून पडल्या पडल्या वरच्या मजल्यावरच्या त्या तिघां शत्रूंच्या हाल-चालींचा कानोसा घेत, आणि जागच्या जागीं आपल्या अंगावरील दोऱ्या कोठें किती ढिल्या करितां येतील याचा अंदाज काढीत त्यांनीं ती रात्र घालविली.

दुसरे दिवशीं सूर्योदयाबरोबर वारा निघाला. आणि नुसत्या शिडाच्या जोरावर जहाज चालूं लागलं. तिघेही खलाशी काम नसल्यामुळं मोकळे झाले. आणि फिरून त्यापैकीं दोघांनीं दारू पिण्यास सुरवात केली. रात्रीं जहाज चालेना, तें खडं राहूं लागलं, म्हणून ते दारू प्यायले. आणि सकाळीं जहाज आपल्या आपण चालूं लागलं म्हणूनहि ते दारूच पिऊं लागले.

तिसरा खलाशी मात्र त्यांच्यांत सामील झाला नसावा. तो देशी खलाशी जहाजाच्या तळघरांतला कांहीं खाण्याचा माल हवा होता म्हणून, वरची कळकांची तबकडी उचलुन, खालीं उतरला. असं पाहून कुणक्या व धाकल्या या दोघांनीं अगदीं निपचित् पडल्याचं सोंग आणलं. आणि कुणक्याच्या उपदेशाप्रमाणं धाकल्यानं रडण्याला सुरवात केली. तेव्हां कुणक्यानं पडल्या पडल्या गरिबीच्या स्वरानं देशी खलाशाला हाक मारली. तो म्हणाला 'खलाशी दादा, तुम्हाला आमची कोकणी बोली समजते ही मोठी सोय झाली.'

खलाशी म्हणाला, ' बोली समजते म्हणजे ? मी काय कोणी परदेशचा खलाशी आहे कीं काय ? या तुमच्या कोकण पट्टीचाच राहणारा आहे. '

कुणक्या हळूच म्हणाला 'मग तुम्ही कोकण पट्टीचे देशी खलाशी तर या गोऱ्या फिरंग्याच्या नोकरींत कसे शिरलांत? तुम्हाला पाहून तुम्हीं सरखेलांचेच नोकर आहां, आणि तुम्ही त्यांचेच जहाज घेऊन चाललां अहांत, अशी कल्पना होऊन आमच्या धन्यानीं परवाना पहायला मागण्याची आपआपल्यांत थट्टा म्हणून केली. पण ती अंगावर आली खरी. आमचेच धनी, पण त्यांच्याच तोंडावर सांगतो कीं ते जिथं तिथं अशीच घाण करितात. '

हें ऐकून धाकल्या कण्हत म्हणाला, ' तूं खरंच बोललास कुणक्या. आनंदानं माणूस गाफील नाहीं तर फाजील होतं. हें जहाज पहातांच मला आनंद झाला कीं आतां यांतून आपल्या दुखणाईत बापाच्या भेटीला लवकर जातां येईल. पण मला काय माहीत कीं हें फिरंगी चांच्यांचं जहाज असेल म्हणून ? मी आनंदांत थट्टा करायला गेलों ती अंगावर आली खरी. आतां खलाशी दादा, तुम्हीच माझे मायबाप. माझ्या गावचं बंदर आतां लवकर येईल. तरी कृपा करून आम्हां दोघांना मोकळे करून बंदरांत सोडून द्या. माझा बाप मरायला टेंकला आहे. तो माझी आठवण काढून रडत असेल. '

असं म्हणून धाकल्यानं मोठ्या दुःखाचं सोंग आणून रडण्याला प्रारंभ केला. कुणक्याकडं रडण्याचं काम नव्हतं तरी त्यानंही बारीक बारीक हुंदके देऊन धाकल्याच्या रडण्याला साथ दिली.

देशी खलाशी निढावलेला, चार बंदरचं पाणी प्यालेला होता. नुसत्या रडण्याचे करुण विलाप ऐकून तो विरघळण्या सारखा नव्हता. तथापि तो अगदींच पाषाण हृदयी नसल्यामुळं जवळच्या एका मालाच्या गोणींवर टेंकला, आणि त्यान कुणक्याकडून सर्व हकीकत ऐकून घेतली. ती

सांगून होत असतां धाकल्यानं आपल्या रडण्याचं नाटकाचं काम चांगलं केलं.

तो देशी खलाशी म्हणाला 'याचा बाप मरायला टेकलेला खरा. पण ज्याना दोन्ही हातानीं मुडदे पाडायची संवय त्यांना कुणाचा दुखणाईत बाप मरायला घातलेला ऐकून कितपत करुणा येणार ?'

कुणक्या म्हणाला, ' तर मग, तुम्ही आम्हाला पुढच्या बंदरावर उतरविणार नाहीं ? '

' ती आशा तुम्ही मुळीच करूं नका. '

' तर मग तुम्ही आम्हाला किती दूर घेऊन जाणार ? '

' तुम्हाला पकडून नेणारे चांचे लोक किंवा गुलामांचे व्यापारी भेटतील तोंवर. आमचं हे जहाज मूळच्या हबसाण देशापर्यंत तरी जायचं आहे. आणि तिथें तुम्हाला नेऊन विकलं म्हणजे तुम्हाला जन्मांत फिरुन आपलं घर पाहाण्याची आशा नको '

हें ऐकून धाकल्यानं मोठ्यानं रडण्याला सुरवात केली. आणि ' अरे माझ्या देवा, अरे माझ्या बाबा, तूं मला कसा भेटणार ? मला कुठून काल रात्रीं निघण्याची बुद्धी झाली? असा कसा वाईट मुहूर्त लागला ? आतां तूं मला केव्हां दिसशील ? ' असा आक्रोश करण्यास सुरवात केली. आणि कुणक्यानंही पडल्या पडल्या आपल्या डोळ्यांनीं त्या देशी खलाशाला खुणा करुन अशा विनवणीचा बहाणा केला कीं, कांहीं करा, तुम्हाला या माझ्यॉ सोबत्याची दया येऊं द्या. कांहींही करून त्याला सोडा. त्याच्या बापाची भेट करण्याला मदत होईल. तो भेटला म्हणजे त्याचा बाप सुखानं मरेल. एवढं पुण्य पदरीं घ्या असा त्या केविलवाण्या खुणांचा अर्थ होता.

या सर्वांचा परिणाम इतकाच झाला कीं, तळ घरांतली ती गडबड ऐकून बडा फिरंगी खालीं येऊन, थैमान करुन, या पोरांना लाथा बुक्या द्यावयाचा त्या तरी त्याच्या वांचाव्या एवढी बुद्धी त्या देशी

खलाशाला झाली. म्हणून तो हलक्या आवाजानं म्हणाला 'पोरानो, तुम्हाला कांहीं सुटण्याची आशा असेल तर गपचीप जागच्या जागीं पडून रहा. उपाशी राहिलांत तरी हरकत नाहीं. मी मधून मधून खालीं येऊन तुम्हांला पाणी तेवढं पाजून जाईन. असेल तुमच्यां नशिबांत सुटका होण्याचं तर तसं घडेल. एरवी मला तर फारशी आशा दिसत नाहीं.'

इतकं बोलून तो देशी खलाशी वर निघून गेला. पण तो वर गेल्यापासून, देवाचीच कृपा म्हणावयाची, वरच्या मजल्यावरील परिस्थि-तीतं सुमारं दोन घटकांनीं कांहीं फरक पडूं लागला. तो असा कीं त्या तिघां खलाशांपैकीं तो बडा फिरंगी आणि तो निमगोरा फिरंगी यांच्या-मध्यें कांहीं तरी कुरापत निघून धुसफुस सुरू झाली. वरच्या फळायवरून कातड्याचे चढाऊ जाड जोडे आपटून कोणी जोरानं चालू लागला. लोखंडी सामानाची मधून मधून आदळ आपट होऊं लागली. मोठमोठ्या चढत्या आवाजानं उत्तरं प्रत्युत्तरं झाल्यासारखं झगड्याचं बोलणं ऐकूं येऊं लागलं. एखादा जडपदार्थ वरून समुद्रांत फेकून दिल्यासारखा आवाज ऐकूं येऊं लागला. एकाद्यानं रागानं शीळ घालावी तर दुसऱ्यानं पितळेची शिटी वाजवावी, व त्या बरोबर कोणी इकडून तिकडे किंवा तिकडून इकडे धावल्याचा आवाज ऐकूं यावा असे प्रकार होऊं लागले.

कुणक्या व धाकल्या यांना याचा कांहींच उमज पडेना. पण वरच्या मजल्यावर बेबनाव झाला तर आपल्या सुटकेचा संभव थोडाबहुत वाढेल अशी कुणक्याला आशा वाटूं लागली, व तो धाकल्याला म्हणाला कीं 'धाकल्या, तूं खोटं रडून देवाची करुणा भाकलीस तरी देव तुला मला पावणार असं दिसतं.' नंतर दोघांनीं आपआपल्या अंगावरच्या दोऱ्या कोठें कितपत सैल होण्यासारख्या आहेत याचा अंदाज एकमेकांना सांगि-तला, व आणखी कुठं काय होतं त्याची वाट पहात ते पडून राहिले.

सकाळचा दंगा झाला तो तेव्हां तेवढ्याबरच थांबला. जहाजहि वारा अनुकूल असल्यामुळं वेगानं सरळ चाललं होतं. या गतीमुळं आतां आपण विजयदुर्गाहून दक्षिणेकडे बरेंच खालीं आलों याची अटकळ कुणक्या व धाकल्या यांना आली. पण त्यांच्यापुढं प्रश्न होता तो आपण घराहून किती दूर आलों व किती जाणार हा नसून, आपण कितीही दूर गेलों तरी तेथें तरी बंधमुक्त होणार कीं नाहीं ?

तिसरे प्रहरीं देशीं खलाशी कामट्यांची तबकडी उचलून शिडीन खालीं आला. त्यानं येतांना पाण्याचा लोटा आणला होता त्यांतून थोडं थोडं पाणी दोघांना पाजलं. मात्र स्वतः त्याचें स्वरूप कालच्याहून थोडें वेगळं दिसलं. तें असं कीं, त्याचें कपडे ठिकठिकाणीं फाटले होते. कपाळावर ठेसे लागून ल्हान सहान जखमा होऊन त्यांतून रक्त किंचित झिरपत होतं. एक डोळा सुजून काळा पडला होता. एका हाताच्या बोटांना जखमांना बांधावी तशी पट्टी बांधली होती. तो किंचित लंगडल्यासारखा वाटे. आणि मधुन मधुन पाठीचा कणा दुखल्या सारखा तो त्या भागाला आपला हात लावी. कालच्यापेक्षां आज त्याच्या बोलण्याचा सूरही थोडा नरमच होता.

त्या दोघां बंदिवानांशी कांहीं अधिक बोलावं अशी इच्छा त्याला झाल्याचं दिसलं. म्हणून तो पूर्वीप्रमाणें मालाच्या गोणीवर टेंकून बसला, आणि म्हणाला ‘तुमची हकीगत ऐकून तुमच्याबद्दल दोन शब्द फिरंगी नाखुद्याजवळ बोलावं असं मनांत आलं. पण तो तेव्हांपासून अंगांत भूत संचारल्यासारखाच करूं लागला आहे. आम्हां दोघांशीं तो उगीचच हुजत घालतो. त्याचा दुय्यम त्याच्या सारखाच फिरंगी पण निमगोरा आहे. आणि त्याच्यासारखीच याच्याजवळ पिस्तुलं हत्यारं आहेत. म्हणून त्याचा कांहींतरी निभाव लागतो. पण मी पडलों काळा देशी खलाशी. माझ्या हातांत हत्यार

नाहीं. तेव्हां मला तो किती हाणमार करील तेवढी थोडीच म्हणावयाची.'

तें ऐकून कुणक्या मोठ्या अदबीचा, विनयाचा व प्रेमळ सूर काढून म्हणाला, 'खलाशी दादा, तुम्ही वयानं आमच्या बापासारखे. आम्ही तुम्हाला काय बोलावं? पण आतां म्हणावयाचं धाडस करितोंच. काल म्हणालां कीं तुम्ही या कोकण पट्टीचेच रहिवाशीं आहां. बोलून चालून हिंदू. मग आमच्या सरखेलासारख्याच्या पदरीं राहून नोकरी करावयाची ती सोडून तुम्ही जाणते गडी फिरंग्याच्या नोकरींत कसे शिरलांत? आणि निदान अजून तरी त्या नोकरींत कसे राहातां? याचं माझ्यासारख्या पोर बुद्धीच्या मुलालाही आश्चर्यच नव्हे तर वाईटही वाटतं. कालच तुम्ही म्हणाला कीं या जहाजावरचे लोक गुलाम धरून नेतात आणि चांचे लोकांना किंवा दूर जुन्या हबसाण देशांत नेऊन विकतात. मग आमच्या सारखीं मुलं गुलाम म्हणून विकण्याच्या पापाचे धनी फिरंग्यांना होतां आलं तरी तुम्ही त्यांना खुशाल मदत करावी हें बरं दिसतं काय? तुमची स्वतःचीं मुलं उद्यां कोणी धरून नेऊन गुलामांच्या बाजारांत विकलीं तर तें तुम्हाला बरं वाटेल काय? नुसत्या चांचेगिरीचं मी कांहीं म्हणत नाहीं. समुद्रावर कोणी कोणाचा माल जबरदस्तीनं धरला लुटला तर त्यांत एवढंसं पाप मी मानीत नाहीं. कारण तिथं दोघांचाहि हात सारखाच चालूं शकतो. पण परदेशांत गुलाम म्हणून विकलेल्या माणसानं कशाची आशा धरावी!'

तो देशी खलाशी म्हणाला 'या नोकरीच्या जरूरीनं मनुष्य एकदां चक्रांत सांपडला म्हणजे त्यांतून त्याची सुटका होणं कठीण जातं. आमच्या सरखेलांची कीर्ति मी ऐकून आहे. त्यांच्या आमच्या जहाजाची गांठ पडते तेव्हां त्याचे खलाशी कसे तरबेज आहेत, लढाऊ आहेत, ते मला पहावयाला सांपडतं. मनांत केव्हां केव्हां येतं कीं ही फिरंग्याची नोकरी सोडून सरखेलांची धरावी. पण नशीबांत असेल तर आणि तेव्हां घडेल. तुम्हाला पुढच्या बंदरांत सोडून द्यावं असं मी आमच्या नाखुद्याला

सुचविलं मात्र, कीं तेव्हांपासून अधिक विचारपूस न करतां तो माझ्यावर खवळून उखळून राहिला आहे. मला किती मारलं झोडलं हें माझ्या शरीरावरच्या खुणांवरून तुम्हाला दिसतच असेल.'

यावर कुणक्या म्हणाला 'न जाणों. देवदयेनं या मारामारींतून आमच्या आणि तुमच्या दोघांच्याही संकटांचा परिहार व्हावा अशीच ईश्वराची योजना नसेल कशावरून ? मी एक गोष्ट सुचवितों तिचा विचार करा. काल तुम्ही तिघे होतां म्हणून आम्हां दोघांना भारी जाहलां. पण समजा तुम्ही आमच्या या दोऱ्या ढिल्या केल्यात तर आम्ही आमची सुटका करून घेऊं, आणि मग तुम्ही व आम्ही मिळून तिघे त्या दोघांना भारी होणार नाहीं काय ? मात्र इतकंच करा कीं आज रात्रीं नाखुद्याच्या उशाखालून त्याचं पिस्तुल काढून घेऊन तें समुद्रांत फेकून द्या. एरवींच्या साध्या हत्यारांनीं झगडावयाचं झालं तर आम्ही तिघे त्या दोघांना भारी होऊं. मी इतकंच सांगतों कीं तुम्ही सरखेलांच्या नोकरीला राहण्याचं मनांत आणलं तर तें सिद्धीला जाण्याची हमी मी घेतों.'

काळा खलाशी म्हणाला 'आमचं हें जहाज व्यापारी मालाचं. या फिरंगी अधिकाऱ्याशिवाय जहाजावर इतर कोणा मनुष्याची केव्हां गांठच पडत नाहीं. म्हणून सुटका करून घेण्याचा विचार मनांतच येत नाहीं. आज तुम्ही दोघे सुदैवानं या जहाजावर आलांत आणि त्यामुळं मला थोडा धीर आला आहे. मी आतां असं करितों कीं तुमच्या अंगावरच्या दोऱ्या पुऱ्या सोडीत नाहीं, तर फक्त त्या ढिल्या करून जागच्या जागींच त्यांचीं टोकं सोडवून ठेवितों. न जाणों तो फिरंगी दुष्ट मनुष्य खालीं येऊन पाहील, आणि तुम्ही मोकळे झाला असं त्याला दिसलं तर त्याचा राग मजवर काढील. थोड्या वेळांत काय होईल तें कळेल. आणि मग मी तुम्हाला सूचना देईन तसं करा !'

असें म्हणून तो वर निघून गेला. तिसरे प्रहरीं, पुन्हां काय कारण झालं समजत नाहीं, पण वरच्या लोकांमध्यें फिरून धुसफुस, शिव्यागाळी,

आदळ आपट झालेली ऐकूं आली. नाखुद्याच्या खोलचिं दार कोणी तरी जोरानं लावून बंद केल्याचा आवाज ऐकूं आला. हें होतांच या दोघांनीं अंगावरच्या दोऱ्या सगळया सोडल्या. कुणक्यानं धाकल्याकडून त्याचा कोयता मागून घेतला. आणि काळा खलाशी पुन्हां येऊन कांहीं हकीगत सांगेल व बोलावील तर निघावं अशा अपेक्षेनं व तयारीनं ते राहिले.

इतक्यांत त्या काळ्या खलाशाची किंचाळी ऐकूं आली त्याबरोबर ते दोघेहि उठले. कुणक्याने हातांत कोयता सरसावला. जवळच एक लोखंडाचा लांब तुकडा पडला होता तो उचलून धाकल्याचे हातीं दिला. आणि तळघराच्या डोक्यावर चौकोनी कामट्याची तबकडी बसविली होती ती खालून डोक्याचा धक्का देऊन उडवून दिली. वर येऊन पहातात तो दुय्यम फिरंगी अधिकारी आणि काळा खलाशी हे एकमेकाला धरून झोंबत होते, लाथा बुक्या देत होते व चावत होते. हें पाहून ते दोघे धावून गेले आणि त्यांनीं त्या फिरंग्याचे हात धरले व त्याला विळखा घातला.

काळ्या खलाशाची या मदतीनं सुटका होतांच त्यानं त्याच्याशीं लढणाऱ्या फिरंग्याच्या छातींत असा जोरानें गुद्दा मारला कीं त्या बरोबर तो कोसळून निचेष्ट पडला. बहुधा तो गुद्दा काळजावर वर्मी लागला असावा. अशा रीतीनें तो निकामी झालेला पाहून कुणक्यानं त्या काळ्या खलाशाला विचारलें कीं तो तुझा वरिष्ठ फिरंगी नाखुदा कोठें आहे ? तो म्हणाला त्याला त्याच्या खोलींत मी कोंडून घालून बाहेरून कडी लावून घेतली आहे. पण हें त्यानं सांगण्याचंही कारण नव्हतं. कां कीं तो फिरंगी नाखुदा आंतून दारावर लाथा बुक्या मारून दार फोडण्याचा प्रयत्न करीत होता.

कुणक्या दाराशीं गेला. त्याच्या कडींत त्यान एक लाकडी कुणी बसविली, व त्याला पाठ लावून उभा राहिला. आणि त्या दुसऱ्या

दोघांना म्हणाला ‘ आतां मी नाखुद्याला पाहून घेतों. तुम्ही त्या दुसऱ्या फिरंग्याकडे पहा.’

पण त्याकडे पहावयाचं असं फारसं उरलं नव्हतं. तो नुसता निचेष्ट पडला नव्हता तर गतप्राणच झाला होता. असं पाहून त्यांनाही आश्चर्य वाटलं. काळा खलाशी म्हणला ‘ हा तर संपला. याची व्यवस्था करणं इतकंच काम आतां उरलं.’

तेव्हां कुणक्या त्यांना दुरून म्हणाला ‘ असेल तें असेल. त्याचा प्राण गेला असेल तर तुम्ही दोघे मिळून त्याला उचलून सुकाणूच्या बाजूला घेऊन जा, आणि त्याला समुद्रांत लोटून देण्याची व्यवस्था करा. मी या नाखुद्यावर इथं पहारा करितों. ’

या प्रमाणें ते दोघे त्या मेलेल्या फिरंग्याला उचलून घेऊन गलबताच्या कडेला गेले. आणि एकानें त्याचे पाय व दुसऱ्यानें त्याचं डोकं धरून एक दोन झोले देऊंन तें समुद्रांत फेकून दिलं. मग ते दोघे परत कुणक्याकडे आले तों, खोलींत कोंडून घातलेला फिरंगी एकदां या दारावर तर एकदां दुसऱ्या अंगच्या फळीवर जाड बुटाच्या लाथा मारीत होता. कुणक्यानं आपली पाठ लावून त्यांतल्या त्यांत दार संभाळून धरलं होतं. पण दार शाबूद राहून दुसरी कडच्या फळ्या फुटल्या असत्या तरी तेंच ! पण आतां ते दोघे आणि कुणक्या असे एका विरुद्ध तीन झाले यामुळें सर्व पारडं उलटलं. हातांत काठ्या व हत्यारे घेऊन तिघेहि सज्ज झाले, व त्यानीं त्या लाकडी खोलीच्या सर्व बाजू संभाळल्या.

मग तो काळा खलाशी खोलीच्या दाराशीं तोंड लावून ओळखीच्या आवाजानं नाखुद्या फिरंग्याशी बोलूं लागला. ‘ अरे भाई, तुझा सगा तो पिवळा फिरंगी तर ठार मेला. त्याला आम्ही समुद्रांत फेकून दिला. आणि आतां त्याला मगर तोडून किंवा मासे कुरतडून खात असतील.

हीं दोन मुलं कोवळीं पण खंबीर आहेत. माझा छळ तूं आजवर केलास त्याला कंटाळून मीं त्याना मिळालों आहे. आमच्याशीं दंगा करशील तर फुकट प्राणाला मुकशील. मुकाट्यानं बाहेर येऊन आमच्या स्वाधीन हो. नाहीं तर त्या तुझ्या सोबत्या सारखा तुला समुद्राचा तळ पाहावा लागेल.'

हें ऐकून फिरंग्यानं लाकडी फळ्यावर धक्के देण्याचें थांबविलं. आणि दुःखी स्वरानं म्हणाला 'जशी येशूची मर्जी. मी मुकाट्यानं तुमच्या स्वाधीन व्हायला तयार आहे.'

खोलीची कडी काढल्यावर फिरंगी बाहेर पडतांच तिघेहि त्याच्या अंगावर तुटून पडले. त्यानीं त्याचे हात पाय बांधले. खालच्या कोठ्याच्या दारावरची कामट्यांची ताटी उचलून त्यांनी त्याला आंत उतरविला, आणि पुन्हां ताटी जागच्या जागीं ठेवून त्यावर एक लोखंडी नांगर आणि तिखट मसाला वाटण्याचा जड दगडी पाटा ठेवून दिला.

काळा खलाशी म्हणाला. ' गड्याहो ! देव तुमचं भलं करो. त्याच्या कृपेनं तुमच्या नावेची आणि आमच्या गलबताची गांठ पडली. मी गुलामगिरींत दिवस काढून कंटाळून गेलों होतों. एखादे वेळीं वाटे समुद्रांत जीव द्यावा. एखादेवेळ वाटे या दोघां फिरंग्यांना जिवें मारून गलबत ताब्यांत घ्यावं आणि एखादं कोकणी बंदर गाठावं. पण हे फिरंगी हत्यारबंद. त्याना पिस्तुलं उडवितां येतात. शिवाय ते दारु पिऊन धुंद झाले असले तरी हत्यार सावरण्या चालविण्या पुरते लेकाचे सावध असतात !'

मग कुणक्याकडे वळून तो म्हणाला 'हे तुझे दुसरे राव अगदीं भिऊन गेले होते. गड्या तूं मात्र धीट खरा. अन् तुला युक्तीहि चांगली सुचते. तुझ्यामुळं आज तुमची व माझीहि सुटका झाली. सरखेलांच्या नोकरीत असतों तर या गुलामगिरीतून वाचलों असतों. तें काहीं नाहीं. आतां या

पुढं हीं जन्म त्यांच्याच नोकरींत घालवायचा.' असं म्हणून त्यानं कुणक्या व धाकल्या या दोघांच्या पायाला हात लावला आणि मग आपले डोळे पुसले.

चांदण्यांत चैनीन हिंडण्याकरितां काढलेल्या या समुद्र सफरीचा शेवट कसा होऊं घातला होता,आणि शेवटी तो कसा निभावला, हें पाहून कुणक्या व धाकल्या दोघानाहि मोठा आनंद झाला. आपणा दोघांत कुणक्यानेच अधिक धैर्य व प्रसंगावधान दाखविलं हें धाकल्याला खऱ्या मनान कबूलच करावं लागलं. पण या विचारानं त्याच्या मत्सरांत भर पडली. परत विजयदुर्गला गेल्यावर सर्व हकीकत सांगावीच लागणार ! ती खरी सांगावी तर कुणक्याची बहादुरी आपल्या तोंडांन कबूल करावी लागते. खोटी सांगून आपला पराक्रम रंगवावा तर हा काळा खलाशी झाल्या हकीकतीचा साक्षीदार उभा आहे. तो खोटेपणा पदरीं बांधून फजीत करणार नाहीं काय ? कुणक्याचा पराक्रम ऐकून रतनचं कुणक्या वरच प्रेम दृढच होईल नव्हे कां ? तात्पर्य फिरंग्याच्या हातून सुटका झाल्याचा आनंद होत होता खरा, पण धाकल्याच्या आनंदात मत्सरानं थोडं·दुःख कालवलं यांत शंका नाहीं. !

———:×:———

# ४ सरखेलांचा हस्तक

## ( १ )

आदल्या रात्रीं झोपी गेलेला सूर्य व वारा दोघेहि जागे होऊन समुद्राच्या क्रीडांगणावर खेळूं लागले होते. सूर्य आपले सुखमय ऊबदार किरण पश्चिमेकडे फेकी. आणि मतलयीचा शीतळ वारा पूर्वेकडे वाहायला लागून ते किरण झेली.

पहाटे मच्छीमारीच्या मोहिमेवर गेलेल्या लहान मोठ्या नावा किनाऱ्याकडे परतूं लागल्या होत्या. मासळीनें जड झालेली समुद्रवाहनें वल्हवून चालविण्याचे श्रम, रात्रीं जाग्रण झालेल्या खलाशी कोळ्यांचे वाचावे, म्हणून परोपकारी वारा शिडांत भरून तीं वेगानें किनाऱ्याकडे नेत होता.

समुद्र किनाऱ्यावरहि खेळच सुरू होता. कोळ्या खलाशांची नुसती लंगोटी लावलेली मुलं कांहीं पाठशिवणी करीत. कांहीं झाडावरच्या गाणाऱ्या पक्षाना वेडावीत. जाळी वाळत घातलेल्या लांकडी उभ्या आडव्या वाशांवर चढून उतरून कांहीं मुलें पिंजऱ्यातील वानरा माकडांचें अनुकरण करीत.

इतर कांहीं मुलें वाळवंटावर वर्तूळ करून बसलीं असून त्यांच्या गप्पा सुरू होत्या.

‘ कायरे, किल्यातल्या त्या कैदी फिरंग्यानं काल रात्रभर काय धिंगाणाच धिंगाणा घातला ! तुम्हा कुणाला ऐकू येत होतं कां त्याचं तें

ओरडणं किंचाळणं ? मी तर भिऊन जाऊन आईच्या कुशींत शिरलों तों सकाळीं पांघरुणांतून बाहेर पडलों. '

' हात तेच्यारे. त्या फिरंग्याच्या ओरडीला भिण्याचं काय कारण ? तो कोंडून ठेवलेला होता. '

' पण तो ओरडत कां होता ? किंचाळत कां होता ? '

' त्याला कुणी मारीत असेल ! '

' छत्. कैदी फिरंग्याच्या वाटेला कुणीहि जाऊं नये असी सरखेलांची सक्त ताकीद आहे ती तुला माहीत नाही वाटतं ? '

' अरे मला ठाऊक आहे तें कारण. त्या फिरंग्यान अगदीं गयावया कर करून दारू मागितली प्यायाला. ती त्याला देऊ नव्हती पण दिली. मग काय विचारतोस ? ती दारू अंगावर आली. त्याला जोडीदार सोबती कैदी असता तर ते दोघे एकमेकांना शिव्या देऊन मारामारी करून आपली करमणूक करते. पण हा पडला एकटा. म्हणून तो आपला आपल्यालाच शिव्या देत होता आणि आपलं आपल्यालाच मारून घेत होता. आणि दोघांचें मिळून एकटाच ओरडत होता झालं. दुसरं काय ? माझे बाबाच होते पाहऱ्यावर काल रात्रीं. त्यांनीं सकाळीं घरीं आल्यावर ही हकिकत आईला सांगितली ती मी ऐकली. '

' मग एकाच्या जोडीला दुसरा ठेवावा ना आणून फिरंगी कैदी ! किल्याच्या त्या दुसऱ्या भागांत आहेत आणून ठेवलेले परवां ? त्यांतलाच एखादा ! '

' वः वः तसं कसं होईल ? हा कालचा फिरंगी कैदी अधिकारी आहे म्हणे तांबड तोंड्यांतला ! त्याच्या जोडीला साधा खलाशी कैदी आणून ठेवला तर अपमान होईल ना याचा ! '

' हे सगळेच लेकाचे तांबडतोंडे दिसतात. मग कोण कसा ओळखतात देव जाणे–हा अधिकारी, सर तांडेल म्हणून–आणि हा साधा खलाशी म्हणून !

' आणि तांबडतोंडे झाले तरी तेहि सगळे एकच जातवाले, एकच देशचे नाहींत म्हणे. '

' बरोबर बोललास, सगळेच टोपीकर खरे. पण त्यांतच आहे अठरापगड जात. सांगूं त्यांचीं नावं ? '

' सांग सांग. ऐकूं या तरी ही नवलाची नांवं ! '

' नवलाची खरीं. ऐक सांगतों. एक फिरंगी म्हणतात तो गोव्या-कडचा. दुसरा वलंदेज. आणि त्याच्या जोडीला तो इंग्रेज. एक म्हणे सुवीस तर त्याच्या जोडीला म्हणे उरीस. एक म्हणे तलियान तर त्याच्या जोडीला लर्तियान आणि रुमियान. एक म्हणे फरासीस तर त्याच्या जोडीला व्हीनीस. असेच लेकाचे इतर सारे. '

' अरे तूं ही नावं वरीच लक्षांत ठेवली आहेस कीं. '

' आपला तो दुभाषी आहे ना सरखेलांच्या नोकरींत, त्यानं तीं एकदा बाबाना समजून सांगितली तेव्हां ती मी ऐकली. राहिली लक्षांत सहज गमतीची म्हणून ! '

' अरे, हे अठरापगड जातीचे तांबडतोंडे दिसताना दिसतात एकासारखे एक. पण नावाप्रमाणं त्यांच्या रूपांतहि फरक आहे बरं कां ? आणि गुणांतहि. '

' तो कसा सांग ना ? '

' तो असा बघ. हा फिरंगी तांबडतोंड्या दिसतो. पण बारीक पाहिलं तर त्याचा रंग कुंकवाच्या वळणावर नाहीं. तर हळदीच्या

वळणावर आहे. तो थोडा माणसाळलेला आहे. पण त्याचा पाद्री आमच्या लोकांवर फार फार जुलूम करतो. तो फरासीस निमगोरा. तो मात्र मोठा खेळकर रंगेल हौशी गडी वाटतो. कुणाच्या वाटेला जायचा नाहीं. दिवसभर हसेल. दारू पिणारा पण पक्का नाहीं. तो वलंदेज मात्र मोठा तिरसट आणि रागीट आहे. वेळेला आपला प्राण देईल नाहीं तर दुसऱ्याचा घेईल. त्याच्या तोंडाकडे पाहिलं कीं भयच वाटतं मला.'

'आणि हा तुझा अंगरेज का फिंगरेज तो कसा काय आहे ?'

'हां बरं विचारलंस ? ही स्वारी मात्र सगळ्या टोपीकरांत मोठी लबाड. आतल्या गाठीचा आहे पक्का हा ममईकर. दारू पील पण सावध राहील. दुसऱ्याच्या हुंगणाखालचं ओढून घेईल, पण कसं तें कळूं देणार नाहीं. आणि उलट असं कसं झालं बुवा म्हणून नवलानं तुम्हालाच विचारील! तोंडातून शब्द काढील तो कसा अगदीं मऊ. माशाच्या पोटासारखा. पण त्या शब्दातन त्याचे दांत ऐकणाराच्या घशात जाऊन रुतून बसायचे. प्राण घेतील तेव्हां बाहेर निघतील. यानं अलीकडे हळु हळु बाकीच्या साऱ्या टोपीकरांना टोपी घालायचा बेत केल्यासारखा दिसतो मला तरी.'

'अरे पण हे तांबडतोंडे कोणत्या देशाचे फार आहेत आणि कोणत्या देशाचे थोडे आहेत समजतच नाही कीं!'

'मी सांगतो तें. आहे मला माहीत.'

पण कोळ्या खलाशांची ही पोरं. त्यांना गणिताचं संख्येचं ज्ञान कुठलं ? त्यानं कम-जास्त सांगण्याकरितां हातानं वाळूचे लहान मोठे ढीग केले. आणि हा अंगरेज, हा वलंदेज, हा फराशीस, हा गोवेकर फिरंगी असें सांगूं लागला. शेवटीं सर्वांत मोठा ढीग फिरंग्याचा व त्या खालोखाल अंगरेजांचा असे दोनच उरू देऊन बाकीचे सर्व ढीग त्यान हातानं उडवून लावले आणि म्हणाला, 'गड्या हो, यांतल्याया दुसऱ्या ढिगाशीं—

अंगरेजांशी—यापुढें सरखेलाना लढायला झुंझायला पाहिजे. ध्यानांत ठेवा. ह्याच आमचा शत्रू. खांदेरी उंदेरी आमची करायला ह्याच आड येतो. जशी कांहीं ती याच्याच विलायती बापाची मिरास. सरखेलाशी भांडा-यच्या वेळीं हा बाकी सगळ्या तांबडतोंड्याची मदत घेईल. एरवींच्या वेळीं हा कुणाशी तोंड उघडून बोलायचा नाहीं. हा अंगरेज किती गोरा अन् तो शिद्दी किती काळा. एक जळता पलिता तर एक पिचलेला कोळसा. पण वेळ पडली म्हणजे त्या काळतोंड्याच्या दाढीला हात लावून त्याची हांजी हांजी करून हा त्याची गलबतं अन् त्याचे खलाशी येईल, आणि त्यांच्या जिवावर लढाई जिंकील. पण त्यान याना मदतीला बोलावल म्हणजे सतरा सबबी सांगील, आणि फक्त आपली दारुगोळी या काळ्याला देऊन त्याची अवाच्या सवा किंमत घेईल, असा हा धूर्त दगाबाज आहे. पण आमचे सरखेल त्याला चांगलेच पुरून उरले आहेत. त्यांच्या समोर अंगरेज लढाईला उभाच रहात नाहीं. अंगरेजानं आमचे जितके खलाशी पाडाव करून गुलाम म्हणून विकले असतील त्यांच्या दुप्पट तांबडे खलाशी सरखेलांनीं या किल्यांत वेळोवेळीं बंदीवान करून ठेवले. अरे हो, पण हें किनाऱ्याकडे काय येताहे ? '

## ( २ )

सर्वांनीं आपली दृष्टी समुद्राकडे लावली, तों दूर अंतरावर मछीमार होड्यांच्या एका बाजूनें एक छोटें व्यापारी गलबत किनाऱ्याकड येतांना दिसलं. तें पाहून वरील बोलका कोळ्याचा मुलगा म्हणाला ' अरे बघारे लेकानों, ते गलबत कुणा फिरंग्याचं दिसतं. पण त्याच्यावर फिरंगी दिसत नाहीं. आपलेच दोन गडी दिसतात. हें कसं काय? '

वाऱ्याच्या जोरावर त्या मछीमार होड्या आणि तें फिरंगी गलबत हीं झपाट्यानें किनाऱ्याकडे थोड्याच वेळांत येऊन पोचलीं. मछीमार होड्या दिसतांच कोंडांळ्यांतली बरीचशी मुलं तिकडे धावलीं. कारण

मासळी आणि जाळी उतरून किनाऱ्यावर नेण्यांत खलाशांना हात लावायलाच तीं वाळवंटावर येऊन बसली होतीं. आणि रिकामीं होतीं म्हणून खेळत होतीं इतकेंच. पण तो बोलका मुलगा आपले दोन तीन सवंगडी घेऊन त्या फिरंगी गलबताकडे धावला.

किनारा गांठतांच गलबतावरून कुणक्यान पाण्यांत उडी घेतली. आणि म्हणाला ' गड्यांनों ही बघा माझ्या जाळयांत सांपडलेली नव्या नवलाची लाल मासळी ! '

त्या सर्वांनीं मिळून गलबत ओढून घेऊन वाळूंत रुतवून पक्कं केलं. कुणक्यानं सांगितल्याप्रमाणं खरोखरच, मासे पकडण्याच्या जाळयांत बांधून टाकलेला, एक लालतोंड्या अंगरेज खलाशी होता. त्याला त्यानी गलबतातनं उचलून बाहेर वाळूवर ठेवला. आणि त्याला खुणा करून म्हणाले, ' खबरदार, आतां गमजा करशील तर. मुकाट्यानं आमच्या बरोबर चल. तुझ्या केसालाहि धक्का लागणार नाहीं. आमचे धनी सरखेल फार चांगले आहेत. दंगा करशील तर मात्र अंगभर मार खाशील. इथं तुझा पाठिराखा अंगरेज फिरंगी कुणी नाहीं. '

फिरंग्यानंहि पाहिलं कीं, आपण पक्के बंदिवान होऊन या तरुण मुलांच्या हातीं सांपडलों आहों. सुटकेची आशा नाही. मग समंजसपणाने घेतले तरच सुरळीतपणें निभावून जाण्याचा संभव. त्याने हेहि ऐकले असावें कीं, या पूर्वीहि कांही फिरंगी बंदिवान या किनाऱ्याच्या दर्यावर्दी लोकांच्या हातीं लागले होते, व कान्होजी आंग्र्याच्या बंदिवासांत त्यांना कांही इजा झाली नव्हती.

दारूची निशा उतरलेल्या या फिरंग्याला ही सुबुद्धी सुचणे आता शक्य झालें होते. पण न जाणों, आपला बंदिवान मोकळा सुटल्यावर कदाचित् दंगा करावयाचा म्हणून कोळ्यांच्या या मुलांनी हातांत काठ्या व वल्ही घेऊन संरक्षणाची सिद्धता केली. असे पाहून कुणक्यानें फिरं-

ग्याच्या अंगाभोवताल्चें जाळें सोडलें. फक्त एक मोठी सुंबाची दोरी घेऊन तिच्या दोन्ही टोकांनी त्याने फिरंग्याचे दोन्ही दंड घट्ट बांधले, आणि तिचा मधला भाग आपल्या हातांत घेतला. आणि म्हणाला 'चलारे पोरानों !–दोघे चौघेच माझ्या बरोबर या. तेवढे पुरेत. हा फिरंगी मी मासे धरण्याच्या जाळ्यांत पकडून आणला तरी ती कांही खाण्याची मासळी नव्हे ! त्या खऱ्या मासळीनें भरलेल्या होड्या त्या पाहा किनाऱ्याकडे धांवत येत आहेत. त्यांतला माल उतरून घ्यायला तुमची मदत लागणारच. आम्ही या फिरंग्याला किल्ल्यांत नेऊन गुदरतो. आणि त्याला तुरुंगाच्या जाळींत डांबून ठेवला म्हणजे मग हवा तेव्हा जाऊन पाहा सांपळ्यांत पकडलेला वाघच जसा कांही ! पण उगीच कोणी त्याला काठ्यानी डिवचून छळू नका हं ! सरखेलांच्या कानावर ही गोष्ट गेली तर ते तुम्हाला पलाकती मार देतील.'

फिरंग्याला किल्ल्यांत नेल्यावर कुणक्याने त्याला मुख्य नायकाच्या स्वाधीन केलें. नायकाने त्याला एका अर्धवट अंधाऱ्या खोलींत बंदोबस्तानं ठेऊन बाहेर दाराला कुलूप लावलं, आणि कुणक्यान फिरंगी पकडून आणल्याची वर्दी देण्याकरतां तो सरखेलाकडे गेला. पण नायकानं आणलेला हा निरोप ऐकण्याला ते मोकळे नव्हते. दुसऱ्या एका फिरंग्याशीं यावेळीं त्यांचं काम सुरू होतं.

या वेळीं विजयदुर्गचा किल्ला सगळा बांधून झाला नव्हता. तट व बुरूज यांचीं कामं पुरी झाली होती व त्यावर तोफा चढवून ठेवल्या होत्या. किल्ल्याच्या तटाच्या आंतल्या बाजूला दूर अंतरावर खबदाडींत निवारा पाहून भुयारांतून दारूगोळा भरून ठेवून त्यांची तोंडं निरुंद करून सुट्या दगडानी माचवून ठेवली होती. तसेंच कचेरी कामाला लागणारी एक इमारत मोठ्या सोप्यावजा बांधलेली असून त्या लगत एक बंदिस्त दालनहि बांधून तयार झाले होते. परंतु किल्ल्याच्या कारभाराकरता लागणारे सगळे अधिकारी कामकरी राहण्या नांदण्यासारख्या इमारती तेथें नव्हत्या. हे

सर्व लोक बाहेर राहून, बाहेरून येऊन एकमेकांना सोडवित. फक्त कान्होजी आंग्रे याना व यांच्या कुटुंबाला पुरेल एवढी एक लाहानशी इमारत पुरी बांधण्यांत आली होती; व विजयदुर्गच्या मुक्कामांत केव्हां ते देवीच्या देवळाजवळच्या घरांत किंवा किल्ल्यांतील या घरांत मुक्काम करीत.

वर सांगितलेल्या इमारतीशिवाय पुरी झालेली अशी आणखी एक पण लहानशी इमारत मात्र किल्ल्यांत होती ती तुरुंगाची. या तुरुंगांत खुद्द सरखेलांचे गुन्हेगार तेवढेच बंदोबस्ताने ठेवलेले असत. कारण ज्या प्रान्तात कान्होजीचा अंमल राजा प्रमाणें चाले त्यातील न्याय इन्साफाने ठरलेले खाजगी गुन्हेगार तुरुंगांत ठेवण्यासारखे असे थोडेच असत. न्याय मुनसुफीचा अधिकार ठिकठिकाणी व गांवच्या पंचाकडेच असून खाजगी अपराध्याना त्यांनीं दिलेली शिक्षा बहुधा दंडाचीच असे. एखाद दुसरा पुण्ड प्रत्यक्ष कैदेंत ठेवावयाचा तर तो गांवच्या चावडींत पाटलाच्या कैदेंत राही.

## ( ३ )

असो. कुणक्यानें पकडून आणलेल्या फिरंग्याची बातमी सांगण्या-करितां नाईक कचेरींत गेला तेव्हां त्याच्या दृष्टीस खालील प्रकार पडला म्हणून तो बाजूलाच उभा राहिला. पुढें गेला नाहीं.

कचेरीच्या मोठ्या सोप्यांत एका टोकाला मराठेशाही बैठक घातलेली असून एका लोडाला टेकून कान्होजी आरामशीर बसला होता. त्याचे डावे उजवे हात लहान लहान लोडावर ठेवलेले असून तो सुखासनाची मांडी घालून मागें किंचित रेलून बसला होता. त्यानें कचेरीचा पोशाक केला होता तरी तोंडांत विडा चघळण्याचें त्याचें काम चालू होतें. आणि जवळच ठेवलेली एक मोठी पिकदाणी डाव्या हातानें ओढून तो आपला

मुखरस मधून मधून त्यांत सांडी. त्याच्या मागच्या बाजूस कमरेला तलवारी बांधलेले ४।५ शिपाई उभे होते. आणि समोर एका अंगाला एक स्वतंत्र पण शुभ्र वस्त्र घातलेली बैठक मांडलेली असून तिजवर एक इंग्रेज फिरंगी मांडी मोडून अदबीनें बसला होता. त्याच्या अंगांतील पोशाकावरून तो दर्यावर्दी अधिकारी दिसे. अंगांत लांब इंग्रेजी पद्धतीचा जाड लोकरी अंगरखा असून, गळयाच्या मोकळया जागेशीं त्यानें रंगित लोकरी पट्टा गुंडाळून सोडला होता. डोकीला टोपी असून एका अंगाला अधिकाराचा दर्जा दाखविणारी रंगित फीत होती. दुसऱ्या बाजूला रेशमी रंगीत फूल लावलेलें असून त्यांतच एक लहानसें पाखराचें पिस ठेवून दिलें होतें. हा फिरंगी मधून मधून तांबडा रंगित रुमाल खिशांतून काढून आपलें तोंड व कपाळ पुशीत असे व एखादे वेळीं तपकिरीची डबी काढून तिची चिमूट ओढी. त्यानें आपल्या पायांतील बूट काढून कचेरीच्या एक टोकाला ठेवले होते. यामुळें उघडे पडलेल्या त्याच्या लोकरी पायमोजातील लहानलहान भोकें दृग्गोचर होत, म्हणून तीं झांकण्यासाठीं मागच्या बाजूस पडलेल्या अंगरख्याचा घेर तो त्यावर मागें हात करून पसरून देई.

कान्होजी व हा फिरंगी अधिकारी दोघेहि आपली प्रतिष्ठा संभाळून एकमेकाशीं बोलत होते. शेजारी बसलेला दुभाषी त्या दोघांचें बोलणें व प्रश्नोत्तरें एकमेकाना समजावून देत असे. यामुळें संभाषण सावकाश चालवावेंच लागे. पण या अवकाशाचा फायदा, कल्पना किंवा उत्तरें नीट सुचून देण्याच्या कामीं सहजच होई.

संभाषणाचे विषय, फिरंगी व सरखेल यांच्यामध्यें जो वाद जी कलागत कायमची सुरू होती व त्यामुळे मधून मधून जे युद्धप्रसंग घडत, त्या संबंधाचे होते.

फिरंगी अधिकारी दर्जानें आरमारी छोटा सरदार असला तरी आज तो वकील या नात्याने विजयदुर्गला आला होता. आणि कान्हो-

जीनेहि. त्याच्या आदरातिथ्याची तजवीज चांगली ठेवली होती. म्हणून बोलणे प्रथम तरी शिष्टपणाचें सामोपचाराचें असेंच सुरूं होतें.

कान्होजी म्हणाला, "वकीलसाहेब, मग आपण आज कोणची नवी तक्रार घेऊन आला आहां?"

फिरंगी वकील म्हणाला, 'जी जुनी तीच नवी. आणि सरखेलांचा व आमचा कायमचा तह होईपर्यंत या तक्रारी कंपनी सरकारला अशाच करीत राहव्या लागणार अशी मला भिती वाटते.'

त्यावर पुढीलप्रमाणें प्रश्नोत्तरें झालीं.

'हे पहा वकीलसाहेब, तुम्ही ज्याला तक्रारी म्हणता त्याना खरोखर तुमच्याच आगळीकीचें स्वरूप आहे.'

'ते कसें?'

'ते असे कीं, आम्ही आपल्या घरीं राहतों नांदतों. देवानें दिलेल्या शेजारच्या समुद्रावर उपजीविका करतों. आम्ही व्यापार असा स्वतः थोडाच करतों. किरकोळ लाकडा-दगडांची, धान्याधुन्याची, नेआण या बंदरातून त्या बंदरांत किनाऱ्यालगत काय होत असेल ती. आणि लगत्याच्या समुद्राचें संरक्षण करण्याच्या बेताइतक्याच लहानशा तोफा, जंबुरें, ठेवण्याकरता खडकावर बुरूज बांधतो. आणि ते बुरूज एकजीव व्हावे म्हणून तटाच्या भींति बांधतों. म्हणजे काय! आम्ही आमच्या कायद्यांत राहतों, आमच्या हद्दींत वावरतों. पण यालाहि उपद्रव कोण करतं सांगा पाहूं.'

'तुमच्याच शेजारचा जंजिरेकर हब्शी! आणि समुद्रावर वावरणारे त्याचे काळे सैतान!!'

' कपटाची भाषा बोलूं नका वकीलसाहेब. आमचा दुष्मन हबशी असेल पण आम्ही त्याला भीत नाही. आणि त्याला आम्ही त्याच्याच बंदरांत घालून जवळ जवळ डांबून ठेवला आहे. तेव्हा तो आणि आम्ही पाहून घेऊं. त्याची तक्रार कागाळी सांगायला मी तुमच्याकडं कधीं आलों होतों कां? किंवा त्याची कागाळी सांगण्याचं वकीलपत्र घेऊन कां तुम्ही इकड आला आहांत ? ''

' तसं नाहीं कांहीं ! पण सरखेल उपसर्ग उपद्रव म्हणाले तो त्याना खरा होत असेल तर, जंजिरेकर हबशाकडून. आम्ही कांहीं तसे नाहीं. उलट आम्हाला उपद्रव होतो तो तुमच्या पुढं मांडण्याकरतांच मला कंपनी सरकारनं धाडलं आहे. '

' उपद्रव ! तुम्हाला आणि आमच्याकडून? –तो कसा ! '

' तो असा कीं, आमची व्यापारी गलबतं तुमच्या कोकणपट्टीच्या बंदरांत आली तर तुम्ही त्यांना दस्तुरी घेतल्याशिवाय प्रवेश करू देत नाहीं. आणि दर्या किनाऱ्यावर कुठं मांगर घालूं, छावण्या उभारू, दुकानं लावूं, गुदाम बांधूं म्हटलं तर परवानगी देत नाहीं, टिकूं देत नाहीं. हें असं कां व्हावं ? '

' पण तुम्ही इकडे येतां आणि वखारी दुकानं घालतां ते कोणत्या हक्काच्या आधारावर ? '

' जगभर व्यापाऱ्यांना जो हक्क असतो त्याच्याच आधारावर ! '

' जगभर म्हणजे खुल्या समुद्रावर म्हणाल तर ती गोष्ट वेगळी. पण खुल्या समुद्रावरून गलबतं वाहून नेता आली तरी त्यांवर काहीं वखारी बांधतां येत नांहीं. हे सगळ करायला किनाऱ्यावर पाय ठेवावाच लागतो. आणि किनाऱ्यावर कुणाचं तरी राज्य असतंच. आणि कोणंतंहि राज्य झालं तरी तें आपल्या बंदरावर नाकीं बसवून जकात वसूल करतंच

कीं नाहीं? जकात वसूल न करणाऱ्या एखाद्या राज्याचं उदाहरण मला सांगाल काय!'

'जकाती घेत. नाहीं अस नाहींत. पण आम्ही फिरंगी लोक साता समुद्रापलीकडून आलों हें लक्षांत घेऊन आम्हाला जकातीची माफी करणेंच योग्य होईल.'

'पण सातसमुद्र ओलांडून हजारो कोस समुद्र प्रवास करणं हें जिवावरचं धाडसच नव्हे काय?'

'वाहवा! सरखेलानी फार मार्मिक भाषण केलं. आणि हें जिवा-वरचं धाडस करून आम्ही येतों यांतच जकात माफीचा आमचा हक्क उत्पन्न होतो कीं नाहीं?'

'माफीचा प्रश्न मग पाहूं, पण मला आधीं म्हणायचं होतं तें हेंच कीं, असं जिवावरचं धाडस कोणी मनुष्य सुखासुखी करीत नाहीं.'

'मी झालं तरी तेंच म्हणतों.'

'तुम्ही माझा अर्थ समजलां नाहीं. असलं धारिष्ट कोणी सुखा-सुखी करीत नाहीं याचा अर्थ, हें धारिष्ट करणारा तें न करील, तर तो घरच्या घरी उपाशीं मरेल इतकी त्याची घरची गरीबी आहे. याचा अर्थ तो मूळचा भिकारी आहे. आणि भिकाऱ्यांनीं भिक्षा वाटेल तर मागावी, पण हक्क सांगूं नये, असा माझ्या बोलण्याचा अर्थ होता. तुम्ही फिरंगी लोक आपल्या घरचे दरिद्री, तिथं राहिल्यानं पोट भरत नाहीं, म्हणून इकडं येतां हें कबूल करा. भिक्षेकऱ्यांची भूमिका स्वीकारा. हक्काची भाषा सोडा. आणि मग बोला!'

आपण आपली पात्रता सिद्ध करण्याकरितां दर्यावर्दी धारिष्टाचं वर्णन करायला गेलों, आणि त्या वर्णनाचाच उपयोग करून सरखेलानीं

आपल्या गळयांत भिक्षेकरीपण बांधलं आणि कुंठित केलं, हे पाहून फिरंगी वकील खजील झाला. त्याला मनांतून थोडा रागहि आला, पण करणार काय ? सरखेलानें टाकलेला हा वाक्दुकी डाव परतविण्याकरितां फिरंगी वकील म्हणाला—

'आपल्या कोटिक्रमाची मी तारीफ करतो. पण त्यानं सुचविलेला सिद्धान्त मी मान्य करीत नाहीं. आम्ही कंपनीवाले फिरंगी भिक्षेकरी असतों तर घरच्या घरींच राहून मिळेल ती भिक्षा पदरांत घेतली असती आणि तिजवर निर्वाह केला असता ! निवळ भिक्षेकरी दर्यावर्दीपणाच धारिष्ट करीत नसतात. आम्ही दर्यावर्दीपणाचा षोक करणारे जातिवंत खलाशी आहोंत. तसेंच भिकारी असतात ते अशीं मोठमोठीं जहाजें गलबतं बांधू शकत नाहींत. आम्ही भिक्षेकरी असतों तर केवळ हातांच्या ओंजळी जोडून तुमच्या पुढें आलों असतों.पण आम्ही एवढीं मातबर अवजड जहाजं घेऊन येतो तीहि कांहीं नुसती बसण्याकरता नव्हे ! त्यांत हरतऱ्हेचा उमदामाल भरून आणतों. आणि हा माल देखणा उपयुक्त नसता तर आमच्या वखारीतून तुमचे लोक तो कां विकत घेऊन जाते; मी म्हणू नये पण म्हणतो कीं, तुमचा दर्यावर्दी व्यापार असला तर तो नुसत्या मासळीचा. तुमच्या देशांत, तुमच्या लोकांत, कारागिरी असती तर तुम्ही आमच्यासारखी गलबतं बांधून त्यांत व्यापारी माल भरून परकी बंदरांत विकायला नेल्याशिवाय राहिला असता काय ?'

सरखेल हंसून म्हणाला, 'पण मुद्याची गोष्ट ही की, तुम्ही म्हटल्याप्रमाणं आम्ही व्यापारी माल भरून तुमच्या सरकारच्या बंदरांत नेली असती तर तुम्ही तरी जकात घ्यायची सोडली असती काय ? मुद्दा जकात वसूल करण्याच्या हक्काचा अधिकाराचा आहे. आम्ही तुम्हापेक्षा कमी प्रतीचे कारागिर असूं, कमी महत्वाकांक्षी असूं, तें आमचं आम्हाला लखलाभ असो ! तुमच्यापुरतं बोला तुम्ही भिक्षा मागण्याला इकडे आलां

नाहीं म्हणतां कबूल. पण तुमच्या व्यापारी मालाची भिक्षा आमच्या लोकाना वाटण्याकरतां किंवा त्याची खैरात करण्याकरता तुम्ही इकडे येतां काय ? मुळींच नाहीं. तुमच्या घरीं व्यापारी माल तयार करण्याला एक टक्का खर्च आला तर तो आमच्या लोकांच्या पदरांत बांधून त्याचे चार टक्के करायलाच तुम्ही इकडे येतां. अर्थात् तुम्ही आमच्या लोकाकडून जो पैसा काढता त्यातलाच अगदीं लहानसा अंश आम्ही जकातीच्या रूपानं तुमच्याकडून घेतो. यांत आम्ही अन्याय तो काय करतो ? बरं; आज तुम्हाला आमच्या बंदरालगत वखारी बांधायला परवानगी दिली म्हणजे तुम्ही उद्यां आपले हातपाय पसरायचे थांबाल काय ? नाहीं. माल उतरण्याकरता धक्के, तो साठविण्याकरता वखारी, तो संभाळण्याकरता शिपाई, आणि शिपायाकरता दारूगोळा आणि तटबंदी, या गोष्टी क्रमाने आल्याच की नाही ? या सगळ्या गोष्टींचा विचार करूनच परवान्याशिवाय आम्ही वखारी घालूं देत नाही. नसता साप घरांत घ्या आणि मग तो डांबून ठेवण्याकरता त्याच्या भोवतीं मंतरलेल्या पाण्याच्या रेघा ओढीत बसा, असला उपद्व्याप करणाऱ्याला शहाणा कोण म्हणेल ! व्यापारी माल तुमच्यासारखा तयार करण्याचं कौशल्य आमच्याजवळ नसलं तर तो विकत घेण्याला लागणारं द्रव्य तरी आमच्याजवळ आहेच की नाही ? झालं फिटास फिट आम्ही तुमच्यावर उपकार केला नाही. तुम्हीहि आमच्या उपकाराची म्हणजे जकात माफीच्या भिक्षेची अपेक्षा करूं नये. '

अशा रीतीनें हाहि युक्तिवाद गळ्यांत आलेला पाहून फिरंगी वकिलानं वेगळा विषय काढला.

फिरंगी वकील म्हणाला, ' बरं, तुम्ही बंदरांत येणाऱ्या गलबतांवर जकात घेतां, ते असो. परन्तु तुमचा किनारा सोडून लांब खुल्या मोकळ्या समुद्रावर आमचीं गलबतें हिंडतात त्यांच्या जवळहि तुम्ही परवाना दाखवा म्हणतां हें काय ? खुला समुद्र हा सगळ्यांचाच सारखा आहे. त्यावर कोणी कोणाला प्रतिबंध करूं नये. '

' खुला समुद्र हा सर्वांनाच मोकळा मार्ग आहे ही गोष्ट आम्ही जाणतो. पण आम्ही परवाना मागतों तो अशा ठिकाणीं मागतों कीं, ती जागा आमच्या टापूंत येते. त्या पलिकडून तुम्ही गेल्यास आम्ही परवाना मागत नाहीं. पण तुम्हाला आडवायला कोणी नाहीं असं दिसलं कीं आमच्या चार कोसांच्या हद्दींत येतां. आणि तुमच्या तावडीत सांपडेल तें जहाज गलबत लुटून त्यावरचा माल आणि खलाशी पकडून, आपल्या जहाजावर घालून, लगेच खुल्या समुद्रांत शिरतां तेव्हां आम्हालाहि खुल्या समुद्रांतच शिरून तुमच्याशीं लढावं लागतं, अटक करावी लागते. आणि तुमच्या गलबतांत चोरी करून नेलेला आमचा माल आणि पकडलेले खलाशी यांचा तपास आम्हाला करावा लागतो. एक वेळां बंदरांत जकातीची माफी होऊं शकेल. पण चोरी करून दरोडा घालून नेलेल्या मालाला माफी कोठेच मिळत नाहीं. तो आमच्या समुद्रांतच काय, पण सातासमुद्रापलिकडेहि सांपडला, तर तेथून तो पकडून परत आणण्याचा अधिकार आम्हांला आहे असें समजा. '

' नाहीं, तसं नाहीं. आमच्या गलबतांत तुमचा माल किंवा माणसं नसतां आमची गलबतें तुम्ही आडवली आहेत आणि लुटली आहेत. या कृत्याला चाचेगिरी म्हणतात. जगांतल्या राजकारणाला ती मंजूर नाहीं आणि ईश्वरा घरीहि नाहींच नाहीं.'

हें चढेलपणाचें उत्तर ऐकून कान्होजीला अतिशय राग आला. हळूहळू त्याच्या भिवया वर चढूं लागल्या. डोळ्यांतून ठिणग्या पडणारें तेज चमकूं लागलें. आवाज चढू लागला. आणि मधून मधून त्याचा हात जवळच्या तलवारीच्या मुठीवर पडूं लागला. सरखेल म्हणाला, ' फिरंगी वकीलसाहेब, तुम्ही काय बोलता याचा विचार केला आहे काय ? आम्हाला तुम्ही चाचे म्हणता. जगाचे शत्रू आणि ईश्वराचे अपराधी ठरविता. हा अपमान तुम्ही कंपनी सरकारचे वकील म्हणविता म्हणूनच मी सोसून घेतला असें समजा. नाहींतर इथल्या इथंच तुम्हाला हातकड्या

घातल्या असत्या किंवा या तरवारीनें तुमचा शिरच्छेदहि केला असता. आम्ही कोकणचे, गरीब कोळी खलाशीं. आम्हीं आमच्या घरची बंदरें सांभाळतों. आणि किनाऱ्याची लहानशीं पट्टी सुरक्षित ठेवण्यापुरता अमल करतों, परवाने घ्यावयाला लावतो, याला तुम्हा चांचेगिरी म्हणता. पण तुम्ही सातादेशच्या फिरंग्यांचीं अवलाद आपले देश सोडून इकडे उघडावयाला आला ते चांचे नव्हे तर कोण आहांत ! तुम्ही लोक स्वतः इकडे येण्यापूर्वीच तुमच्या चांचेगिरीचा बदलौकिक इकडच्या लोकांच्या कानीं आला होता. तुम्ही दर्यावर्दी व्यापारी असाल, पण सगळया दुर्गुणांचे पुतळे आहांत. गोवें प्रान्तीं तुम्हा लोकांनीं काय धुमाकूळ घातला, काय छळ केला, हे कुणाला माहित नाहीं ? आम्हा गरीब कोकणी लोकांच्या मालकीच्या किनाऱ्यावर तर तुम्ही आक्रमण केलंच, पण जगाचा आमचा व्यापार बुडविला, आपला चालू केला, आमच्या शेती–बागायतीची नासाडी केली. पण याही पलिकडची दुष्कृत्यें फिरंग्यांनीं केलीं. '

ही निंदा ऐकून आश्चर्य वाटल्यासारखें दाखवून फिरंगी वकील म्हणाला ' एकंदरीनं आम्ही बरेच वाईट आहों म्हणावयाचे ! बरं मग आणखी काय काय दुष्कृत्यं करतों तें तर सांगा. '

' आरोपाबद्दल आश्चर्य दर्शविल्यानं अपराधाची नाशाबीती होत नाहीं. सांगितलीं याहून पलिकडचीं तुमचीं दुष्कृत्य कोणची म्हणून विचारतां तर सांगतो ऐका. किनाऱ्यालगत किंवा खुल्या समुद्रावर आमचे कोणी गरीब कोळी खलाशी तुमच्या तावडींत सांपडले म्हणजे ते तुम्हीं पकडतां. त्यांना आपल्या गलबतावर राबविता. मारहाण करता. आणि शेवटीं परदेशी नेऊन गुलाम म्हणून विकतां ही गोष्ट तुम्हाला नाकबूल करतां येईल काय ? '

' नाहीं, अशा गोष्टी आम्ही करीत नाहीं. आमच्या येशू ख्रिस्ताला गुलामगिरी मान्य नाहीं. '

'वकीलसाहेब, तुम्ही खोटं बोलून आपलं तोंड विटाळतां ते असो. पण त्या विटाळत्या तोंडांतून आपल्या धर्मगुरूचं नांव घेतां त्यामुळं तोहि बिचारा विटाळला जातो याची कांहीं लाज धरा. तुम्ही फिरंगी लोक गुलामांचा व्यापार करीत नाहीं असं म्हणालां, आणि आपल्या १०० ईश्वराच्या शपथा वाहिल्या तरी तें कोण खरं मानील? परदेशांत तुम्हा फिरंग्यांनीं गुलाम करून नेऊन विकलेले आमचे कांहीं लोक सुदैवानं परत आलेले तुमच्या पुढं आणून उभे करूं काय? गुलामांचाच व्यापार करण्याकरतां निघालेल्या तुमच्या कांहीं जहाजावरून गुलाम करून दावणीला बांधलेले काठेवाडी, गुजराथी, कोकणी खलाशी मी स्वतः सोडवून आणले आहेत. त्या मला तुम्ही खोट्या गोष्टी सांगून मी कसा ऐकेन? उलट आमच्या आरमारानं तुमचा एक तरी खलाशी गुलामगिरींत विकला तर नाहींच, पण तशा रीतीनं घरीं वागविलाहि नाहीं. आम्ही तुमचे फिरंगी लोक पकडले तर फक्त लढाईत पाडाव झालेले पकडतों. पण त्याना आमच्या तुरुंगांत कसे वागवतों हे वाटल्यास, माझ्याबरोबर आतांच चला, या किल्ल्यांतल्या तुरुंगांतच तुम्हाला दाखवतों. उलट आमचे फिरंगी कैदीच इतके अरेरावीनं उर्मटपणानं वागतात कीं, त्यांचे पहारेवाले कमी सोशीक असते तर जागच्या जागींच त्यांना देहान्त प्रायश्चित्त देते. आम्ही तुमच्या फिरंगी कैद्यांना मारून समुद्रांत फेकून दिलें तर तुम्ही काय करणार किंवा तुम्हाला कसं कळणार? पण आम्हा कोकणी दर्यावर्दी लोकांच्या हातून खरा निरपराधी असा एकहि फिरंगी दगावला नाहीं हें मी छातीवर हात ठेवून सांगू शकेन. उलट तुम्ही फिरंगी लोक आमचे खलाशी कोळी परदेशांत नेऊन गुलाम म्हणून विकतां ही गोष्ट तुम्ही नाकबूल करतां काय?'

## ( ४ )

पण फिरंगी वकीलाने या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीच एक गोष्ट घडली. कुणब्यानं पकडून आणलेला फिरंगी कैदी घेऊन येणारा नाईक या

वेळीं हळूच पुढें झाला; आणि आदबीनें तोंडाला पदर लावून त्यानें सरखेलाच्या कानांत कांहींसें सांगितलं. तें ऐकून सरखेलाला आश्चर्यानं हसूं आलं आणि त्यानेंहि नाइकाला उलट निरोप हळूच सांगितला, आणि फिरंगी वकीलाला म्हणाला, 'वकील साहेब, माझ्या प्रश्नाचं उत्तर तुम्हाला देण्याचं आतां कारण नाहीं. मीच तें देतों पहा !'

असं म्हणून कान्होजीन मोठ्यानं टाळी वाजविली. त्याबरोबर नाईक आपला फिरंगी कैदी घेऊन पुढं आला. वकीलाला हा प्रकार काय आहे तें उमगेला. तेव्हा कान्होजी म्हणाला, 'आता तुम्हीच त्याला आपल्या भाषेंत विचारा, म्हणजे तो आपल्या इमानाला जागेल, तुमच्या येशूला मानील, तर खरं तें सांगेलं ! पण त्यानं खोटं बोलून तरी काय होणार ? त्याला खोट पाडणारे साक्षीदारच मी तुमच्यापुढं उभे करतों.'

फिरंगी वकील व फिरंगी कैदी एकमेकाशीं आपल्या भाषेंत बोलूं लागले. इतक्यांत नायकानं कुणक्या धाकल्या आणि पाडाव केलेल्या होडीवरचा काळा खलाशी तिघे आणून कचेरींत समोर उभे केले. त्याना पाहून फिरंगी कैद्याचं आणि फिरंगी वकीलाचं तोंड उतरलं. तेव्हा कान्होजी म्हणाला, 'पहा, पहा हा तुमच्या चांचेगिरीचाच नव्हे तर गुलामगिरीच्या व्यापाराचा पुरावा. दैव अनुकूल म्हणून तुमच्या गलबता-वरच्या फिरंगी लोकांची आपपसांत मारामारी झाल्यामुळं हे तिघे बचावले आणि विजयदुर्गाला परत आले. पण तसं कांही न घडतं, तर हे तिघे परदेशांत नेऊन गुलाम म्हणून विकले गेले असते आणि स्वदेशाला कायमचे मुकले असते.'

मग फिरंगी वकिलाची खात्री करण्याकरतां कान्होजी म्हणाला, "कुणक्या तूं घडलेली हकिगत या सद्गृहस्थांना ऐकीव...हा दुभाषी ती त्यांच्या भाषेंत त्यांना सांगेल."

कुणक्यानें, आपण व धाकल्या सहज गमतीनें चांदण्यांत समुद्रावर गेलों असतां, फिरंगी गलबतांची अचानक भेट झाली तेथपासून, सर्व हकिगत सांगितली. ती फिरंगी वकीलाला निमूटपणें ऐकूनच घ्यावी लागली. तेव्हां तो निरुत्तर झाला. आणि आतां विषय बदलावा म्हणून म्हणाला, 'जाऊं दे कीं, असल्या गोष्टी समुद्रावर उलट सुलट केव्हां केव्हां घडणारच. आमचं कंपनी सरकार झालं तरी त्याला सगळेच फिरंगी आपल्या अमलांत ठेवून त्यांच्याकडून शिष्टाचाराचे नियम कसे पाळविता येतील ? माणूस आहे तिथं अपराध असायचाच ! पण तुम्ही सरखेल म्हणजे या कोंकण किनाऱ्याचे जवळ जवळ राजेच आहां. म्हणून आमच्या कंपनी सरकारनं तुमचा स्नेह संपादन करण्याची इच्छा धरून मला तुमच्याकडं पाठविलं आहे. मग आतां त्याचं आपण कांहीं बोलूं या काय ? '

कान्होजी म्हणाला, ' ठीक आहे. त्याला माझी केव्हांही ना नव्हती. पण सामोपचाराचं, मुद्याचं सरळ न बोलतां तुम्हीं आमच्यावर चांचेगिरीच्या आरोपाचं हत्यारच उचललं, तेव्हांच ही सुबुद्धी तुम्हाला सुचली असती तर बरं झालं नसतं काय ? बरं तुमच्या कंपनी सरकारचं म्हणणं तरी काय ? '

फिरंगी वकील म्हणाला, ' तुमचा व आमचा नेहमीं तह असावा.'

' ठीक आहे. कलागत न केली म्हणजे तह आहेच आहे. पण तहाचीं कलमं तरी काय ?'

' पहिलं कलम हें कीं, आम्ही मित्र म्हणून आमच्या व्यापारी गलबतांना तुमच्या बंदरांत जकातीची माफी व्हावी. '

' ती गोष्ट होणार नाहीं. मित्र मित्र झाले तरी पैशाअडक्याचा व्यवहार व्हायचा तसाच झाला पाहिजे. आम्ही जर तुमच्या मुंबई बंदरांत जकातीची माफी मागत नाहीं,तर तुम्ही आमच्या बंदरांत ती कां मागावी !'

‘ जकातीच्या माफीचं एक असो. पण कोकण पट्टीच्या समुद्रावरून फिरतांना आमच्या जहाजांना तुमचा परवाना घेण्याचा जुलूम तुम्ही कां करावा !’

‘ परवाना घ्यायला मी लावतों तो जुलूम नव्हे. तेंहि व्यवहाराच्या नियमाला धरूनच आहे. जकात दिलेला माल एरवी ओळखावयाचा कसा ? तुमच्या मालकीचा आणि तुम्ही चोरून लुटून नेलेला माल वेगळा ओळखायचा कसा ? परवाना मागितला तर परवाना दाखवावा. बंदरांत जहाज माल उतरवील, तर जकात द्यावी. समुद्रावर परभारे जात असेल तरी परवाना दाखविण्याकरितां जहाज उभं करावं. आमच्या अधिकाऱ्याला जहाजावर येऊन तपासणी करण्याची संधी द्यावी. यांत तुमचं तरी काय गेलं ? केवळ तपासणीकरतां तो कांहीं तुमच्याकडून विनबंदरी जकात मागत नाहीं. आमच्या कोकणपट्टीचा माल आणि माणसं सुरक्षित रहावी, त्यांचा अपहार होऊं नये, येवढं पहाणं सांभाळणं याकरितांच हा परवाना दाखवला पाहिजे. इतकीच सक्ति मी करीत असतों. कर नाहीं त्याला डर कशाला ? ’

‘ पण या समुद्रावर तुम्हाला राजसत्ता कशी पोचतें ? किनाऱ्या-वरच्या व तेथपासून पलिकडच्या जमिनीचें मालक--राजे–तुम्ही असाल. ’

‘ पण समुद्रावर माझी जशी मालकी नाहीं तशी तुमचीहि नाहीं ! मग तुम्ही तरी मुंबईच्या आसपास आमच्या जहाजांना परवानें कां मागतां? याचं तात्पर्य इतकंच कीं, कोणाला आपलीं बंदरं आणि किनारा सुरक्षित ठेवायचा असला, तर त्याला किनाऱ्यालगत अमल चालविलाच पाहिजे. आमचा पाडाव करण्याकरितां तुम्ही आजवर कोणता प्रयत्न करावयाचा बाकी ठेवला ? जंजिरेकर शिद्यांना तर तुम्ही भूलथापा देऊन आपल्या मदतीला बोलावतांच. वेळ पडली म्हणजे गोंवेकर फिरंग्यांशीं असलेली स्पर्धा विसरून त्यांना शरण जाऊन त्यांची मदत घेतां. तुम्ही दोघांनीं मिळून कुलाब्यावर स्वारी केली त्यांत हार खाऊन तुम्हालाच परत जावं

लागलं कीं नाहीं ? आतां तुम्ही आपल्या मदतीला वाडीकर सावंत आणखी घेणार, घ्या ! पण सांगून ठेवतों कीं, तुम्ही सगळे काळे–गोरे फिरंगी, आणि आमचे कोकणी शत्रू, सामील करून घेतले तरी माझं कांहीं एक वाकडं होणार नाहीं. माझ्या पाठीमागं शिवाजीमहाराजांचा पुण्य-प्रताप उभा आहे. आम्ही अन्यायानं केव्हांहि तुमच्या मालाचा अपहार केला नाहीं. तुम्ही मात्र आपल्या तोफा, बंदुका, दारूगोळा यांच्या जोरावर न्याय पायाखालीं तुडवितां, निरपराधी व्यापारी गलबतं बुडवतां, धरून नेतां. आणि त्यावरचे बिनहत्यारी लोक गुलाम म्हणून परदेशांत नेऊन विकतां, यांत देव तुम्हाला यश कसं देईल ? म्हणून मला समुद्रांत कांहीं दूरवर आपली हद्द ठरवून तींत जमिनी सारखीच आपली सत्ता चालवावी लागते. एरवीं निभाव लागावयाचा नाहीं. खाली गोंवं सोडलं आणि वर मुंबई बेट सोडलं, तर मधला सगळा समुद्र किनारा आमच्या शिवाजी महाराजांच्या मालकीचा आतां झाला आहे. त्यांनीं मोंगलांचीं ठाणीं उठवून हा मुलूख जिंकून आपला केला आहे. आणि मी त्यांचा प्रतिनिधी सरखेल महाराजांचाच अधिकार चालवितों आहे.'

'पण आम्ही ही सत्ता न जुमानली तर ?'

'तर काय ! समुद्रावर युद्ध होऊन त्यांत जो जिंकील तो आपली सत्ता टिकवील. आजपर्यंत झालेल्या युद्धांत तुमचा जय कितीवेळां झाला आणि आमचा कितीवेळां झाला हें तुम्हाला माहितच आहे. तुमच्या 'परसिदेन' गलबताची काय वाट लागली ? तुमचे 'ससेक्स' जहाज आम्ही पाडाव करून आणलं ते तद्यानंतर तुम्हाला परत मिळालं. खांदेरी बेटाच्या लढाईत कुणाचा जय झाला ? तुमचे 'चारलट्' जहाज तें पहा अजून आमच्या खाडींत पाडाव करून ठेवलें आहे.'

फिरंगी वकील म्हणाला, 'आज तुमची आमच्यावर सरशी आहे, पण लक्षांत ठेवा कीं, आम्ही हजारों कोसावरून इकडे आलों ते कांहीं परत जाण्याकरितां नाहीं. तसेच आम्ही आज चार देशचे चार फिरंगी

व्यापारांत एकमेकाशीं स्पर्धा करतों असं दिसत असलं, तरी ती आमची स्पर्धा व्यापारापुरती समजा. तुमच्याशीं लढण्यांत आम्ही केव्हाहि एकच आहों. काळ हा असाच टिकणारा नाहीं. म्हणून वेळींच सावध होऊन तुम्ही आमच्याशीं स्नेह संपादावा.'

'काळ टिकणारा नाहीं हें मीहि जाणतों. पण काळ म्हणजे सद्दी असा अर्थ घेतला तर फिरंग्यांचाच काळ आतां संपत आला असून आमच्याला नुसता प्रारंभ आहे. आणि तरण्याची धडक प्रौढाला केव्हांहि चीतच करणार ! मीं तुम्हा तांबडतोंड्यांना सांगून ठेवतों कीं, या कान्होजी आंग्र्याचा भाग्य सूर्य चढला आहे. तो जिवंत असेपर्यंत या कोकण किनाऱ्याला तुमचे पाय लागणार नाहींत हें पक्कं समजा. काळ हा टिकणार नाहीं हें आंग्र्यांना बजावण्याची वेळ नाहीं. पुढं दुर्दैवानं आलीच तर पुढची पिढी पाहून घेईल?'

इतकं बोलून सरखेलांनीं इंग्रज वकीलाला रजा दिली, कुणक्यानं पकडून आणलेल्या फिरंगी कैद्याला अंधार कोठडींत नेऊन ठेवण्याचा हुकूम केला, आणि आपल्या खासगी कोठीकडे गेले.

## ( ५ )

समुद्रकाठीं एकटं भटकणं या सारखं दुसरं कांहीं सुख नाहीं असं कुणक्याला वाटे. विशेषतः चांदण्यारात्रीं. चांदणं हवं, मग तें पूर्व रात्रीचं असो, नाहींतर उत्तररात्रींचं असो.

स्वतः सरखेल रात्रीं माजघरांत बायका माणसांच्या हातवाढीचं जेवण जेवीत. यामुळें कुणक्याला या वेळीं परिचारक म्हणून त्यांच्या जवळ हजर राहावं लागत नसे. किल्ल्यांत सरकारी पंक्तीचं म्हणून जेवण. असे. त्यांत कुणक्या सकाळ संध्याकाळ केव्हां केव्हां जेवी. पैकीं दिवसाचं जेवण तो वेळेवर येऊन जेवी. पण संध्याकाळ सरकारी

पंक्तीचं जेवण म्हणजे यथातथाच असायचं. कोणी पंक्ती बारगीर दोन वेळचं एकदांच दुपारीं जेवून घेत, आणि संध्याकाळा बरोबर घरीं जायला मोकळे होत. कोणी जेवणाऐवजीं कोरडा शिधा पदरांत घेऊन जात. हेतु हा कीं, आपणाबरोबर घरच्या बायकामुलांचं पोट भरायला त्या शिध्याची थोडी मदत व्हावी. कांहीं म्हातारे पंक्तीबारगीर रात्रींचं जेवण जेवीतच नसत. या सर्व कारणामुळं रात्रीच्या पंक्तीला आल्या गेल्याचा हिशेब नसे. तसंच रात्रीं सरखेल खासगी कोठींत निजायला गेले म्हणजे तर कुणक्याला त्यांचं कांहींच काम नसे. एखाद दिवशीं कुणक्याच्या तोंडून उत्तर–हिंदुस्तानचं यात्रा वर्णन ऐकतां ऐकतां झोंपी जाण्याची लहर आली म्हणजे त्या दिवशीं मात्र ते कुणक्याला घरीं जेवायला ठेवून घेत.

समुद्राकांठच्या या एकलकोंड्या सहलींत कुणक्या आपणाबरोबर एकच सोबती घेई. तो त्याचा आवडता झिप्रा कुतरा. तें जनावर समुद्राशिवाय एरवी कशालाहि भीत नसे. पण कुणक्यानं प्रयत्नानं त्याची ही भीति काढून टाकल्यामुळं, हे दोघे वेळीं अवेळीं समुद्रकाठीं कोरड्या वाळवंटांत हिंडत. समुद्राच्या लाटा पायावर येऊन हापटतील अशा ठिकाणीं बसत. किनाऱ्यावरच्या एखाद्या ठेंगण्या झाडावर किंवा पुढें आलेल्या खडकावर चढून बसून, खालीं लाटांनी येत जात असलेल्या पाण्याची लीला पहात. मात्र 'झिप्र्या कुत्र्याला सृष्टिसौंदर्य पाहून रममाण होण्याची शक्ति नसल्यामुळें, तो कुणक्याला आपल्या नजरेंतून जाऊं देत नसला तरी त्या मर्यादेंत इकडे तिकडे भटके, नखानीं वाळू उकरी, एकादा खेकडा किंवा कालवा सारखा लवचीक स्वादिष्ट प्राणी मिळाला तर गट्ट करी, आणि इतर प्राण्यांना खेळकरपणानं भिववून दूर पळवी. मात्र हें सर्व होत असतां कुणक्याकडे त्याचं इतकं लक्ष असे कीं, त्याच्या खुणेचा शब्द किंवा शीळ अगदीं हलकीहि कानावर येतांच, हा स्वामिभक्त आपल्या आवडत्या करमणुकी टाकून देऊन धन्याच्या पायाशीं जाऊन उभा राही, व त्याची आज्ञा घेण्याकरितां डोळे वर करून त्याच्या तोंडाकडे लावी.

आज पौर्णिमेचं चांदणं भरपूर प्रकाशांत होतं. आभाळांत तळहाता-एवढाहि ढग नव्हता. थंड गार वारा मंद गतीनं वाहत होता. अशा सुखमय स्थितींत कुणक्या नेहमीपेक्षां बराच दूर झटकला. त्याला दूर गेल्याचं भान न राहून तो आणखी पुढंच चालला. या अनोळखी बाजूला रात्रीं तर नाहींच, पण दिवसाहि कधीं फारसा तो पूर्वी आला नव्हता. कारण समुद्राची उजवी बाजू मोकळी असली तरी डाव्या बाजूला झाडं झुडपं वाढलेलीं होतीं. जमीनहि उंच सखल. थोडा पाऊस पडला कीं जमिनीकडून वाहत येणारे प्रवाह फुगून मार्ग बंद करीत. आणि या बाजूला वस्ती तर कोस अर्ध कोसाच्या टापूंत नव्हती. असो. असाच कांहीं दूर गेल्यावर एक लहानसें टेंकाड त्याला दिसलें. त्याचा माथा थोडा सपाट पण वरतीं तुरळक झाडं वाढलेलीं होती. पायपिटीनं किंचित थकल्या सारखं वाटल्यानं या टेकाडावर कांहीं वेळ विश्रांती घ्यावी, तेथून समुद्राची शोभा पाहावी, आणि मग किल्ल्याकडे परतावं, या हेतूनं कुणक्या टेकडी चढून जाऊन एका दगडावर बसला. आणि पायाशीं बसलेल्या झिप्र्या कुत्र्याच्या पाठीवर हात फिरवूं लागला.

इतक्यांत समुद्राच्या बाजूनं एखादं गलबत किंवा मोठी नाव किनाऱ्याकडे येत असावी असं त्याला दिसलं. म्हणून तो तिकडं निरखून पाहूं लागला. तों, त्या गलबतावर दिवा दिसला. दिवा क्षणांत दिसावा, क्षणांत अदृश्य व्हावा, अशी त्याची उघडझांप होत होती. मध्येंच एकदां दोनदां तर तांबड्या भिंगांतून दिव्याचा प्रकाश आल्यासारखा वाटला. या सर्व चिन्हांवरून या दिव्याच्या खुणा मुद्दाम कोणी तरी जहाजावरून करीत आहे, दिव्याची हालचाल केवळ जहाजाच्या हेलकाव्यानं होत नाहीं, अशी त्याची खात्री झाली. म्हणून तो उठून उभा राहिला आणि चहूंकडे पाहू लागला. टेकडीच्या पलीकडच्या बाजूनं झाडोंतून, गलबता-वरील दिव्यांच्या खुणाना उत्तर म्हणूनच कीं काय, कोणी तरी चुडीच्या मशालीची हालचाल करीत आहे असंहि त्याला दिसून आलं. यामुळं पुढं

त्या गलबताचं काय होणार हें पाहण्याच्या उत्सुकतेनं तो, घरीं जाण्याचा बेत रहित करून, पाय रोवून कंबरेवर हात ठेवून तटस्थ उभा राहिला. आणि कुत्र्यानं भुंकूं नये म्हणून त्यानं त्याला जवळ घेऊन तोंड हातानं हळू दाबून धरलं. तें जहाज जवळ येऊं लागलं त्या बरोबर इकडे, म्हणजे जिकडून झाडींतल्या दिव्याच्या खुणा उत्तरादाखल होतात असं दिसलं तिकडे, हालचाल होऊं लागली. चाहूल ऐकूं येऊं लागली.

मध्यरात्रीं चंद्र माथ्यावर चढूं लागल्यामुळं भरती भरत चालली होती. मात्र वारा फारसा नसल्यानं समुद्र शांत होता. या इकडे किनाऱ्याच्या बाजूला खडक नसावे, शिवाय पाणीहि खोल असावं, एरवीं जहाज किनाऱ्याला लावण्याचं धाडस कोणी करणार नाहीं, असं अनुमान कुणक्यानं बांधलं. आणि जहाज किनाऱ्यापासून शंभर हातावर आलं तरीहि तें हळू हळू पुढंच सरकत होतं, यामुळं त्याचं अनुमान खरं ठरलं. थोड्याच वेळांत जहाज वाळूच्या दांड्याला टेकून स्थिर होईल आणि जहाजावरचे लोक खालीं उतरतील या विषयीं कुणक्याला शंका उरली नाहीं. म्हणून आतां किनाऱ्यावर काय घडतं हें पाहण्याकरितां, समुद्राकडे पाठमोरा होऊन टेकडी पलीकडच्या उताराकडं तो पाहूं लागला. हा उतार संपण्याच्या सुमाराला दोन तीन बाजूनीं वाळूच्या टेकाडांचा गराडा पडलेला असून, मधल्या सपाट भागांत लोकांची हालचाल वाढत आहे आणि एखाद दुसरी चूड पेटविली जात आहे, असं त्याला दिसलं.

आणखी थोड्या वेळानं किनाऱ्याकडचीं पांचचार माणसं समुद्राकडे जाऊं लागलीं. जहाजहि नांगरलं जाऊन स्थिर झालं. जहाजांतल्या खलाशांनीं जहाजावरचा एक छोटा पगार खालीं उतरून पाण्यांत ढकलला. त्यांत दोन माणसं जहाजांतून उतरून बसलीं. पगार थेट किनाऱ्याला लागल्याबरोबर त्यांनीं तोहि नांगरला व वाळूवर उड्या टाकल्या. आणि त्या व या माणसांची कुजबूज सुरू झाली.

ही अपरात्रीची सफर मासेमारीची खास नव्हे, तर दर्यावर्दी चांचे व्यापाऱ्यांची आहे हें तेव्हांच लक्षांत येण्यासारखं होतं. हा अंदेशा येतांच कुणक्याला वाटलं कीं आतां क्षिप्रा कुतरा चुकून भुंकला तर आपण उघडकीला येऊं. बरं त्याचं तोंड हातानं किती वेळ दावून धरणार ? म्हणून त्यानं खांद्यावरच फेडकं फाडून, त्याच्या लांबट चिंधीनं कुत्र्याचं तोंड आवळून बांधलं; आणि दोन्ही टोकं मानेवर आणून कानामागं त्यांची गांठ बांधली. त्या प्राण्याला तो अनुभव नवाच होता. तथापि त्यानं त्याची तक्रार केली नाहीं. कुणक्याचं हृद्गत ओळखूनच कीं काय त्यानं आपली हालचाल कमी केली, आणि आपला धनी जिकडं जाईल तिकडं त्याच्या पाठोपाठ गपचिप जायचं व पायाशीं भिडून राहायचं, असं इमानी धोरण त्यानं स्वीकारलं.

पण कुत्र्याचा हा बंदोबस्तहि कुणक्याला पुरेसा वाटेना. जावं तिकडं कुत्र्याचें सान्निध्य ही त्याला अडगळ वाटूं लागली. अगदीं हवं तसं, अगदीं एकटं, हिंडतां यावं म्हणून त्यानं एका लवचीक वेलीची लांब दोरी काढून तिनं कुत्र्याला जवळच्या एका झाडाच्या बुंध्याला जखडून टाकलं. स्वस्थ, स्तब्ध बसण्याविषयींचे खुणेचे दोन शब्द उच्चारून ममतेनं पाठीवर त्याला थोपटलं, आणि मुसकं घातलेलं तोंड कुरवाळून आपल्या गालाला लावलं. कुत्र्याला या सर्वांचं मर्म कळल्याप्रमाणं तो पाय जोडून खालीं बसला.

आपण आतां पूर्ण एकटे व मोकळे झालों असं वाटून टेकडीवरच्या झाडांच्या आश्रयानं कुणक्या चहू बाजूनं टेहळणी करूं लागला. तेव्हां त्याला दोन गोष्टी दिसल्या. एकीकडं, नांगरून ठवलेल्या जहाजातला माल उतरून तो किनाऱ्याकडं आणणाऱ्या माणसांच्या येरझारा सुरू झाल्या. दुसरीकडं, अनेक चुडी पेटल्या. त्यांच्या उजेडांत एका लाकडी रंगीत देवीच्या प्रतिमेची स्थापना करण्यांत आली असून, जहाजांतून आणलेल्यापैकीं कांहीं थोडा माल तिच्यापुढं नैवेद्यासारखा मांडला जात होता, व

बाकीचा माल कांहीं अंतरावर रचून ठेवण्यांत येत होता. देवीच्या उजव्या हाताला एक म्हातारी स्त्री ध्यानस्थ असल्यासारखी बसली होती.

या स्त्रीचा पदर अस्ताव्यस्त होता. तिच्या कपाळावर या कानापासून त्या कानापर्यंत कुंकवाचा मळवट भरला होता. त्यावर तांदूळ चिकटविले होते. ती उकीडवी बसलेली असून तिनं उजव्या हातांत कवड्यांची माळ घेतली होती. आपल्या गुढघ्यावर टेकलेल्या कोपराला धक्का देऊन म्हातारी ती माळ मागें पुढें हलवी. त्या हालचालींबरोबर ती आपली मानहि मागें पुढें करी आणि तोंडानं मुका हुंकार काढी. एकेका नव्या माणसानं यावं, प्रथम देवीच्या व नंतर या गुरविणीच्या डोक्यावर चार फुलं वाहवीं, मळवटावर थोडं कुंकू फासावं, आणि बरोबर आणलेला जिन्नस नैवेद्या-दाखल पुढें ठेवावा. आणि असं झालं म्हणजे, ती गुरवीण देवीच्या पायाशीं पडलेलं एखादं फूल उचलून घेऊन तें प्रसादादाखल त्या पायपडू भक्ताच्या हातीं देई. समोरच एक भुत्यासारखा, तेलकट आंगरखा अंगभर घातलेला, डोक्यावर कवड्यांनी मढविलेली उभी टोपी घातलेला, मनुष्य बसला होता. तो त्या नैवेद्य ठेवणाऱ्या भक्तासाठीं देवीला गाऱ्हाणं सांगण्याकरितां हात जोडून कांहीं पुटपुटे, आणि देवीनं उलट त्याच्या कानांत कांहीं आशीर्वाद-पर निरोप सांगितला तो ऐकल्याचा बहाणा करून त्याचा आशय तो त्या भक्ताला सांगे.

हा सर्व प्रकार काय असावा हें कुणक्याच्या लक्षांत येण्याला उशीर लागला नाहीं. त्या भागांतील दर्यावर्दी कोकणी चांचे लोकांची ही देवी. तिची पूजाअर्चा केल्यानं चांचेगिरीच्या धंद्याला बरकत येते अशी त्यांची समजूत. पण देवदेवीसुद्धां लुटीच्या चोरीच्या मिळकतींत आपला हिस्सा ठेवतातच! त्याप्रमाणं समुद्रावर लुटून चोरून आणलेल्या मालाचा पहिला नैवेद्य त्यांना समर्पण करावा ही व्यवहारमिश्र धार्मिक भावना भक्तांच्या मनांत दृढ असल्यानं, ते निष्ठावंतपणें आपण होऊन न चुकतां ती पार

पाडीत. मात्र हें देवस्थान कायमचं त्या ठिकाणीं असणं शक्य नव्हतं. जागा निवांत एका बाजूची. पण देवी मांडलेली कुणाला चुकूनहि दिसली कीं इतर लोक तिच्या भजनी पूजनी लागायचे, आणि चांचे लोकांना लागणारा एकांत व गुप्तपणा बिघडायचा. शिवाय तिची नित्य पूजा कुणी करावी ? समुद्रावर शिकार केव्हां साधेल याचा नियम असूं शकत नाहीं. पण ती साधली म्हणजे मात्र गुरवगुरविणींना निरोप येई, आणि ठरल्यावेळीं रात्रीं त्या ही देवी मांडून सजवून बसत. तसाच आजचाहि एक प्रकार होता. अंधारांत आधीं देवी मांडून गुरव वाट पहात बसले होते. पण दुरून जहाज दिसलें तेव्हांच चुड्या पेटल्या, आणि चाच्यांचे साथीदार माल उतरून घेण्याच्या तयारीला लागले.

कुणक्यानं न्याहाळून पाहिलं तों या जमलेल्या मंडळींत सगळेच चेहरे कांहीं अनोळखी नव्हते. दोन तर त्यानें चांगलेच ओळखले. आणि सरखेलांचे विश्वासू म्हणून समजले जाणारे हे इसम या व्यवसायांत कसे याचें त्याला आश्चर्य वाटलें. याशिवाय दुसरा एक चेहरा अनोळखी पण मुद्दाम लक्षांत येण्यासारखा होता. कारण तो इसम कोणी गोरा फिरंगी होता हें उघड दिसत होतं. हा सर्व प्रकार पाहून कुणक्याला दोन कल्पना सुचल्या. स्वतः जाऊन या गर्दीत मिसळावं, आणि देवीच्या पूजा समाप्तीनंतर लुटीच्या मालाची वाटणी कशी होते हें पहावं. पण आपण ओळखले गेल्यास प्राणावर बेतावयाची. हातांत रानवट काठी शिवाय दुसरं हत्यार नाहीं. ते पुष्कळ आणि आपण एकटे. शिवाय आपली गुप्त गुन्हेगारी प्रगट झाल्यामुळं त्यांना राग येऊन साक्षीदार जिवंत सोडूं नये असं त्यांना वाटावयाचं. म्हणून ही धाडसी कल्पना त्यानं सोडून दिली. पण दुसरी एक कल्पना त्याला सुचली. ती थोडी कमी धाडसाची असून, गुन्हेगारांचा पत्ता मुद्दा कळून येण्यास सहाय्य करण्यासारखी होती. इतकंच काय पण ती कुणक्याच्या खेळकर गमत्या स्वभावाला विशेष आवडण्यासारखी होती.

मध्यरात्रीं निर्माण झालेलं हें देवस्थान, आणि चांचे खलाशांनी किना-ऱ्यालगत नांगरलेल्या त्या दोन लहानमोठ्या नावा, यांच्यामध्यें वास्तविक फारसं अंतर नव्हतं. पण कुणक्या जिच्यावर उभा होता ती टेकडी या दोहोंमध्यें दोहोंआड येत होती. नावेंतून उतरणाराला टेकडीला चांगला वळसा घालूनच देवस्थानाकडे जावं लागे. यामुळं हीं दोन ठिकाणं अशारीतीनं एकमेकांना जागच्या जागेवरून दिसण्यासारखी नव्हतीं. आतां नावाकडील ये जा पुरी बंद पडली असून देवस्थानांतलं त्या लोकांचं कार्य संपून त्यापैकीं कोणी नावाकडं येण्यास निघण्याला अवकाश होतासा दिसला. तेव्हां कुणक्यानं क्षणभर विचार केला. लगेच तो टेकडीवरून उतरून समुद्र किनाऱ्याकडं निघाला. आपला कुत्रा झाडाशीं बांधलेला होता तो सोडवून बरोबर घेण्याचं भानहि त्याला राहिलं नाहीं. मागं वळून पहात पहात अगदीं वाळवंटा लगत नांगरलेल्या पगाराशी तो गेला. तिचा छोटा नांगर वर उचलून पगारांत टाकला. आंत हळूच चढला. शेजारी लहानसं वल्ह होतं तें हातीं घेतलं. आणि सपाट्यानं पगार वल्हवीत जाऊन त्यानं ती मोठी नाव गाठली. तिच्यांत कोणी मनुष्य नाहीं हें पाहून त्याला फार आनंद झाला. आणि नावेच्या कडेला धरून त्यानें तींत उडी मारली.

हा छोटा पगार नावेंवर चढवावा तर तो कुणक्याला एकट्याला उचलण्यासारखा नव्हता. म्हणून त्यानं मोठ्या नावेतली एक दोरी घेऊन पगार नावेच्या दांड्याना बांधला. मोठ्या नावेचाहि नांगर ओढून आंत घेतला. आणि सुदैवानं याच वेळीं सोईचा वारा वाहूं लागल्यामुळं त्यानं वल्हं घेऊन नांव चालविण्याऐवजीं शीडच सोडून उभारलं. मात्र किनाऱ्या-जवळून न जातां नावेचं तोंड त्यानं थेट दर्याकडं रोखलं. हेतु हा कीं आपण शक्य तितक्या लवकर किनाऱ्यावरून दिसेनासं व्हावं, आणि मग सावकाशपणे विजयदुर्गच्या किल्ल्यानजीकच्या बंदराला जाऊन लागावं. नाव चालविण्याचं काम वाऱ्यानं संभाळल्यामुळं कुणक्याला आंत हातानं धुंडाळायला सवड मिळाली. तिचा फायदा घेऊन चांदण्याच्या सहायानं

त्यानं खालवर जाऊन उतरून सर्व तपासणी केली. तींत ज्या वस्तु त्याला आढळल्या त्यांवरून त्याची खात्री झाली कीं, या नावेंतून दोन माणसं आलीं. पैकीं एक फिरंगी असून दुसरा कोणी कोळी किंवा भंडारी असावा. नावेंतला बहुतेक माल उतरून घेऊन ती रिकामी करण्यांत आली होती. तथापि एक दोन दिवस पुरण्याइतके खाण्याचे पदार्थ, गोड पाणी, कांहीं व्यापारी जिनसा व एकाद दुसरा कपडा इतकं सामान उरलं होतं.

कुणक्या दर्यात खोल शिरेपर्यंत तर देवीच्या भगतांचं लक्ष त्याच्याकडं गेलं नाहींच. पण तें जातं तरी त्यांना त्याचा पाठलाग करितां आला नसता. चाच्यांच्या दोनहि नावा आटोक्यापार गेलेल्या. पोहून त्याना गांठणें अशक्यच. आणि एखादं तरांडं पाण्यांत घालून त्याकरवीं पाठलाग करावा तर त्या जागीं एकहि तरांडं नव्हतं. व्यापारी तरांडी किनाऱ्याला लागण्यासारखं तें बंदर नव्हतं. किंवा मछीमार कोळ्यांचंहि बंदर नव्हतं. तेथें रिकामं फालतुक तरांडं कोण नांगरून ठवणार ?

कुणक्या दर्यांत गेल्यावर मग किल्ल्याच्या दिशेला त्यानं सुकाणूं फिरविलं, आणि थोड्या वेळांत नुसत्या वाऱ्याच्या सहायानं त्यानं किल्ल्या खालच्या बंदरांत प्रवेश केला. बंदरांत अवेळीं तरांड आल्यामुळं रखवालदारानं त्याला हटकलं. पण सर्व हकीकत सांगून त्याचं समाधान करण्याचं कुणक्याला जड गेलं नाहीं. शेवटीं दोन्हीं तरांडीं नांगरून ठेवून कुणक्या रखवालदाराला म्हणाला, ‘ मी या तराड्यावर रात्र काढणार आहे. तूं आतां आपल्या कामाला लाग. ’ मग तरांड्यांत मिळालेले चाचे लोकाचे कपडे उशाशीं घेऊन त्यानें पाय लांब केले. आणि लगेच झोपीहि गेला असता. पण इतक्यांत त्याला आपल्या सोबती कुत्र्याची आठवण झाली. त्या आवेगान तो उठून बसला !

तो मनांत म्हणाला ‘ अरेरे मी कृतघ्न ठरलों. झिप्र्यानं मला सोबत चांगली केली. असं असतां मीं आयत्यावेळीं त्याची आठवण विसरून

एकटा निघून आलोंना ! आतां मागं त्याचं कसं होईल ? त्याच्या तोंडाला मुसकं घातलं आहे तें एका अर्थी बरंच झालं. कारण तो न भुंकतां निमूटपणं राहिल्यानं त्याची चाहुल कुणाला लागणार नाहीं. उद्यां उठतां-क्षणीं पहिलं काम म्हणजे रात्रीच्या त्या टेकडीकडे जाऊन त्या इमानी प्राण्याला सोडवून आणायचं.' पण इतक्यांत दुसरा एक विचार त्याच्या मनांत आला. 'चाचे लोक परत निघाले म्हणजे आपली तरांडीं अदृश्य झालेलीं पाहून चकित होतील. त्या नावा हुडकण्याचं ठिकाण टेकडी नव्हे खरी, पण या चमत्कारामागं कुणी माणसें आहेत कीं काय याचा शोध तपास सुरू होईल. तेव्हां सहजच ते लोक टेकडीवरहि चढून जातील. आणि झाडाला बांधून ठेवलेला हा कुत्रा पाहून ते काय बरं समजतील किंवा त्याला करतील ? तो न भुंकतां कोणाच्या अंगावर न जातां स्तब्ध राहिला तर निभावून जाईल. पण त्याची खोडो कोणी काढल्यानं तो अंगावर गेला, चावला, ओरबाडलन्, तर हाणामारीपर्यंत पाळी यावयाची. आणि मग-मग—' कुणक्याचं मन चिंतामग्न झालं. त्यानं ती रात्र पडल्यापडल्या पण जागून काढली.

टेकाडांच्या वेढ्यांत निर्माण झालेलं देवस्थान लवकरच विराम पावलें. देवीला नैवेद्य समर्पण केल्यावर दोन कामं उरलीं. तीं म्हणजे लुटीचा माल वाटून घेणं आणि नंतर आनंदोत्सवाकरितां ताडीचीं मडकीं पिऊन संपविणं. पैकीं पहिल्या कामानं काय तो थोडा वेळ घेतला. पण लुटीची वाटणी मतभेदाशिवाय कधीं तरी झाली आहे काय ? चांचे म्हणत 'आम्ही लूट करण्यांत जिवावरचं संकट सोसतों. तुम्ही हलकी किंमत देऊन भारी किंमतीचा माल घेतां आणि खूप नफा मिळवितां.' आड गिऱ्हाइकी घेणारी म्हणत 'आम्हीं तुमचा माल जकात चुकवून आलेला घेतों यांत तरी संकटच पत्करतों कीं नाहीं ? बरं, आम्हीं तो घेतला नाहीं, आणि सरखेलांच्या नाकेबंदींत तो सांपडला तर साराच्या सारा जप्त होईल. त्याचा एक छदामहि किंमत तुम्हाला मिळणार नाहीं

मग काय कराल? म्हणून हलक्या किंमतीला कां होईना, तो मुद्देमाल आम्ही घेऊन फिरून धंद्याच्या सफरीला मोकळे करतों हे तुमच्यावर उपकारच होत.' मधले दलाल आणि चांच्यांना व या घेवाऱ्यांना सामील असलेले सरखेलांच्या नोकरींतले लांचखाऊ जकात नाक्यांचे शिपाई म्हणत, 'आम्हीं तुमची ही गुन्हेगारी पाहून सवरून तिकडं कानाडोळा करतों, यामुळं तुम्हा सर्वांचं रक्षण होतं व धंदा चालतो, म्हणून आमचाहि हक्क तुम्हाला मान्य केलाच पाहिजे.'

( ६ )

आदल्या रात्रीं घडलेली हकिकत दुसरे दिवशीं सकाळीं कुणक्यानं सरखेलांच्या कानावर घातली तेव्हां त्यांना आश्चर्य वाटलं. चांचे लोकांचं तें गुप्त संकेत स्थान, ती देवीची पूजा, दस्तक जकात चुकवून आणलेल्या मालाचा तो व्यापार, देवारी घेवारी यांची ती सिद्धता—सर्व गोष्टी सरखेलांना अकल्पित वाटल्या. त्यांना विशेष खेद वाटला तो याकरितां कीं, आपल्या विश्वासांतली दोन मातबर माणसं या फंदांत सामील!

बंदरांत आणलेल्या गलबतांतला माल सरखेलानी आपल्या समक्ष उतरून घेतल्यावर तो चवाठ्यावर मांडून त्याची चौकशी केली.

त्यांत भागुजी नाईक कोळी आणि धाकल्या यांचेपर्यंत माग गेला. म्हणून सरखेलानी त्या दोघांना बोलावून आणलं. पण ते आले ते त्यांनीं येताना बरोबर एक कुत्रा आणला. त्यानें कुणक्याला पहातांच धाकल्याच्या हाताला हिसका देऊन कुणक्याकडे धांव मारली. तेव्हां भागुजी नाईक म्हणाला 'धनी हा कुत्रा कुणाचा हें आपण पाहिलंच. पण तो काल रात्रीं कुठं होता हें धनी कुणक्याला विचारतील तर बरं होईल. कारण काल रात्रीं घाडणीच्या विहिरीवर समुद्र कांठीं माझ्या नोकराला तो आढळला. तो तिथं कसा गेला? स्वतः कुणक्या घाडणीच्या विहीरीवर होता याचा दुसरा पुरावा कोणता?'

सरखेल म्हणाले 'मग तो कुत्रा तुमच्या नोकराच्या हातीं कसा लागला ? तो कुणक्याबरोबर परत कसा आला नाहीं ?'

भागूजी म्हणाला 'कुतरा झाडाला बांधलेला होता म्हणून तो कुणक्याबरोबर परत आला नाहीं.'

'तो झाडाला कुणी बांधला ?'

'त्याच्या धन्याशिवाय असल्या चावऱ्या कुत्र्याला दुसरं कोण बांधूं शकेल ?'

'मग कुणक्यानं बांधला तर त्यानंच तो सोडून आपल्याबरोबर परत आणला नसता काय ?'

'चोरीचा माल होडींत घालून बंदराकडं यायची त्याला घाई झाली म्हणून तो कुतऱ्याला विसरला दुसरं काय ?'

'पण असला चावरा कुतरा जसा धन्याशिवाय दुसऱ्या कुणाला बांधूं देणार नाहीं तसा तो दुसऱ्या कुणाला सोडूं हि देणार नाहीं !'

'तसं नव्हे धनी. आपला मालक समोर नसल्यावर कुत्रे परक्याला अंगाला हात लावूं देतात. त्यांतून तो सुटका करून घ्यायला उतावळा झाला होता. तेव्हां त्याला सोडणारा त्याचा त्या वेळीं उपकारी मित्रच. पण आतां त्याचा धनी समोर आल्यावर माझ्या नोकराला तो हात लावूं देतो कां पहा !'

इतक्यांत कुणक्या आपण होऊन पुढं होऊन म्हणाला—

'पण धनी मी काल रात्रीं घाडिणीच्या बावीवर गेलों होतों हें नाकबूल करीन तर ना त्याबद्दल माझ्या कुतऱ्याचा पुरावा ? भागूजीबुवा सांगतात तें तितक्यापुरतं खरंच आहे धनी. माझ्याबरोबर मी कुत्रा नेला होता. आणि चोरटे लोकांची चाहूल मला लागली तेव्हां मोकळेपणी

एकटं हिंडायला सापडावं, आणि कुत्रा भुकल्यानं माझी चाहूल चोरट्यांना लागूं नये, म्हणून मी त्याच्या तोंडाला मुसकं बांधून टेकडीवरच्या झाडाला बांधून ठेवला. पण खालीं किनाऱ्यावर उतरल्यावर चोरांचं गलबत हातीं लागलं त्यावर चढून तें या बंदरांत आणण्याची घाई मला होती. म्हणून मी कुतऱ्याला तसाच टेकडीवर बांधलेला ठेवून आलों धनी ! चोरीच्या मालाची विक्री वाटणी करून परत यायला निघाल्यावर त्यांना गलबत नाहींसं झालेलं दिसलं. तेव्हां हे चहूंकडं शोध करूं लागले त्यांत माझा कुत्रा त्याना आढळला. त्याला सोडून ते घेऊन आले. तो माझा कुत्रा हें यांना माहीत होतं. आणि त्यांच्यावर आलेल्या आरोपांत मीच गुन्हेगार आहे असं दाखविण्याकरितां त्यांनीं माझा कुत्रा माझ्याविरुद्ध पुरावा म्हणून पुढं केला धनी ! '

मग कुतऱ्याचा मुद्दा सोडून देऊन सरखेल म्हणाले ' नाईक कुतऱ्याचा मजकूर आला माझ्या ध्यानांत. कुणक्या घाडणीच्या विहिरीकडं गेला होता म्हणूनच त्याला चोरांचं गलबत नांगरून ठेवलेलं दिसलं आणि त्यानं तें इकडं आणलं. पण त्यांतला हा माल बाहेर काढून मांडला आहे त्याबद्दल तुम्ही काय म्हणतां बोला ! '

यांतला कांहीं माल असा होता कीं तो कोणाचाहि म्हणतां येईल. पण कांहीं असा होता कीं तो कुणाचा याविषयीं वादच होऊं शकणार नाहीं. प्रथम आधीं गलबत. तें विजयदुर्गपैकीं नाहीं हें भागूजी नाइकानं आपण होऊन कबूल केलें. बंदरांतल्या सगळ्या जहाजा गलबातांना परवाने देण्याचं आणि हाशील वसूल करण्याचं काम भागूजी नाइकाकडं सारखेलानीं दिलेलं होतं. यामुळं हें चोरीच्या मालाचं गलबत परकं आहे हें त्याला कबूल करणं भागच पडलं. पण त्यानंतर त्यांतून एकएक माल बाहेर निघूं लागला त्यावरनं आदल्या रात्रीच्या चोरट्या प्रसंगांत कोण कोण सामील होतं हें आपोआप उमगूं लागलं. प्रथम परदेशी दारूच्या दोन बाटल्या निघाल्या. कोकणी लोक आगरी कोळी भंडारी दारू पितात

तरी ते ती मडक्यांतली पितात. फिरंग्याशिवाय परदेशी दारू नाहीं आणि बाटल्याहि नाहींत. मग फिरंग्यांच्या अंगचे एक दोन कपडे आणि एक डोक्याला घालण्याची शिपतरी टोपी निघाली. त्यावरून रात्रीचे चोरटे या गलबतांतून आले ते फिरंगी चांचे किंवा निदान दस्तक परवाना न घेतलेले गोरे व्यापारी होते हें सिद्ध झालं.

तेव्हां सरखेल म्हणाले ' काय नाईक ? फिरंग्यांच्या या गलबतानं हाशील भरून या बंदरांत व्यापार करायचा माझा परवाना काढला आहे काय ? त्यावर तुमच्या परवान्याची खूण तुमच्या ओळखीची असायला हवी ती आहे काय ? आणि घाडणीच्या विहिरीकडं हें नवं बंदर कधीं पासून उघडलं गेलं ? तें दिवसा कधी कुणाला दिसत नाहीं. मग त्याच्या उलाढालीला रात्रींच कसा मुहूर्त लाभतो ? या गलबतांतून व्यापारी माल भरून आणला असावा असं उघड दिसतं. मग तो रात्रीच्या रात्रीं कसा कुठं गेला ? '

कुणक्या पुढें होऊन म्हणाला, ' पण धन्याच्या पायाची शपथ घेऊन मीं सांगतों कीं, काल रात्रीं घाडणीच्या विहीरवर भागूजी नाईक आणि धाकल्या या दोघांनाहि या डोळ्यानीं मीं पाहिलं. आणि माल रात्रीच्या रात्री कुठं गेला असावा याचाहि तर्क मी केला आहे. धन्यानी आपला विश्वासू माणूस माझ्याबरोबर द्यावा म्हणजे मीं त्याला बरोबर घेऊन जातों अन् पत्ता मुद्दा काढतों.'

सरखेलांना ही सूचना योग्य वाटली. पण भागूजी व धाकल्या यांना मोकळे सोडले तर कुणक्याच्या तपासांत बिघाड व्हायचा हें ओळखून ते म्हणाले 'नाईक, तुम्ही अन् धाकल्या दोघांनीं मजबरोबर किल्ल्यांत कोठी-कडं आलं पाहिजे. आजचा सारा दिवस माझ्या डोळ्यासमोरून हालतां कामा नये. विश्वासु माणसानी दगा देणं म्हणजे मांडीवर ठेवलेली मान कापणंच होय. कुणक्या ज्या आत्मविश्वासानं बोलला त्यावरनं मी काय तो कयास

मनाशीं केलाच आहे म्हणा. पण पुरावाच पुढं आला म्हणजे मग मला अधिक बोलतां येईल. एरवीं एखाद्या बाबींत तुमची लोभबुद्धि दिसून आली असती तर मीं तिकडे कानाडोळा केला असता. पण तुमच्या कालच्या कृत्यावरून असं दिसतं कीं, घाडणीच्या विहिरीवर झालेला प्रकार कालच प्रथम झालेला नसून तो बरेच दिवस चालू असावा. आणि तसं असेल तर माझ्या बंदरी व्यवस्थेचा उच्छेद माझ्याच अधिकाऱ्यानं केला असं होत नाहीं काय ? माझ्या राज्यव्यवस्थेतलं हें भगदाड पाहून मला लाजेनं खालीं मान घातली पाहिजे. मी नुकताच त्या गोऱ्या फिरंगी वकीलाशीं कोणत्या आढ्यतेनं बोललों, चांचेगिरीच्या आरोपाला किती विरोध केला, आणि आज पहातों तों माझ्याच एका अधिकाऱ्यानं फिरंग्याला सामील होऊन केलेली ही चांचेगिरी मला आढळली. तेव्हां धिःकार असो मला !'

इतकं बोलून सरखेल रागानं लाल होऊन पाय आपटीत आपल्या कोठीकडं गेले. भागूजी व धाकल्या यांच्यावर त्यांनीं प्रत्यक्ष पहारा बसविला नव्हता. परंतु त्यांनीं पूर्वीं केलेला हुकूम ध्यानांत असल्यामुळं ते दोघेहि मान खालीं घालून सरखेलांच्या मागोमाग त्यांच्या कोठीकडे चालू लागले.

# ( ५ ) अवतार समाप्ति

## १

अवशीच्या रात्रींचं भर चांदणं. समुद्र शांत. अगदीं एखाद्या तळ्यासारखा. वारा शीतळ व थोडा मंद, पण शिड अवजार निर्मीशिमी भरण्याइतका. तात्पर्य, गलबत आपोआप वाट चाल्त आहे. त्याच्याकडे लक्ष देण्याचं कारण नाहीं म्हणून कुणाला वेगवेगळें काम नाहीं. जेवणहि होऊन गेलेलं. आणि अजून डोळ्यांत झोंप येत नाहीं. अशा वेळीं दर्यावर्दी खलाशी गलबताच्या रुंद तोंडाकडच्या बाजूला तखतावर एकत्र बसतात. आणि वेळ मजेनं जाण्याचं सुलभ साधन म्हणून गोष्टी सांगण्याच्या पाळ्या करतात. मधून मधून चिलम पेटविली जाऊन झुरके मारण्याच्या पाळ्याहि होत असतात. श्रम व साहस करणाराना अशी शांत व रिकामी वेळ म्हणजे तो सोन्याचा प्रहर नव्हे का ?

आज विजयदुर्गलगतच्या समुद्रावर ' वेताळ ' गलबतावरील कोकणी खलाशी असेच एकत्र बसून गप्पा गोष्टी करीत होते. कुणक्याच्या हातीं सुकाणूं असल्यामुळं तो मागच्या टोकाला एका रुंद व उंचशा फळीवर बसला होता. जसा कांहीं व्यासपीठावरचा पुराणीक. पण गलबताचा वेग फुकट जाऊ नये म्हणून, सुकाणूवर हात ठेवून गलबताच्या दिशेकडे लक्ष पुरविण्याचं महत्त्वाचं काम त्याच्याकड होतें. यामुळें तो पुराणिकाच्या जागीं असतांहि त्याला स्वतः गोष्टीं सांगण्यांत लक्ष गुंतवितां येत नव्हतं. म्हणून पुराणिक व्यासपीठावर बसून ऐकतो आहे, आणि श्रोतेच पाळी पाळींनं पुराण सांगताहेत असा गमतीचा प्रकार सुरू होता. मात्र कोणी सांगितलेल्या गोष्टीवर मार्मिक टीकेचा एखादा वेचक शद्व बोलणं, मधून मधून हंसून उत्तेजन देणं, किंवा हुंकार भरणं या गोष्टी कुणक्या करी. कारण त्याचं लक्ष कांहीं सुकाणूंवर असलं तरी कांहीं या सवंगड्यांच्या गोष्टींत रमल्याशिवाय कसं राहील ! गोष्टींची मोहनीच अशी असते.

गोष्ट सांगण्याची पाळी आली म्हणजे ती पार पाडणं हाच पराक्रम. गोष्ट येत नाहीं म्हणणं ही नामुषकी! म्हणून कोणी आठवणीनं खरी अनुभवाची सांगतो तर कोणी कल्पनेनं रचून नवी खोटीहि सांगतो. पण येऊन जाऊन वेळ जाण्याकरितां करमणूक. त्यांत खरं काय खोटं काय? खोटी गोष्ट रचून सांगण्यांतच प्रतिभेची खरी चमक दिसून येते. पण प्रतिभेचं हें वरदान सर्वांनाच असतं असं नाहीं.

असो. गोष्ट सांगण्याची पाळी ठरविण्याचं काम कुणक्याकड होतं. त्यानं प्रथम जान्याला आव्हान केलं. जान्या सगळ्यामंडळींत लुच्चा. जिभेनं थोडा बोबडाहि होता. त्याला बोलायला लावणं हीच एक विशेष करमणूक होती.

जान्यान गोष्ट सांगण्याला प्रारंभ केला. तो म्हणाला–'ऐका लेकाहो, झाली असतील तीन चाल वलस. आपल सलदाल गलबत होतं नाहीं का? त्याच्यावल सल तांडेल धलमा दळवी म्हणून नव्हता का? त्याच्या हाता-खाली मीं तांडेल होतों.'

तें ऐकून सख्या हासून म्हणाला, 'काय लेकाचा म्हणे तांडेल होता! कोण याला नेमतो तांडेल? असेल एक खलाशी झालं. दिलं असेल याच्याकडं काम दोऱ्या वळायचं अन् तखताच्या फळ्या धुवापुसायचं.'

'जाऊंदे रे सख्या' कुणक्या म्हणाला 'उगीच मध्यें काय बोलावं?' जान्या असेल खलाशी नाहीं तर अगदीं सर तांडेल. त्याशीं काय करायचं आपणाला? सांगरे जान्या आपली गोष्ट पुढं.'

जान्या म्हणाला 'अशी कालतिकाची अमोस्या असल. संध्याकाळची वेळ. सल तांडेल मला कस म्हणतात? जान्या, लेका जान्या, चला आपण गलबत घेऊन शिकारीला जाऊं. मी म्हटलं हूं. अन् मग निघालों न् काय? वारा उगवतीचा होता. झालं. शिडं उभारली. अन् चाललों मावळतीकडं. जोल-गत तुफान. लाट म्हणजे ही एक एक!'

‘ शाबास लेका जान्या. संध्याकाळ अन् उगवतीचा वारा ! तसाच अमोस्याला संध्याकाळीं भरती असती रे लेका ! बरं बोल फुडं. ’

‘ मी धलल सुकाणु हातात ’

‘ अन् सर तांडेल वल्ही मारीत असतील नाहीं ? ’ डाम्यानें विचारलं, सर्व हसूं लागले.

‘ गेलों गेलों अगदीं समुद्लाच्या पोटांत दोन कोस ! इतक्यांत काय झालं ? ’

‘ हां हां सांग सांग. शिकारीची वेळ झाली. ’

‘ नाळीच्या बाजूला गलबताची पाठशिवणी कलीत एक सुसल येऊं लागली. अबब केवढीं मोठी होती पण ! तिला पाहून सल तांडेल फालच भ्याला. मला म्हणाला ‘जान्या लेका अतां कसंले कलतोस ? सुकाणू सोडून दे आणि तकतावरन खाली आत उडी घे.’ मी मनांतन भ्यालों. पण म्हणालों ‘गप बसा सर तांडेल साहेब. मी दाखवतों या सुसलीला हात. ती येऊंदे तरी अवसानांत. म्हणजे देतो तडाखा सुकाणाच्या फळीचाच. जाईल मरून तवाच.’

‘ अन् मग ?’

‘ अन् दिला तडाखा न काय ? मग ती सुसल मेली असं म्हणून शीड सैल करून गलबत जला थांबवलं. सलतांडेलहि भीत भीत जवळ आले. दोलीचा केला फास. अन् दिला फेंकून तिच्या मानेवर. अन् ओढूं लागलों तों हलकी लागली हाताला ! अन् वर ओढून घेतलं ओझं. पण काय ?’

‘ काय, काय झालं ’?

‘ अले कसली सुसल अन् कसलं काय ! माझंच कांबळ बावखडीवलनं खाली पाण्यांत पडलं माझ्या कोपल्याच्या धक्क्यानं. पण खुंट्याला टोक अडकून ओढत येत होतं मागून. तचि वाटली सुसल अन् काय ?’

‘बरा लेका भाग्याचा तूं जान्या. नाहीं तर तुला सुसल खाऊन टाकायची. अन् अमोस्येदिशीं संध्याकाळची जोरगत अन् संध्याकाळीं पूर्वेचा वारा सांगून आमाला मूर्खांत काढायला तूं नव्हतास उरायचा.’

‘अल माझ्या बायकोचं कुंकू आहे तसंच बळकट. पण फुडं झालं काय झाय का माहित लेकाच्यां हो?’

‘तें काय?’

‘सुसलीला पाहून मीं भ्यालों नाहीं अन् आपुन मातर भ्यालों असं आलं का ध्येनांत सल तांडेलाच्या? तवा त्याना वाटली लाज. त्याना आला लाग. अन् दुसल्या दिसापासून त्यानीं माझी तांडेलगिरी काढून घेऊन पुन्हा केला खलाशी. तेव्हां मी मनाशीं म्हणालों देवाला पाप कसं खपल?’

‘कां, यांत पाप काय झालं?’

‘अल पाप न्हव तल काय? म्यांच क्येली व्हती ना कुचेष्टा! सल तांडेलपणा गाजवतो, पण लेकाचा मनांतन आहे बायक्या भित्रा. म्हणून म्हटलं करावी एकदां गंमत त्याची. मीच कांबळ खालीं पाडलं होतं ना आपल्या हातानं.’

सर्व जण हंसू लागले! कुणक्या म्हणाला, ‘आतां सख्या तुझी पाळी.’ पण रिकामटेकड्या खलाशांच्या गोष्टी कधींच संपत नसतात म्हणून त्या सोडून देऊं.

अशा रीतीनं आज हे खेळगडी आनंदानं करमणूक करण्याला बाहेर पडण्याचं कारण म्हटलं म्हणजे, सरखेलानी कुणक्याला दहा गलबतांच्या एका तांड्याचा सर तांडेल करण्याचा बेत जाहीर केला होता. घाडणीच्या विहिरीवरच्या प्रसंगामुळं सर खेलांची भागूजी नाइकावर जितकी नाराजी झाली तितकीच कुणक्यावर पूर्वीहून अधिक मर्जी बसली. त्यांनी भागूजी

नाइकाला फार मोठी शिक्षा केली नाहीं किंवा त्याचा हुद्दा काढून घेतला नाहीं. याचं कारण त्यांची अशी खात्री झाली होती कीं, ते पुष्कळसे दुसऱ्याच्या तंत्रानं चालणारे व दुसऱ्याच्या बुद्धीनं वागणारे होते. परंतु त्याच्या उलट कुणक्या वयानं अनुभवानं लहान असला तरी तो सर्व व्यवहार स्वतंत्र बुद्धीनं करितो, आणि पुढं मागं सगळ्या आरमाराचा सर तांडेल होण्याला योग्य आहे, अशी त्यांना खात्री वाटूं लागली होती. पण ती मोठी कामगिरी सांगण्याला प्रारंभ म्हणून प्रथम त्यांनी त्याला दहा गलबतांपुरता तांडेल करण्याचं ठरविलं होतं.

(२)

उद्याचा दिवस कुणक्याच्या आयुष्यांत मोठा भाग्याचा असें सर्वजण म्हणूं लागले. कारण सरखेलानी ज्या गलबतावरची तांडेलकी कुणक्याला देण्याचें ठरविलें होतें त्याची देव प्रतिष्ठा आज होणार होती आणि ती झाली म्हणजे त्याच समारंभांत कुणक्याची सर तांडेलकी जाहीर व्हावयाची होती. तांडेलकीचा हुद्दा जसा मोठा तसं त्या मानानं त्याच्या ताब्यांत देण्यांत येणारं नवं गलबत ही मोठं असणं ओघानंच प्राप्त होतं. कारण सर तांडेलाच्या हाताखालीं जसे अनेक तांडेल म्हणजे दुय्यम अधिकारी त्या प्रमाणं या गलबताच्या दिमतीला अनेक लहान सहान गलबतं नावा वगैरे देण्यांत येणार होत्या.

सर तांडेलाच्या गलबताचं नांव ‘ शंकर ’ असं ठेवण्यांत यावयाचं होतं हे सर्वांना आधीं कळून चुकलं होतं. आणि शंकराचा परिवार म्हणजे भुतावळ किंवा पिशाच्चगण असावयाचे, म्हणून कोणत्या लहान गलबतांचा समावेश या भुतावळींत होणार, कोण कोण खलाशी या पिशाच्चाच्या यादींत दाखल होणार, याविषयीं कुणक्याच्या मित्र-गणांत आधींपासून चर्चा व विनोद चालू होता. कुणक्याच्या मर्जीतले सख्या दाम्या हे त्याचे सोबती या भुतावळींत समाविष्ट व्हावयाचे हे ठरल्यासारखंच होतं. अधिकारांत स्नेहाची भर पडली तर वरिष्ठ कनिष्ठांचा जम चांगला बसतो आणि

काम बिनबोभाट होतं. इतर कित्येक तरुण मुलं कोळी–भंडारी जातीची कुणक्याचीं चाहतीं होतीं, कुणक्या पराक्रमी आहे, तो स्वतः नांवारूपाला चढेल, आणि आपणा बरोबरच्या लोकांनाहि नांवारूपाला चढवील, अशी त्यांची खात्री असल्यामुळं, जमल्यास या नव्या सरखेलाच्या हाताखालीं आपली नेमणूक किंवा बदली व्हावी अशी त्यांतल्या त्यांत कांहींची खटपट सुरू होती.

पण या जगांत नेहमी असं अनुभवाला येतं कीं, कोणा एकाची विशेष प्रतिष्ठा वाढणं हें इतर कांहीना अप्रतिष्ठा असं वाटल्याशिवाय रहात नाहीं. मग कोणी त्यांची अप्रतिष्ठा जाणूनबुजून न करो. अधिकाराच्या जागेवर कोणत्याहि खात्यांत एखायाची नेमणूक होतांना, गुप्त स्पर्धा व मत्सर इतर कांहींच्या तरी मनांत वावरूं लागतोच. आज कुणक्याचा खरा प्रतिस्पर्धी, पराक्रमाच्या किंवा खलाशीपणाच्या गुणांत, त्याच्या वयाचा दुसरा कोणी नव्हता. वयं सारखीं असलीं म्हणून कर्तृत्व सारखं कुठं असतं? पण आपलं वैगुण्य माणसाला कळेल तर अन्यायाचे खोटे आरोप पुष्कळ टळतील.

या दृष्टीनं पाहातां कुणक्याला प्रतिस्पर्धी नसावा. पण धाकल्यानं स्पर्धेचा विडा उचलला होता. त्याचा हक्क येऊन जाऊन वडिलकीच्या मानाच्या परंपरेचा. सर खेलांच्या दुय्ययपणाचा मान भागुजी नायकाकडे होता. आणि धाकल्या हा भागुजी नायकाचा मुलगा. याहून सर तांडेल-कीचा मान व अधिकार मिळण्याला त्याला दुसरी कोणती पात्रता लागावी? सर खेलांच्या नजरेला कुणक्या प्रथम घातला तो आपण. अर्थात् या उपकाराबद्दल जन्मभर त्यानं आपणाला कृतज्ञ राहिलं पाहिजे असं कुण-क्याच्या मनानं घेतलं होतं. मग आपल्या करामतीनं व कर्तृत्वानं तो आपणाला मागं टाकून गेला म्हणून काय झालं !

पण स्वतः सरखेल हे खरे माणूस पारखी होते. भागुजी नाईक हा त्यांचा बाळपणचा मित्र. शिवाय थोडा लाघवी व खुशामती म्हणून ते त्याला आपल्या कृपेंत ठेवीत. वरकरणी त्याचा मान ठेवीत. पण खऱ्या

कर्तृत्वाचीं, पराक्रमाचीं, कामं निघालीं म्हणजे ते तीं लायकी पाहून इतरांना सांगत. अशा गोष्टींत वतनदारी चालू देणारे ते नव्हते. बाप कृपेंतल म्हणून मुलगाहि त्या नात्याच्या हक्कानें आपल्या कृपेंत घेण्याला ते तयार नव्हते. आपल्या मित्राचा मुलगा म्हणून धाकल्याशीं ते किंचित् सढळपणा दाखवित. परन्तु कुणक्या हा त्यांच्या दृष्टींत भरला तेव्हा तो पोरका गोसावी असूनहि, त्याची गुणपरीक्षा त्यांनी बरोबर करून त्याला क्रमानें बढती दिली होती.

पूर्वीं वर्णन केलेल्या घाडणीच्या विहिरीजवळील बंदरांतील प्रकारापासून सरखेलांचं मन भागुजी नाईकावरूनहि उडत चाललं होतं. आपल्या कृपेंतल्या माणसानं विश्वासघात करावा, दगाबाज व्हावं, किंवा निदान नियमभंगाचा अपराध करावा, या गोष्टीचा सरखेलाना फार राग आला होता. आणि जुनी चालत आलेली कृपा होती व गुन्ह्याचा पदर खुद्द भागुजीपर्यंत पोचावा तितका स्पष्ट पोचण्याइतका पुरावा नव्हता, म्हणूनच त्यांनीं गय केली. नाहींतर सरखेलांच्या रागी स्वभावाचा तडाखा त्याला सोसावा लागला असता. पण स्वतः भागुजींच्या मनालाच त्याचं पाप खात होतं. यामुळं सरखेलानी प्रत्यक्ष कडक शिक्षा केली नाहीं तरीं ती झाल्याप्रमाणें तिचे घाव त्याच्या मनावर होत होते. यांत सरखेलावर रागावण्याचं कारण नव्हतं. यांत त्यांची कांहीं चूक नव्हती. उलट त्यांनीं कांहीं केलं असलं तर शिक्षेचा हात आवरला. म्हणून खुनशीपणाला कारण नव्हतं.

पण आपल्या मुलाला सरतांडेली देऊन आपला मान करावयाचा तो सरखेलानी केला नाहीं याचं भागुजी नाईकाला वाईट वाटलं. आणि अशा असमाधानाची प्रतिक्रिया गुप्तरूपानं मनांत व्हावयाची ती झाली.

धाकल्याला तर कुणक्याचा राग येण्याला याहून प्रबळ कारण होतं. तें म्हणजे रतनविषयक प्रेमाची स्पर्धा. या प्रेमांत कुणक्यानं विजय मिळविला नसता तर, आपल्या हातुन सर तांडेली गेली याचं त्याला तितकंसं वैषम्य

वाटलं नसतं. कारण तो तसा महत्वाकांक्षी नव्हता. पण प्रेमांतील महत्वाकांक्षेला व स्पर्धेला अन्त नसतो. भरींत भर म्हणून कुणक्याचे स्नेही धाकल्याची उघड थट्टा करू लागले. सख्या व डाम्या हे तर थट्टेबाजपणांत चतुर; यामुळं धाकल्याला न कळेल अशा रीतीनं ते त्याला हास्यास्पद करीत. एकानं त्याचा पक्ष घेऊन बोलावं, आणि तसं झालं म्हणजे दुसऱ्यानं त्याची प्रतिक्रिया म्हणून थट्टे थट्टेनं त्याची खूप निन्दा करावी, असा प्रकार चाले.

उलट कुणक्याचा हेवा मनांतून करणारे धाकल्याचे स्नेही-सोबतीहि कांहीं होते. त्या सर्वांनीं मिळून कुणक्याला कोणत्या रीतीनं अपकार करतां येईल याचा विचार चालविला होता. पण त्यानीं तो बाहेर न दिसूं देण्याचीही खबरदारी घेतली होती. पण आता कुणक्याला सर तांडेली देण्याचे सरखेलानीं ठरविल्यामुळं मत्सराचा व द्वेषाचा कळस झाला.

पण मनांत द्वेष उदभवला तरी तो सफल करण्याची समर्पक युक्ति सुचण्याला बुद्धीची जोड लागते ती सर्वांना सारखी नसते. कुणक्याचा नाश करण्याच्या अनेक युक्त्या करून पाहण्यांत आल्या होत्या. त्याच्य गलबतांत बसून जाऊन विश्वासघात करून ठार मारण्याचा प्रयत्न झाला. त्याला पकडून फिरंगी लोकांकडे गुलाम म्हणून विकण्याचा प्रयत्न झाला. त्याच्या गलबताला आग लावण्याचा प्रयत्न झाला. पण ते सर्व प्रयत्न फसले. उरले प्रयत्न म्हणजे सरखेलाचं मन कुणक्याविषयीं कलुषित करण्याचे. पण अपघाताच्या म्हणजे स्वाधीन गोष्टी जेथें फसल्या तेथें परस्वाधीन गोष्टी कशा यशाला जाणार ?

भागुजी नाईकानं आजवर कुणक्याच्या कागाळ्या तिखटमीठ लावून, बनावट रचून, सरखेलाना किती तरी वेळां व किती निरनिराळ्या प्रकारांनीं सांगितल्या असतील ! परन्तु सरखेल हे हलक्या कानाचे नव्हते. आणि त्यांचा कुणक्याशीं जो संबंध आला त्यांत त्याचें गुणच त्यांच्या नजरेला अधिकाधिक पडत होते. यामुळं पुष्कळशा कागाळ्या त्यांनी मनावर

घेतल्याच नाहींत. कांहीं घेतल्या त्यांत चौकशीअंतीं कुणक्याचीच बाजू न्यायाची ठरली. आणि एकदोन वेळां कुणक्यावर जरी बाजू घसरली असें त्यांच्या न्याय बुद्धीला वाटलें; तरी एकंदरींत त्याची योग्यता लक्षांत घेऊन, आणि उत्तम स्वभावाच्या शीलाच्या मनुष्याकडूनहि एखादी लहानशी चूक होणं शक्य असतं असं म्हणून, त्यांनी त्याला क्षमा केली होती.

पण जागल्या दुष्ट बुद्धीला नव्या युक्त्या सुचूं शकतात. उद्यां कुणक्याच्या नावानं बांधलेल्या गलबताची देव प्रतिष्ठा होऊन त्यावर शीड चढविण्याचा समारंभ होणार ही कल्पना लक्षांत येतांच, धाकल्याचा एक सोबती यमाजी कोळी त्याला एका बाजूला घेऊन गेला आणि त्यानं त्याच्या कानांत कांहीं मंत्र सांगितला. तो पटून ते दोघे खाडीच्या वरच्या अंगाला वाडींत कमळ्या सुतार रहात होता त्याच्याकडे गेले.

विजयदुर्गच्या गोदींत गलबतं बांधण्याचं काम चाले तें कमळ्या सुताराच्या देखरेखीखालींच चाले. तोच स्थानिक सुतारांचा मुकादम. एक गलबत बांधण्याला पुष्कळ सुतार लागतात. पण नाळीच्या बाजूचा बावटा आणि मध्यभागी उभारण्याचं मुख्य शीड हीं गलबताचीं मुख्य अंग समजलीं जातात. त्याची कारागिरी सर्वांत शेवटीं पुरी होते. आणि ती आपल्या हातानं पुरी करून प्रसादाचा पहिला नारळ मिळविण्याचा हक्क मुकादमाचा असतो. तो कमळ्या सुताराला होता.

तें काम उद्यां व्हावयाचं म्हणून घरबसल्या रिकाम्या वेळीं रात्रीं कमळ्या सुतार आपली हत्यारं धार लावून पुसून घासून साफ करीत होता. बावटा उभा करण्याच्या चौकटीची, म्हणजे पिंजरीची, शेवटली फळी ठोकणं आणि मुख्य डोलकाठीच्या खांबांत तळच्या रूंद भागांत कोरून लहानशी खांच पाडून त्यांत देवीच्या आकाराची मूर्ति ( अर्थात् ओबड धोबडच ) करून बसविणं हीं गलबताचं बांधकाम करण्याचीं शेवटचीं कामं समजलीं जातात. त्यांना मुहूर्त पाहातात, आणि तीं करण्याच्या वेळीं मुख्याधिकारी हजर

राहतात. त्यांच्या हातून मानाचा नारळ दिला जातो. त्याप्रमाणं उद्यां स्वतः सरखेलहि या समारंभाला हजर राहणार होते.

धाकल्या व त्याचा स्नेही यमाजी कोळी हे हळूच चोरासारखे पाय न वाजवितां कमळ्याच्या झोपडीशीं गेले. एकानं बांबूच्या फाटकाला तोंड लाऊन हल्क्या आवाजान कमळ्याला हांक मारली तेव्हां तो बाहेर आला. मग ते तिघे गोठ्यांत जाऊन जागा झटकून बोलत बसले.

यमाजीन हळूच प्रस्तावना केली. त्यान कृत्रीम आवाज काढून ढोंगी-पणाच्या उघड बतावणीनं कमळ्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलं, 'कमळ्या गड्या, तूं मोठा भाग्याचा दिसतोस.' त्यावरून मग संभाषणाला सुरुवात झाली.

'मी आणि भाग्याचा ?'

'होय नाहींतर काय ? उद्यां शंकर गलबताची पूजा व्हायची. आणि तें पाण्यांत लोटायचं. आजवर एवढं मोठं गलबत या गोदींत तुझा हातनं कधीं बांधलं गेलं होतं काय ?'

'नाहीं खरंच. पण सर खेलांची सद्दीच वाढती आहे त्याप्रमाणं गोदींत बांधायचीं गलबतंहि एकाहून एक मोठीं असणारच.'

'सरखेलांची सद्दी वाढती असो रे ! आणि आम्हाला तरी दुसरं काय हवं ? पण हें गलबत सर तांडेल म्हणून हुकमतीला कुणाच्या हवालीं होणार याचा तूं विचार केला आहेस काय ?'

'होय. ते त्या नव्या पोराच्या, कुणक्याच्या, हातीं सरखेल देणार असं ऐकलं आहे.'

'मग ही गोष्ट तुला कितपत पसंत आहे ?'

'हां, तूं म्हणतोस तें लक्षांत आलं. सरखेलांची बुद्धी चळली. जुने मातबर खलाशी त्यांनी दृष्टीआड करून हा नवा तरणा पोर हातीं धरला

त्यांत त्यानी काय पाहलं ? हा धाकल्या, याचा बाप किती जुना खलाशी! पण अलिकडं नसतं कुभांड रचून त्यांना सरखेलानी घरीं बसविलं.'

आपल्याला ही सहानुभूतीची जागा पाहून धाकल्यानं उदासपणाचा सुस्कारा सोडला. पण पोटांत शिरून बोलण्याचं चातुर्य त्याच्या अंगीं नव्हतं. तें काम यमाजीनं केलें.

'अरे, या नव्या पोरानं धाकल्याच्या बापाची तशी वाट लावली. आणि धाकल्याचा तरी त्यानं थोडा घात केला?"

'तो कसा काय यमाजी? त्याचं नाहीं मला ठाऊक.'

'अरे असं पहा, हें गोसाव्याचं पोर आड आलं नसतं तर आज धाकल्याचं नि रतनचं लग्न केव्हांच होऊन जायचं. पण कुणक्यानं घात-लान बिब्बा त्याच्या वाटेंत! असं तो आणखी कुणा कुणाचं नुकसान कर-णार आहे देव जाणे!'

स्वतःचं नांव निघालेलं ऐकून धाकल्यानं उदासपणाचा आणखी दीर्घ सुस्कारा सोडला.

यमाजी म्हणाला, 'मग कमळ्या, तुला हें सगळं मानवतं काय?'

हें ऐकून तो सुतार मोठ्यानं हसूंच लागला. म्हणाला, 'अरे काय वेड्या-सारखं विचारतोस मला यमाजी! मी काय सरखेलांचा कारभारी आहे म्हणून त्यांना दोन गोष्टी सांगूं! नाहीं तर त्या ब्रह्मेंद्रबुवासारखा त्यांचा गुरु आहे म्हणून त्यांना आवरूं? कां सातारचा छत्रपति आहे म्हणून सर खेलाना हुकूम देऊं? त्यांचं करणं मला पसंत नसलं काय असल काय दोन्हीही सार-खंच. मला आपलं वाकस–किंक घेऊन गलबताचं बांधकाम करायचं कळतं. त्या गोसाव्या पोराचा मला मनांतनं किती तरी राग येतो. विजयदुर्गच्या सगळ्या लोकांच्या डोक्यावर त्यानं मिरीं वाटायचं काम चालविलं आहे.

पण मी पडलों नुसता सुतार कारागिर. फार तर सुतारांचा मुकादम. गलबत बांधण्याचं काम माझं. पण गलबत बांधल्यावर तें कुणाचं होणार, त्याचा अधिकारी कोण होणार हे घेऊन मला काय करायचं ?'

'तूं वेडा आहेस कमळ्या ! अरे, त्या पोराचा कांटा काढायचं तुझ्या मनांत असलं तर तूं सरखेलांचा कारभारी, गुरु, राजा कुणीहि नसलास तरी तें तुला करतां येईल !'

'तें कसं म्हणतोस तें आलं नाहीं लक्षांत.'

'सांगतों ऐक. शंकर गलबतावरच कुणक्या सर तांडेल म्हणून मिरवणार ना ?

'होय.'

'तें गलबल बांधून पुरं करण्याचं काम तुझ्याकडे आहे ना ?'

'होय.'

'तें काम पुरं करतांना अगदीं शेवटीं काय करायचं असतं ?'

'मुख्य डोलकाठीच्या तळाशीं रुंद जागीं एक कप्पा तासून खोल करावयाचा. त्यांत 'भाग्याची' लाकडी बाहुली करून बसवायची. आणि तिची पूजा झाल्यावर कप्प्याच्या तोंडावर फळीचा तुकडा पक्का बसवून द्यायचा व तोंड बंद करायचं.'

'बरं ही बाहुली वर तोंड करून बसवली तर काय होतं ?'

'धन्याला बरकत येते. त्याचं नशिब फळफळतं.'

'पण ती बाहुली खालीं तोंड वर पाय करून उलटी बसवली म्हणजे काय होतं ?'

'त्या धन्याचा ती सत्यानास करते'

' मग बोल आतां. कुणक्याला आम्हां सर्वांच्या डोक्यावर बसवून सर खेलांनीं अपमान केला, त्याचा सूड घ्ययाचं साधन तुझ्याच हाती आहे कीं नाहीं? शंकर गलबताचं काम उद्यां तूं पुरं करणार. तेव्हां डोलकाठीच्या तळांतली बाहुली डोळा चुकवून उलटी बशीव म्हणजे झालं. अरे माणसानं आपल्या हातीं आहे तें तरी करावं. उलटी बाहुली आपला पराक्रम केल्याशिवाय राहणार नाहीं, आणि या शंकर गलबतावरच कुणक्याचं प्रेत न पढलं तर नांव बदलीन. '

असं म्हणून यम्यानं कमळ्याच्या हातांत एक सोन्याची आंगठीं देऊन त्याची मूठ वळली. कमळ्यालाहि कुणक्याचा उत्कर्ष पाहवत नव्हताच. पण आतां यम्यानं त्याच्यावर सूड घेण्याची युक्ति सुचवूनच्या सुचवून वरतीं सोन्याची आंगठी आगाऊ बक्षीस दिली तेव्हां कमळ्याला सरखेलांशी बेमान होण्याचा मोह कसा आवरणार ? '

त्यानं यम्याच्या पाठीवर शाबासकीची थाप मारली व म्हणाला ' गड्या युक्ति पणयुक्ती काढलीस. आतां बघतों हा गोसावड्याचा पोरगा सरतांडेलकी किती दिवस भोगतो ती ! '

( ३ )

आज तिसरे प्रहरीं शास्त्रीबुवा पोथी वाचीत बसले होते. आणि डाव्या मांडीशी बसलेल्या मांजराला हातानें थोपटीत होते.

इतक्यांत पडवीचें दार उघडून रतन हलक्या पावलानी आंत आली. तिच्या पेहरावात रोजची टापटीप नव्हती. कामावर जाताना ती काचा मारी तोहि आज मारलेला नसल्यानें लुगडें पायांत लोंबत अडखळत होतें. उन्हातून लांबून चालत आल्यामुळें तिच्या गोरट्या गालांवर रातांब्यासारखी लाली आली होती. आणि तोंड रडवें दिसत होतें. आली ती रोजच्यासारखी त्याच्या पुढ्यांत धिटाईनें बैठक मांडून बसली नाहीं.

कोपरापासूनचे हात एकमेकांत घालून, दोन्ही तळव्यांचीं बोटें एकमेकांत गुंतवून ते हनुवटीखालीं धरून उदासवाणी अशी पडवीच्या कोपऱ्यांत उभी राहिली.

थोड्या वेळानें पोथीवरून दृष्टि काढून घेऊन कनवटीची तपकिरीची डबी सोडवितांना शास्त्रीबुवांचे लक्ष रतनकडे गेलें. तिच्या चर्येकडे पहातां आजची रतन ही रोजची नाहीं, तिचें काहीं तरी बिघडलं आहे असें त्यांच्या ध्यानांत येण्याला उशीर लागला नाहीं. रोजची रतन म्हणजे हसत खेळत उत्साह उधळीत यायची. शास्त्रीबुवाना चाफ्याची नाही तर इतर कसलीं तरी चार फुलं आणून द्यायची. आणि आपली पायरी संभाळून पण विनोदबुद्धीनं उत्तर प्रत्युत्तर करायची. तें लक्षण आज काहींच दिसेना !

म्हणून तिला काही तरी बोलून उत्तेजन आणण्याकरितां म्हणाले, 'कां रतन ? आज मोकळ्या हातानीशी आलीस ? असं चालायचं नाही हो माझ्याजवळ ! आज तुझ्या घरचा चाफा फुलला नाही वाटतं ?'

बिचारा चाफा ! रतनला दुःख झालं म्हणून तो कां फुलायचा राहील ? तो फुलला असेल आणि नित्याप्रमाणं आपली धणीन फुलं वेचायला येईल म्हणून वाटहि पहात असेल. पण आज फुलें वेचायची आठवणच तिला झाली नाही. कारण तिचं सारं लक्ष एका गोष्टीवर लागून राहिलं होतं. ती म्हणजे आज संध्याकाळीं कुणक्या आपलीं गलबतं दहाहि घेऊन फिरंग्याबरोबर मोठ्या लढाईला जाणार !

खरं म्हटलं तर समुद्रातली लढाई ही विजयदुर्गच्या लोकाना अपरिचित नव्हती. आज सुमारें वीस पंचवीस वर्षे विजयदुर्गचं आरमार मधून मधून फिरंग्याशी लढत आलं होतं. या लढायांत, युद्धाच्या क्रमाप्रमाणं, केव्हां जय होई तर केव्हां पराजय होई. आपल्या घरची माणसें बेपत्ता झालीं, तीं समुद्रार्पण झालीं, तीं फिरंग्यानी कैद करून नेलीं, अशा बातम्या येऊन

केव्हां त्या लहानशा बंदरीं गांवातील घरांतून रडारड ऐकूं यावी, तर केव्हां या आरमाराचा जय व्हावा. गावचे कोळी, भंडारी, आरमारी खलाशी व वीर, फिरंगी कैद्यांच्या दावणी गलबतावर खुंट्यांना बांधून जयघोष करीत दारूचे बाण उडवीत, छोट्या नौबदी वाजवीत बंदरांत यावे. आणि त्यांना पहाण्याकरितां बंदरावर लोकांची गर्दी लोटावी असेंहि घडे. यामुळें विजयदुर्गच्या स्त्रियांतहि पुरुषांप्रमाणें वीरवृत्ति संचरून राहिली होती. तात्पर्य, आज रतन दुःखीकष्टी होती ती लढाईच्या भीतीनें नव्हे तर त्याला खरें कारण दुसरेंच होतं. तें म्हणजे आज अमावास्या होती. हा दिवस प्रवासाला निघायला देखील वाईट, मग युद्धावर जायला किती वाईट ? आणि म्हणून या बाबतींतच कांहीं बोलायला ती शास्त्रीबुवांकडे आली होती. धर्मकारणांतली अडचण ! तिचा परिहार करणारा आतां शास्त्रीबुवांशिवाय विजयदुर्गांत दुसरा कोण ? शास्त्रीबुवा झाले तरी ते अमावास्येची पौर्णिमा थोडीच करणार होते ! अशुभ दिवसाचा शुभ करणार होते ! पण तिला आशा इतकीच होती कीं, शास्त्रीबुवांनीं आपला शब्द खर्च केला तर कुणक्या आज वाईट मुहूर्तावर लढाईवर निघणार तो उद्यां प्रतिपदा लागल्यावर निघूं शकेल.

आज सरखेल विजयदुर्गांत नव्हते. ते अलीबागेस कांहीं दिवसांपूर्वीच गेले होते. तेथें त्यांना बातमी लागली कीं, रत्नागिरीच्या सुमारास गोवेकर फिरंगी, मुंबईकर इंग्रज, व हबशी हे आपलीं आरमारं एकत्र करून जुटीनें विजयदुर्गावर हल्ला करणार.

या शत्रूच्या आरमाराला तोंड द्यायला वरून अलीबागेहून आपलें आरमार घेऊन स्वतः सरखेल निघाले होते. आणि खालून येणाऱ्या शत्रूच्या आरमाराची वाट अडवायला सर तांडेल कुणक्यानें आपली आरमार तुकडी घेऊन, विजयदुर्गाच्या उत्तरेस दहा कोसावर जाऊन उभें रहाण्याकरितां ताबडतोब बाहेर पडावें, असा हुकूम त्यांनीं विजयदुर्गला पाठविला होता.

कुणक्या सर तांडेल झाल्यापासून युद्धाचें एक नवें राजकारण रंग- ण्याला प्रारंभ झालाच होता. जुन्या गलबतांची दागदुजी, नव्यांवर तोफा चढवून लढाऊ सरंजामाची भरती, हीं कामें जोरांत सुरू होती. एका आरमारी तुकडीचा जबाबदार अधिकारी या नात्यानें कुणक्या बंदरांतून बाहेर पडण्याचा हें युद्ध हा पहिलाच प्रसंग होता, मग सरखेलांचा ताबड- तोबीचा हुकूम आल्यावर तो निघाल्याशिवाय कसा राहील? पण आज अमावास्या ही गोष्ट भिवा वांधकऱ्याच्या ध्यानांत आली. तो ती सहज बोलला. रतनच्या मनांत ती गोष्ट घुसल्याशिवाय कशी राहील ? कुणक्या लढाईवर जाणार याकडे ती अभिमानानें लक्ष लावून बसली होती. म्हणू- नच त्यानं आज अमावास्येला बाहेर पडूं नये ही गोष्ट तिला विशेष जाणवली. साध्या मासेमारीच्या मोहिमेंत सुद्धां अवस पाळतात; तर लढाईवर निघतांना ती पाळणें अवश्य हें सहजच सुचावयाचं.

पण कोणत्याहि गोष्टींत कुणक्यानं पुढें टाकलेला पाय मागें घे म्हण- ण्याची सोय नव्हती. आदल्या दिवशी तिची त्याची गांठ बंदरावर पडली तेव्हां ही गोष्ट ध्यानांत येती तर तिनं त्यालाच बोलून पाहिलं असतं. पण त्यावेळीं ताबडतोबीनं निघण्याचा सरखेलांचा हुकूम आला नव्हता. तो रात्रीं आला म्हणे. आणि दुसरे दिवशीं सकाळपासून कुणक्याची गाठ घेण्याचा प्रयत्न तिनें केला. पण तो कामाच्या गर्दीत धांवपळ करीत असल्यानं त्याची तिची गांठ पडेना. अगदीं आयत्या वेळीं कदाचित तो आपली गांठ घेऊन ' जातोंग ' म्हणून तरी सांगायला येईल हा विश्वास तिला वाटत होता. पण अशा आयत्या वेळच्या निषेधानं त्याचा बेत थोडाच बदलणार ! मात्र आपल्याप्रमाणं शास्त्रीबुवांनाहि भेटल्याशिवाय, नमस्कार केल्याशिवाय, तो जायचा नाहीं अशीहि तिची खात्री होती. आणि त्याचं मन वळवायचं तर तें काम आपल्या प्रेमाच्या शब्दापेक्षां शास्त्रीबुवासारख्या धर्मपंडित गुरूच्या शब्दानं अधिक होण्याचा संभव म्हणून त्यांचीच गांठ घ्यावी अशा हेतूनं ती आज त्यांच्याकडे आली होती.

असो. रतन उदास दिसते म्हणून तिला बोलकी व उत्तेजित करण्याकरितां, वर सांगितल्याप्रमाणें, शास्त्रीबुवा म्हणाले, 'रतन, आज मोकळ्या हातानं आलीस! तें तसं चालायचं नाहीं हं. पुन्हां सांगतों.'

रतन खोटंच म्हणाली, 'आज मी मुद्दाम मोकळ्या हातानं आलें शास्त्रीबुवा. म्हटलं, इतके दिवस नेमानं तुमच्या देवाला चाफ्याचीं फुलं दिलीं, त्या पुण्याईचा गुण एक दिवस तरी येतो का पहावं.'

'माझ्या देवाचा कौल तुला कोणत्या कामीं हवा बोल. चांगला नवरा मिळवून द्यावा म्हटलं तर तुझा लग्नाचा विचार दिसत नाहीं. देशावरच्या खंडोबाच्या मुरळीसारखं देवदासीसारखं बिन लग्नानं राहणंच आवडतंसं दिसतं तुला.'

'शास्त्रीबुवा,' रतन रडव्याच पण चढाईच्या स्वरानें म्हणाली, 'त्या मोठ्या गोष्टी राहूं देत ना! मला लगीन करायची बुद्धि होईल त्या दिवशीं येईनच तुमच्या देवाचा कौल मागायला. पण एका साध्या गोष्टींतच तुम्हाला देव काय बुद्धि देतो, अन् ती कशी, तें पहायला मी आलें आहे!'

'काय? मला बुद्धी?'

'होय. तुम्हीं ज्योतिषीबुवा ना? सगळ्या गांवाला मुहूर्त काढून देणारे? मग आज कुणक्याला लढाईवर जायला अमावास्येचा मुहूर्त काढून देण्याची बुद्धि तुमच्या देवानं तुम्हांला दिली काय?'

'अस्सं अस्सं!' तिच्या बोलण्याचा रोख ध्यानांत आला असं दाखविण्याकरितां शास्त्रीबुवा आढ्याकडे नजर लावून हंसून म्हणाले. 'अस्सं! मग तुझा प्रश्न अगदीं लग्नाच्या विषयांतला नसला तरी जवळ जवळ तसाच आहे म्हणायचा!'

कुणक्यावर रतनचं प्रेम मनांतनं आहे ही गोष्ट शास्त्रीबुवांनीं अनेक

प्रसंगांनीं ओळखली होती. त्या दोघांवर त्यांची सारखीच ममता होती. आणि शास्त्रीबुवा हे धर्मानें सनातनी नसते तर, त्या दोघांच्या हस्तरेषा पाहून किंवा पत्रिका तपासून, जाया स्थानांवर, त्यांच्या शुभ ग्रहांची दृष्टी आहे असं फलित त्यांनीं वर्तविलें असतं. पण रतन पडली कोळी जातीची आणि कुणक्या हा कोणत्या तरी वरिष्ठ जातीचा आहे अशी त्यांची खात्री होती. म्हणूनच तो योग त्यांच्या मनांत बसेना. नाहीं तर त्या दोघांचं लग्न त्यांनीं आपल्या हातानं करून दिलं असतं.

असो. रतननं उपस्थित केलेला प्रश्न शास्त्रीबुवांना महत्वाचा वाटला. पण स्वतः आपण असला मुहूर्त काढून दिलेला नाहीं या जाणीवेनं ते म्हणाले, 'रतन , मीं असला मुहूर्त काढून देईन असं कसं होईल? बरं, कुणक्या आधीं येऊन भेटून मुहूर्त विचारता तर आजच्या मुहूर्तांची चूक मी त्याच्या ध्यानांत आणून दिली असती. तो कुठं आढळला कां तुला?'

'नाहीं. त्याची गाठ पडावी म्हणून आज दिवसभर मीं हिंडहिंड हिंडते आहे!'

'होय. उन्हांत हिंडल्याची साक्ष तुझे गालच देत आहेत. बरं, पण अजूनहि कुणक्या येऊन भेटेल. तो मला भेटल्याशिवाय जायचा नाहीं. तो आला तर त्याचं मन वळवून आजच्याऐवजीं उद्यां बंदरांतून बाहेर पडण्याला लावीन असं वाटतं.'

कर्मधर्मसंयोगानं हे शब्द शास्त्रीबुवांच्या तोंडून निघताहेत इतक्यांत स्वतः कुणक्याच आंत आला. आणि तडक जाऊन, शास्त्रीबुवांच्या पायां पडून, त्यांच्यासमोर शिपायगिरीची मांडी मोडून बसला. त्याचं लक्ष कोपऱ्यांत उभ्या असलेल्या रतनकडे गेलंच नाहीं. हें पाहून शास्त्रीबुवा त्या कोपऱ्याकडे अंगुलीनिर्देश करून म्हणाले, 'सरखेलांच्या विरुद्ध माझ्याकडे एक फिर्याद आली आहे कुणक्या!'

कुणक्यानं कोपऱ्याकडे पाहिलं तेव्हां त्याची आणि रतनची नजरा-नजर झाली. दोघंहि लाजून हंसूं लागलीं.

पण रतनची तक्रार कुणक्याच्या ध्यानांत शास्त्रीबुवांनीं ती सांगितल्या-शिवाय कशी येणार ? म्हणून कोणाची तक्रार काय ती समजून घेण्या-करितां तो म्हणाला,

'मला नाहीं समजलं शास्त्रीबुवा. कोणाची फिर्याद आणि काय तीं. अन् आमच्या सरखेलाचे तुम्ही गुरुजी असलां तरी त्यांच्यावरील फिर्या-दीचा न्याय करण्याचं काम तुम्ही खचित पतकरणार नाहीं.'

'तरी पण फिर्याद अशी आहे कीं, त्यांनीं तुला आरमारी लढाईच्या पहिल्या कामगिरीवर पाठवितांना अमावास्येलाच बंदरांतून बाहेर पडा-यचा हुकूम करावा हें योग्य काय ? अरे वेड्या ! मुहूर्ताची फिर्याद माझ्याकडेच यायची.'

'अन् ती आणली कुणी ?'

'ती पहा फिर्यादी कोपऱ्यांत उभी आहे' असें म्हणून शास्त्रीबुवांनीं रतनकडं हात केला. तेव्हां कुणक्याला कल्पना आली. त्याबरोबर आपली इतकी काळजी करणारी जगांत एक रतनच आहे या विचारानं त्याच्या मनांत तिच्याविषयीं प्रेम उचंबळून आलं. पण तें न दाखविण्याकरितां तो हंसत म्हणाला, 'शास्त्रीबुवा, ही रतन कधींपासन पंचांग ठेवून पाहूं लागली ?'

शास्त्रीबुवा म्हणाले, 'वेडा आहेस तूं—कुणक्या ! अवंस पुनव, भरती ओहोटीचीं ताणं, पावसाच्या खुणा, दर्याचा रंग, माशांची घालमेल या सगळ्या गोष्टी कोळी लोकांना पंचांग पाहिल्याशिवाय समजतात. अमावास्या हा कुमुहूर्त हें या लोकांच्या अंगीं इतकं बाणलं आहे कीं, तिचं टिपण ते मनांत नीट ठेवतात. मला आज अमावास्या हें माहीत

होतं. पण तूं आरमारी कामगिरीवर आज प्रथम बाहेर पडणार हें मला माहीत नव्हतं. तें रतननं सांगितलं.'

'होय शास्त्रीबुवा. आणि मी कामगिरीवर आजच निघणार म्हणून तुम्हाला नमस्कार करायलाच आलों होतों ?'

'पण कायरे कुणक्या, सरखेलांनीं तुला अमावास्येच्या दिवशीं कामगिरीवर निघण्याचा हुकूम करावा हें योग्य आहे का तूंच सांग.'

'वः आमचे सरखेल अगदीं वेडेच असतील तसं करायला. पण त्याचं असं झालं शास्त्रीबुवा, त्यांचा हुकूम मला वेळेवर पोचता तर मी कालच निघायचा. पण अलीबागेहून त्यांनीं पाठविलेल्या जासुदाच्या होडीला विजयदुर्गाची मजल वेळेवर गाठतां आली नाहीं. ती आज उजाडत बंदरांत पोंचली. यामुळं सरखेलांच्या हुकमाची अंमलबजावणी करायला आधींच चारसहा प्रहरांचा उशीर झाला आहे, त्याच्या भरीला आणखी चार प्रहर कसे घालूं ? प्रसंग आणीबाणीचा आहे शास्त्रीबुवा ! सामान्य नाहीं.'

कुणक्या पुढं म्हणाला, 'तुम्हांला कसं माहीत असेल ? पण मी सांगतों. मुंबईकर आणि गोवेकर, म्हणजे तांबडे पिवळे फिरंगी, यांचा कट झाला आहे. दोघे दोहींकडून आरमार घेऊन निघाले आहेत. आणि रत्नागिरीच्या सुमाराला हीं दोन आरमारं सरखेलांना कोंडून दुतर्फी मारा करणार आहेत. पैकीं गोव्याकडून येणाऱ्या आरमाराला अडवून झुंझण्याचं काम सरखेलांनी माझ्याकडे सोपविलं आहे. तें आरमार मालवणच्या सुमाराला अडवून धरण्याची मला आज्ञा झाली आहे. मी जर आज बाहेर न पडेन तर तें आरमार वाऱ्याच्या जोरावर विजयदुर्गाच्या पलीकडे जाऊन अनावर व्हायचं. आणि मग सरखेलांचं आरमार त्या दोघांच्या कैचींत सांपडायचं म्हणून मला आतां मुहूर्त बिहूर्त कांहीं पाहतां येत नाहीं हुकूमाप्रमाणं मला रात्रीं निघालंच पाहिजे. तुमच्या पुण्याईच्या बळावर

मी जगूनवाचूनच काय, पण जय मिळवूनहि परत येईन. रतन, तूं काळजी करूं नको.'

हा खुलासा ऐकून शास्त्रीबुवा निरुत्तर झाले व म्हणाले, "रतन, कुणक्याचं बोलणं खरं आहे. युद्धाच्या कामीं सुमुहूर्त कुमुहूर्त पहाणं हें मनांत असलं तरी कुणालाही मनासारखं साधत नाहीं. कुणक्या स्वतःच्या जबाबदारीवर आज पहिल्यानंच मोहिमेवर निघणार. आणि त्यांत जर त्याची कसूर झाली, तर सरखेलांच्या नोकरींत पुढें जन्म जायचा, उत्कर्ष व्हायचा, त्याची वाट काय? तूं काळजी करूं नको. आमच्या ज्योतिषांत कुमुहूर्त सांगितलेले असतात तसेच त्याच्यावर उपायहि सांगितले आहेत. म्हणून मी आज रात्रीं जाग्रण करून मंत्र जपीत बसून अवसेच्या घटका घालविणार आहे. तो उपाय कुणक्याप्रमाणं सरखेलांच्याहि कामीं लागेल.'

इतकं बोलून त्यांनीं पाया पडावयाला आलेल्या कुणक्याच्या डोक्यावर हात ठेवून त्याला आशीर्वाद दिला. कुणक्यानंहि एक वेळ रतनकड ओझरती नजर फेकून, पण कांहीं न बोलतां, बंदराची वाट धरली. तो दारांतून बाहेर पडतांच त्याच्या पाठोपाठ जाण्याच्या इच्छेनं रतननं पाऊल उचललं. पण फिरून दुसरा एक विचार मनांत येऊन ती क्षणभर तशीच उभी राहिली. शास्त्रीबुवांच्या आश्वासनपर भाषणानं आपलं मन निश्चिंत झालं असं वरकरणी तरी दिसावं असा प्रयत्न तिनं केला. आपण कुणक्याच्या पाठोपाठ त्याची गांठ घेण्याकरितां जात आहों ही कल्पना त्यांच्या मनांत न यावी याकरितां हें सर्व तिनं केलं. आणि वरतीं किंचित् हंसून ती त्याना म्हणाली, " शास्त्रीबुवा पुढच्या खेपेला येईन तेव्हां मोकळ्या हातानं यायची नाहीं बरं कां ? परडी भरून फुलं आणीन. आजच जरा—असं झालं—'

पण तिच्या मनांतील गोंधळ ओळखून शास्त्रीबुवा तिला त्यांतून मोकळी करण्याकरतां म्हणाले, " जाऊं दे ग रतन, आज असं कां झालं

हें मी ओळखलं. त्यांत तुझ्याकडं कांहीं दोष नाहीं. आज अमावास्येच्या रात्रीं कुणक्या स्वारीवर निघणार हें मला समजल्यापासून माझंहि मन व्यग्र नाहीं कां झालं ? तसंच तुझं. ज्याला ममत्व असेल त्यालाच चिंता वाटेल. ती दुसऱ्याला कशी वाटणार ? पण माझं मन व्यग्र असलं तरी तुला मात्र मी मोकळ्या हातांनीं पाठविणार नाहीं. हा घे प्रसाद.'

असं म्हणून शास्त्रीबुवा आपल्या गुंडाळलेल्या पोथीवर नेहमी फुलं ठेवीत त्यांतलीं दोन उचलून त्यांनीं तिच्या हातावर ठेवलीं आणि म्हणाले, ' जा आतां आपला कामधंदा कर. '

हा इतका वेळ आपण मुद्दाम गमावित आहों हें रतनला माहीत होतं. म्हणून बाहेर पडतांच फुकट गेलेली वेळ भरून काढण्याकरितां, ती बंदरच्या वाटेनं पाऊल उचलून निघाली. नारळीच्या झाडांतून जाणारी मळलेली अशी ही एकच वाट सरळ असल्यामुळं दूर अंतरावर तिला कुणक्या दृष्टीस पडला. तेव्हां अंतर तोडण्याकरतां तिनं आणखी थोड्या जलदीनं पाऊल उचललं. ही वाट लवकरच एका गर्द राईंत शिरली. या राईच्या आसपास वस्ती नव्हती. संध्याकाळचा सुमार होऊन किंचित् अंधारहि पडत चालला होता. असं पाहून रतननं जलदी करून कुणक्याला गांठला आणि हळूंच त्याच्या खांद्यावर हात ठेवला. कुणक्या दचकून मागें पाहतो तों रतन उभी. तेव्हां किंचित् थबकून तो म्हणाला, ' रतन, मी शास्त्रीबुवांना सांगितलं तें तूं ऐकलंसच ना ? तुला झालं तरी मी वेगळं काय सांगणार ! आधीं धन्याची नोकरी नि मी पहिल्याच मोठ्या कामगिरीवर निघालेला.धन्याचा हुकूम आला तोहि सुखासुखी किंवा लहरी-खातर नव्हे, तर वेळ अगदीं आणीबाणीची म्हणून. मी तर अशा उमेदीनं निघालों आहे कीं, काम फत्ते करीन तरच परत येईन. माझ्या या उल्हासापुढं पंचांगांतल्या कुमुहूर्तानंहि मान लवविलीच पाहिजे. तूं बघशील तर खरी, मी कसा विजय मिळवून येतों तो.'

मग तिला किंचित् हसविण्याच्या हेतूनं तो म्हणाला, 'रतन, सांग बरं, तुझ्या गळाला माशाची ओढ लागली अन् तुला कोणी सांगितलं कीं हा मुहूर्त कांहीं चांगला नाहीं, तर तूं तो मासा हातचा घालवूं देशील काय? तुला कोळणीला जसे मासे तसे मला हे फिरंगी वाटतात. गांठ पडली कीं, प्राण दिल्या–घेतल्याशिवाय सुटका नाहीं.'

यापुढं रतन तरी काय बोलणार? ती एवढंच म्हणाली, 'तूं वीर मर्द गडी. मी किती केलं तरी भित्री बायको माणूस. तुझं शहाणपण आणि धैर्य मला कोठून येणार? आज अमावास्या हें लक्षांत आलंय कशाला कोणाला ठाऊक! पण तें लक्षांत आल्यावर कसं जाणार? एकूण माया मोठी वाईट नव्हे काय? मी अधिक काय बोलूं?' असं म्हणून तिनं आपलं मस्तक त्याच्या खांद्यावर टेकलं. आणि आपल्या अश्रूंनीं ती जागा भिजविली. वीरमर्द उल्हासानं रणावर निघाला तरी त्यालाहि माया प्रेम हीं सोडीत नाहींत. रतनचं प्रेमळ हितगुज त्याच्या लक्षांत आलं नसेल काय? पण कर्तव्यापुढं मायेलाहि माघार घ्यावी लागते हा युद्धाचा शिरस्ताच आहे. कुणक्यानं सन्मुख होऊन रतनचं डोकं दोन्ही हातांनीं दूर धरून तिला हंसविण्याकरतां तो म्हणाला, "तुझ्या प्रेमाची काय पुण्याई असेल ती सगळी या वेळीं माझ्या कामाकडं खर्ची घाल. आणि मी लढाई जिंकून परत आलों म्हणजे मग चांदणं पाहून पूर्वीसारखं पुनः एकदां आपण नावेंत बसून खाडीतनं सहलीला जाऊं. माझ्या सोबत्यांनाहि मी बरोबर घेईन, आणि झाल्या सर्व हकिगती मी तुला सांगेल. तुझ्यासारख्या बायकांना लढाईवर नेत नाहींत इतकंच काय तें. एरवीं तूं येतीस तर माझ्याबरोबरीनं कामगिरी केली असतीस अशी मला खात्री आहे. पण चाल नाहीं त्याला इलाज नाहीं. मग मी येऊं आतां.' असं म्हणून त्यानें तिचें हात सोडविले. आणि तिनंहि डोळ्याला पदर लावून, पण मोकळ्या मनानं, हुंकार भरला. कुणक्या बंदराकडं तोंड फिरवून तडक निघाला तो त्यानं एकवारहि मागं

पाहिलं नाहीं. पण तो पुरा दृष्टीआड होईपर्यंत रतनचं पाऊल मात्र जाग्यावरून हाललं नाहीं.

## ( ४ )

'काय ? तुम्ही मला ओळखतां, आणि मी मात्र तुम्हाला ओळखीत नाहीं ! हें कसें ?'

'त्याचें कारण फार खोलांत नाहीं. तें तुमच्या आमच्या पोषाख पेहरावांत उघड आहे.'

'तें कसें ?'

'तें असें कीं, बारा वर्षांपूर्वी मीं तुम्हाला पाहिलं तेव्हां तुम्ही होतां व दिसत असां तसेच आजहि ! तुमच्या गळ्याशीं गुंडाळून मागें पाठीवर सबंद सोडलेला, आणि पुढें छातीवर गांठ मारलेला, राजापुरी शुभ्र पंचा बारा वर्षांपूर्वी पाहिला तसाच आजहि आहे. नेसूचा आखूड पंचाहि तसाच. तुमच्या हातांतील जून वेताची काठी पूर्वी होती तशीच. इतकेंच काय, मी म्हणूं कां अगदीं तीच ती म्हणून ?'

'तुमच्या निरीक्षणाचं व स्मरणशक्तीचं मला आश्चर्य वाटतं. माझे दोन पंचे बारा वर्षांपूर्वीचे तेच आज नाहींत हें खास. तथापि ते जातीनें राजापुरीच असून ते नेसण्यापांघरण्याची माझी पद्धती जुनी तीच आहे. आणि, मला सांगतांना अभिमानहि वाटतो कीं, आज तुम्ही माझ्या हातांत पाहतां, अगदीं तीच जून वेताची काठी माझ्या हातीं बारा पंधरा वर्षं आहे. उलट तुम्हाला जर मीं पूर्वपरिचाये म्हणून ओळखीतच नाहीं, तर तुमचा पोषाख पेहराव बारा वर्षांपूर्वी कसा होता, व आज त्यांत कांहीं बदल झाला आहे कीं काय, हें मीं कसें सांगूं ?'

'तुम्ही नको. मीच सांगतों. आमचा गोसाव्यांचा पेहराव बारा

वर्षांतच काय, पण सबंद जन्मांतहि बदलत नाहीं. तुम्हां गृहस्थांचाच बदलण्याचा संभव. मी जन्मांत कधींहि माझा चेहरा आरशांत बघितलेला नाहीं. पण नुसतें खालीं पाहून मला समजतें कीं, बारा वर्षांत माझी दाढी खूपच खूप वाढली आहे. वर तिनें कानापर्यंत माझा चेहरा व्यापलेला असून तिला खालीं बेंबीला पोंचण्याला फारसा अवकाश नाहीं. बारा वर्षांपूर्वी ही दाढी काळी होती. एखादा केस करडा झाला असेल. आज ही सगळी दाढी धुतल्या वाकासारखी पांढरी शुभ्र झालेली आहे. तुमच्या तोंडावर तेव्हां उदासपणाची छाया आणि वैराग्याचं तेज होतें तेंच आज आहे. तथापि एखादी सुरकुती चहाडी करून सांगते कीं, तुम्हीं तेव्हांपेक्षां बारा वर्षांनीं प्रौढ, आणि आज तर जवळजवळ म्हाताऱ्यांत जमा होत आहां. आम्हां गोसाव्यांच्या तोंडावरच्या सर्व खाणाखुणा दाढींत लपून जातात. आमचं तेज काय तें आमच्या डोळ्यांत असतं. शिवाय पूर्वी तुम्ही आम्ही भेटलों तेव्हां तुमच्याकडे मी या खांबाआडून बारीक नजरेनं पण सूक्ष्म लक्ष लावून पाहत होतों. आणि तुम्ही मात्र दुसऱ्याशीं बोलण्याच्या नादांत असल्यानं माझ्याकडं नुसतं ओझरतं पाहिलं असेल. म्हणून तुम्हांला माझ्या डोळ्यांतल्या तेजाचं काय सांगतां येणार ? पण तुमच्या डोळ्यांतलं तेज थोडं मंद होत चाललं आहे असं मला वाटतं.'

'अगदीं या खांबाआडून ' असं खांबाला हात लावून बोलतां, तेव्हां तुमची आमची बारा वर्षांपूर्वी गांठ पडली ती अगदीं याच कुणकेश्वराच्या देवळांत–याच सभामंडपांत–पडली कीं काय ?'

'होय, महाराजा ! आतां थोडी आठवण देतों खुणा सांगून. त्यावेळीं तुमच्याशीं संभाषण करणारा कोणी एक पांढरपेशा पण शिपाई गडी होता. त्यानं पायांत पांढरी तंग विजार घातली होती आणि डोक्याला भगवा फेटा गुंडाळला होता. कमरबंदांत तरवार लटकावलेली होती. '

'पुढं बोला. अजून पक्की आठवण होत नाहीं.'

' तो गृहस्थ कोकणाला धावती भेट देऊन देशावर जाण्यापूर्वी देवदर्श-नाला या ठिकाणीं आला होता. तुम्ही व तो गृहस्थ स्नेही म्हणून तुम्हीहि आपल्या गावाहून त्याला भेटण्यासाठीं या गांवी व देवळांत मुद्दाम आलां होतां. '

' देशावरून कोकणांत प्रतिवर्षी आपल्या घरीं येऊन जाणारे असे ब्राम्हण मराठे शिपाई पुष्कळ असतात. बरं पुढं. '

' त्या गृहस्थाबरोबर त्याची आठदहा वर्षांची एक सुंदर खेळकर मुलगी होती. आणि माझ्या बरोबर एक सुमारें तेराचौदा वर्षांचा सुंदर चलाख शिष्य होता. तुम्हां दोघांच्या बोलण्यांत व्यत्यय येत होता म्हणून तुम्हीं तिला देवळाभोंवती बागेंत हिंडवून ये म्हणून म्हणालां. तेव्हां माझ्या शिष्यानं पुढं होऊन तिला बागेकडं नेलं. आणि हिंडवून आणलं. '

' चंद्रावरचे ढग हळू हळू पातळ होत जाऊन त्याचं किंचित दर्शन होऊं लागावं त्याप्रमाणं तुमच्या बोलण्यानं मला आठवण होऊं लागल्यासारखं वाटतं. बरं, माझ्या व त्या शिपाई गड्याच्या बोलण्यांत काय विषय येत होता ?'

' तो म्हणत होता, मी आणखी कांहीं दिवस इकडं राहिलों असतों तर नेहमींप्रमाणं कोकणांतलीं चार कर्तबगार तरुण मुलं देशावर नेलीं असतीं, अन् त्यांना कर्तृत्वाचं मैदान खुलं केलं असतं. पण तुम्ही म्हणालां कीं कर्तृत्व हें काय ? अंगांत असेल तर तें कोंकणांतहि दाखवितां येतें. '

' बरं पुढं, आणखी कांहीं ? ' तो पंचाधारी हंसून म्हणाला.

' होय. आणखी पुढं आहे तें सर्वांत महत्त्वाचं आहे. ' आपण या पुढं सांगणार तें अगदीं पक्की खूण पटवील या जाणिवेनं तो गोसावीहि हंसून म्हणाला, ' पण देशावर नेऊन मोठ्या कारभारांत घालावा असा

मुलगा तुम्हांपैकीं कुणालाच नाहीं असं बोलण्यांत निघालं. कारण त्या शिपाई गड्याला केवळ एक मुलगीच. आणि बायको वारल्यावर मुलीच्या प्रेमामुळं त्यानं फिरून लग्न केलं नाहीं. आणि तुम्ही तर म्हणे बाल ब्रम्हचारी होतां व पुढंहि तसेच राहणार होतां. आणि याहून दुःखाची गोष्ट ही कीं, तुमच्या बहिणीला एक लहान तीन वर्षांचा मुलगा होता. परंतु वैधव्य दुःखानं ती आणि तिच्याबरोबर तो मुलगा, दोघंहि त्या पूर्वी बारा वर्षं, याच देवळाखालीं अर्धोदय पर्वाच्या दिवशीं समुद्रांत बुडालीं.'

इतके शब्द ऐकतांच तो पंचाधारी कोंकण्या ब्राह्मण म्हणाला, 'गोसावी' बुवा, तुमच्या आठवणी अगदीं अक्षरशः बरोबर आहेत. तुमची भेट याच ठिकाणीं बारा वर्षांपूर्वी झाली तें आतां चांगलं आठवलं. आणि तो प्रसंग आठवणींत राहण्याचं कारण हें कीं, त्यानंतर त्या माझ्या मित्राची किंवा तुमची भेट इथंच काय, पण इतर कुठंहि यापूर्वी पडली नाहीं. कोणाच्याहि भेटींचा शेवटचा प्रसंग आठवणींत चांगला राहतो. त्यावर अनुभवाचं नव पुट येऊन बसलेलं नसतं.'

'तुमचं नांव—नांव—काय बरं विसरलों.'

'माझं नांव शामराव आणि त्या दुसऱ्याचं नांव पंडितराव.'

'मग काय? पंडितराव त्यानंतर फिरून एकदांहि कोकणांत आले नाहींत?'

'नाहीं. त्या भेटीनंतर पुढच्याच पावसाळ्यांत ते वसंतगड घेण्याच्या कामगिरीवर असतां तोफेचा गोळा लागून मेले. आणि ती त्यांची मुलगीहि लवकरच सर्पदंशानं मेली. मिळून काय, सारे अपघातच आले आम्हां दोघां मित्रांच्या वांटणीला. मी मात्र तेवढा अजून जिवंत आहे—थोड्याशा कालावधीचा सोबती.''

'शामराव–तुमच्या वांटणीला आलेले अपघात कोणते म्हणालांत? फिरून विचारतों. क्षमा करा.'

'माझी बहीण आणि तिचा मुलगा हीं दोघं समुद्रांत बुडालीं हें तुम्हांला माहीतच झालं आहे.'

'तुमची बहीण समुद्रांत बुडाली हा तुमचा तर्क बरोबर असावा. मलाहि तसंच वाटतं. पण तुमचा भाचा समुद्रांत बुडाला हा तुमचा तर्क मात्र चुकला.'

'तो कसा?'

'तो असा कीं, त्या मुलाला समुद्र वाळवंटातनं मीच उचलून या मंडपांत आणला.—'

शामराव ताडकन् उभा राहून म्हणाला 'मग तो आजवर कुठं होता?'

'ऐका. बारा वर्षांपूर्वींपर्यंत तो मजवळ चेला म्हणून होता. आणि तुमची आमची मागील गांठ या सभामंडपांत पडली तेव्हां मजबरोबर जो गोसाव्यासारख्या वेषांत चेला होता, आणि तुम्ही व पंडितराव बोलत असतां, पंडितरावाच्या मुलीला बागेंत ज्यानं हिंडवून आणलं तो तुमचा भाचाच! त्याचं नाव कुणक्या असं मी ठेवलं होतं. कारण तो मला कुणकेश्वरी लाभला!'

'मग तो तुम्ही माझ्या स्वाधीन तेव्हांच कसा केला नाहीं? माझा भाचा हें माहीत झाल्यावर तरी?'

'ती सर्व कथा जरा लांबट आहे. चला. आपण या देवळाच्या मागच्या बाजूला प्रदक्षिणेच्या वाटेवर पश्चिमेकडं तोंड करून पुढं आलेला स्वच्छ दगडी कट्टा आहे त्यावर बसूं. आज अक्षत तृतीयेचा चंद्र पहायला सांपडेल. आणि मी सांगणार त्या हकीकतींतल्या समुद्र वाळवंटाच्या खुणाहि तिथून मला तुम्हाला नीट दाखवितां येतील.'

त्या कट्टयावर जाऊन ते दोघे बसल्यावर, गोसाव्यानं कुणक्याला वाळवंटावरनं उचलून नेल्यापासून, पुढच्या खेपेस पंडितरावाच्या होडींत त्याच्याकडून उडी मारविल्यापर्यंतचा, सर्व अद्भुत वृत्तांत सांगितला.

'आणि मग तेथपासून बारा वर्षं तुम्ही आपल्या चेल्याचा परामर्ष कांहींच कसा घेतला नाहींत ?'

'परामर्ष तो काय घेणार ? मी नर्मदातीराकडं होतों. मी काय कोणी राजा किंवा सरदार किंवा सावकार आहें म्हणून माझी डाक येईल जाईल ? शिवाय आम्हां गोसावी सांप्रदायांतील रीत तुम्हांला माहीत नाहीं.'

'ती काय ?'

'एकदां विसरलं कुणालाहि म्हणजे मग आम्ही त्याची आठवण उकरून काढण्याचा प्रयत्न करीत नाहीं ! फिरून आठवण व्हायची तर योगा योगानं ! असा आमचा दृढ विश्वास असतो. दर बारा वर्षांच्या अवधीनं पूर्वीचे दोन प्रसंग या देवालयांत घडले. तसाच प्रसंग आणखी एकदां व्हायचा असेल म्हणून मला फिरून बारा वर्षांनीं या देवस्थानला यायची बुद्धि झाली. असेल दैवांत तर या सफरींत कुणक्याची—म्हणजे तुमच्या भाचाची व माझ्या त्या चेल्याची—गाठ पडेल पुन्हा एकदां. स्वतः आज अचानक तुमची पडली तशीच. बाकी या एका तपांत तो नांवारूपाला आला असेल अशी माझी पुरी खात्री आहे. तुमच्या पंडितरावाच्या होडींत त्या रात्रीं कुणक्यानं उडी टाकल्यापासून पुढं काय घडलं हें माझ्यापेक्षां तुम्हालाच कळण्याचा संभव अधिक. कारण पंडितरावाकडून तुम्हाला आलेल्या पत्रांत कांहीं हकीकत असेल कदाचित त्याच्यासंबंधीं ?'

'होय, विजयदुर्ग सोडून घाटावर निघण्याच्या वेळीं पंडितरावानं एक पत्र मला गड्याहातीं पाठविलं. त्यांत त्यानं लिहिलं होतं कीं, 'मी मुलीला

घेऊन घाटावर जात आहे. आणि आपलं नशीब काढण्याकरितां, होडींत उडी घालून जो गोसाव्याचा चेला माझ्याबरोबर आला त्याला, मी विजय-दुर्गांतच शास्त्रीबुवांच्या घरीं ठेवून दिला आहे. कर्तृत्व अंगीं असेल तर तें कोकणांतहि उदयाला येऊं शकेल हें तुझं मत मला माहीत आहेच.'

'असो. पाहूं या काय अनुभवाला येतं तें.' '

' विजयदुर्गास कान्होजी आंग्रे यांनीं आरमारी राज्यच स्थापलं आहे. त्यांतच हा माझा भाचा व तुमचा चेलाहि लागून गेला असेल एखाद्या नोकरीवर. नवं राज्य म्हणजे कर्तृत्वाची व बुद्धीचीं नाणीं पडण्याची नवी टांकसाळच असते ती एक.'

यांचं हें इतकं बोलणं होत आहे तोंच कुणकेश्वरच्या दक्षिण अंगाला समुद्रावर दूर कोठेंतरी तोफांचे व बंदुकांचे बार झाल्यासारखे आवाज मधून मधून ऐकूं येऊं लागले.

इतक्यांत कोणी जाणते होते ते सांगत आले कीं, समुद्रावर आरमारी युद्ध सुरू आहे. अवसेच्या आदल्या दिवशीं, कुणकेश्वराला गाऱ्हाणें सांगून युद्धांत जय मिळण्याचा कौल मागण्याकरितां, विजयदुर्गाहून नारळ घेऊन हरकारा आला होता. तो सांगे कीं, उत्तर बाजूला खुद्द कान्होजीराव आंग्रे अंग्रेजाशीं लढण्याला अलीबागच्या बंदरांतून बाहेर पडले आहेत.

पण हें दक्षिणेकडं युद्ध सुरू आहे तें कोणाशीं? कोणाला कांहींच कल्पना होईना. तथापि उद्यां याची कांहीं माहिती मिळेलच, आपण देवस्थान सोडून जाऊं नये, असं शामराव व गोसावी या दोघांनींहि ठरविलं. आणि दोघेहि परत देवळाच्या सभामंडपांत जाऊन निजले.

* * *

दुसऱ्या दिवशीं उजाडण्याच्या आधींपासून कुणकेश्वराच्या देवळांत ये जा सुरू झाली. देवळनजीक खालीं असलेल्या गांवच्या लोकांना रात्रीं व पहाटेहि बार ऐकूं येत होते. म्हणून ते लवकरच उठून देवळाशीं

आले. कारण नुसत्या डोळ्यांच्या सहायानं मिळणारी बातमी या देवळाच्या पश्चिमेकडच्या उंचवट्यावरनं सर्वांत अधिक मिळण्यासारखी होती. जो तो आपले तर्क करूं लागला व दुसऱ्याला सांगूं लागला. थोड्या वेळानं बातमीला अधिक तोंडं फुटूं लागलीं. उत्तरेकडून विजयदुर्गाहून पुन्हां एक हरकारा आला. तो सांगूं लागला कीं, अलीबागेपलीकडे कान्होजीराव आंग्र्यांनीं ताबड्या फिरंग्यांचं आरमार थोपवून धरून, त्याचा धुव्वा उडवून, त्याला परत माजगांव बंदरांत पिटाळून घातलं. या विजयाबद्दल देवाला वाहण्याला नारळ व पोषाख घेऊन ठाणेदार उद्यां कुणकेश्वराला येणार. आणि पूजा झाल्यावर मोठी समाराधना घालणार! दक्षिण अंगानं डोंगर चढून येणारा एकजण सांगे कीं, 'त्या बाजूला पिवळ्या गोवेकर फिरंग्यांच्या आरमाराचा मोड झाला असून, यश मिळविलेलीं कांहीं जहाजं कुणकेश्वर मागं टाकून देवगडला गेलीं. पण दोन जहाजं खुद्द कुणकेश्वरकडेच हळूहळू येत आहेत.'

कुणकेश्वर हें गलबतं लागण्याचं बंदर नव्हे, असं असतां इकडे दोन जहाजें कां येतात? आणि किनाऱ्याच्या बाजूला पाणी उथळ असल्यानं तींतलीं माणसं सामान उतरण्याची सोय कशी होणार? या विषयीं तर्क सुरू झाले. पण त्याचं उत्तरहि त्या आलेल्या माणसानंच दिलं. कारण तो गावकऱ्यांना हांक मारून म्हणाला, 'चलारे, कोण गाभीत कोण खलाशी असाल ते. आंब्या फणशीचे लांब रुंद तक्ते मिळवा, आणि त्याचे मोठे तराफे बांधा. इकडे येणाऱ्या गलबतांना पाण्यांत थांबावं लागेल तिथपर्यंत आपणाला हे तराफे न्यावयाचे आहेत. या छोट्या आरमाराचा सरतांडेल जखमी झाला आहे. त्याला एका तराफ्यावर अलाद उचलून ठेवून हळूहळू वल्हवीत आणायचा आहे. इतर तराफ्यांवर सामान आणि आरमारी लोक बसून येतील. मजुरी हवी तितकी मिळेल. पण त्वरा करा. कारण त्या जखमी सरतांडेलनं अगदीं ओठांत प्राण धरला आहे. म्हणतो कुणकेश्वराच्या समोर नेऊन ठेवा मला, तेव्हांच माझे प्राण जातील.

त्याच्या जखमा मोठ्या असल्यानं त्याचा जीव घोटाळतो आहे. पण कुण-केश्वराचं दर्शन घेतल्याशिवाय मी मरणार नाहीं असं तो म्हणतो. यावरून त्याचे प्राण अधिक चिवट म्हणावे कीं त्याची भक्ति अधिक गाढ म्हणावी कळत नाहीं.'

हा सर तांडेल कोण ? त्याचं नांव कुणालाच माहीत होतं असं दिसेना. विजयदुर्गाहून आलेल्या हरकाऱ्यालाहि तें चांगलंसं माहीत नसावं. तो कुणकर कुणकर असं कांहींसं सांगे. पण ते नांव परिचित नव्हतं. कारण प्रचारांत नव्हतं तें.

असो. फळया जमवून त्या वाळवंटावर नेऊन तिथंच त्यांचे तराफे बांधले. ते पाण्यांत लोटले. खलाशांनीं वल्हीं घेतलीं. सकाळची वेळ. समुद्र शांत होता. भरतीला किंचित सुरवात झाली होती. तरी तराफ्यांना अडथळा फारसा भासत नव्हता. उलट त्या भरतीच्या आधारानं कुणकेश्वरच्या डोंगराला दक्षिणेकडे वळसा घालून तीं दोन गलबतं देवळांतल्या लोकांना स्पष्ट दिसूं लागलीं होतीं व झपाट्यानं किनाऱ्याकडे येत होतीं.

शामराव आणि तो गोसावी दोघेहि स्नानपूजादि उरकून त्या येणाऱ्या गलबतांचा वृत्तांत पाहण्याऐकण्याला तयार राहिले होते. फिरंग्याशीं युद्ध हा कुतूहलाचाच विषय होता. परंतु युद्धांत भाग घेतलेलीं दोन गलबतें कुणकेश्वर किनाऱ्याला येणार, आणि तें युद्ध जिंकलेला अज्ञात जखमी आरमारी वीर देवळांत येणार, या बातमीनें त्या देवस्थानच्या आसपासच्या भागांत मोठीच गडबड उडून राहिली होती.

सुमारें आठ घटका दिवसाला समुद्रावरून येणारीं गलबतें उथळ पाण्यांत नांगर टाकून स्थिर झालीं. किनाऱ्याकडून तिकडे गेलेले तराफेहि याच सुमारास तेथें जाऊन पोंचले. एका गलबतांतून कोणाला तरी अलाद उचलून, मोठ्या काळजीपूर्वक रीतीनें, एका तराफ्यावर आंथरलेल्या भाते-

णाच्या शय्येवर ठेवण्यांत आलें. आणि ते तराफे हळूहळू किनाऱ्याकडे येऊं लागले. देवळाच्या मागच्या अंगच्या तटाला टेकून सर्व लोक हें निश्चलपणें पहात होते. परंतु तराफे वाळवंटाच्या नजीक आलेसे पाहून त्यांना दम धरवेना. ते सर्व खालीं उतरून वाळवंटाशीं गेले.

वेळूंच्या दांड्यावर खाली पाला व वर मऊ गवत घातलेली रुग्णशय्या चौघा खलाशांनीं तराफ्यावरून हळूच उतरून कोरड्या वाळूवर ठेवली. त्याबरोबर त्या जखमी वीरानं दोन्ही हात जोडून व देवळाकडं दृष्टि लावून नमस्कार केला. शामराव व गोसावी दोघेहि पुढें झाले. त्यांनीं गर्दी हटविली. स्वस्थपणं त्याचा चेहरा न्याहाळून होतांच गोसाव्यानं कपाळावर हात मारून घेतला व आक्रोश करून म्हणाला, 'बेटा, तूं धन्य झालास. पण मला दुःखांत लोटलंस ना! बेटा, कुणक्या, तुझी भेट पुन्हा बारा वर्षांनीं व्हावी आणि ती अशा स्थितींत व्हावी हा काय अपूर्व योगायोग! एकदा डोळे उघडून आपल्या गुरुजीकडं नीट पहा. नर्मदा-तीराकडून इकडं येण्याची बुद्धि मला देवानंच केली म्हणायची! कारण आज मी इथं नसतों तर तुझी माझी फिरून गाठहि न पडती!"

हे शब्द ऐकून कुणक्यानं डोळे उघडले, आणि आपल्या गुरूला ओळखून हंसत हात जोडून नमस्कार केला. 'गुरुजी' असे शब्द तोंडून निघतांच कुणक्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

शामरावानं कुणक्याच्या तोंडाकडं बराच वेळ निरखून पाहिलं. त्यांत आपल्या बहिणीच्या चेहऱ्याची ओळख त्याला किंचित दिसली. परंतु कुणक्या अडीच तीन वर्षांचाच नाहींसा झाला, आणि त्या पूर्वीहि त्या मुलाला नित्य पाहण्याचा प्रसंग नाहीं. तथापि गोसाव्यानं सांगितलेली ती सर्व हकीकत अद्भुत असली तरी पुरी विश्वसनीय होती. यामुळं बहीण गेली पण भाचा तरी एक वेळ पुन्हां पाहायला सांपडला या विचारानं त्याला आनंद झाला.

कुणक्याला आपल्या उरल्या आयुष्याच्या क्षणांचा अंदाज होत असेल काय ? कारण तो वरचेवर देवळाकडं दृष्टि लावून मला तिकडं लवकर न्या अशा अर्थाच्या खुणा करूं लागला. त्याला त्या उघड्या वाळवंटांत अधिक वेळ ठेवणं योग्यहि नव्हतं.

मऊ गवत घातलेली चारपाई वर देवळांत नेऊन सभामंडपांत देवाच्या गाभाऱ्या सन्मुख ठेवण्यांत आली. गोसावी व शामराव यांनीं भोंवतालची गर्दी हटविली. त्यांनीं अगदीं जवळ जाऊन कुणक्याच्या जखमा तपासल्या. त्यावरून हें दिसून आलं कीं, रक्तस्राव भयंकर झालेला असून जखमाहि जिव्हाळयाच्या जागीं आहेत. तोंड फिकट होऊन त्यावर अवकळा येत चालली होती. तो बोलण्याचा प्रयत्न करी; पण फारसे शब्द ओळीनें उमटत नसत. यामुळें आपली जीभ कोरड्या ओंठावर फिरवून तो ती आंत घेई. शामरावानं गाभाऱ्यांत जाऊन वाटीभर तीर्थ आणलं. त्यांत गोसाव्यानं आपल्या बटवींतला शिलाजतुसारखा एक पदार्थ काढून उगाळला, व करांगुळीनें तें चाटण कुणक्याच्या ओठांच्या आंत दोनदां लावलें आणि कुणक्याहि तें जिभेनें आंत नेलं. त्यामुळं त्याला किंचित् हुषारी आल्याचा भास झाला.

कुणक्यानं कांहीं बोलावं अशा इच्छेनं गोसावी म्हणाला, 'बेटा, तू मला ओळखलंस का ? '

याचे पहिलें उत्तर कुणक्यानें हंसण्यानें दिलें. मग हळू हळू एकेक शब्द उच्चारीत म्हणाला ' गुरुजी आपलं दर्शन झालं. आतां मीं सुखानं मरेन. '

' पण तूं मला जगायला हवा आहेस.'

' मग जगवा मला. जगलों तर फिरून तुमच्याबरोबर नर्मदेला येईल. आणि नव्या यात्रा करीन.'

शामरावाकडे हात करून गोसावी म्हणाला, ' बेटा हे तुझे मामा. यांना तूं ओळखतोस काय ? '

कुणक्या त्यांच्याकडे न्याहाळून म्हणाला, ‘ मला कोणी मामा असले तर हवे. पण मी यांना ओळखले नाहींत. माझ्या आईसारखं यांचं तोंड दिसतं मला.’

शामराव म्हणाला, ‘ बाळ, तुझ्या आईची तुला आठवण आहे का?’

‘ आई आठवते. पण ती चांगलीशी नाहीं. असं मात्र वाटतं कीं, या देवळांत मला घेऊन ती एकदां आली होती. अन् आम्हीं समुद्रस्नानाला खालीं गेलों. पण मी परत जातांना गुरुजींच्या खांद्यावर बसून गेलों.’

‘ अन् तुझ्या आईचं काय झालं ? ’

‘ देवाला माहीत !’

शामराव डोळ्याला पाणी आणून म्हणाला, ‘ बुवाजी, नका त्याला अधिक बोलवूं. बोलतांना त्याला शीण होत आहे. ’

* * *

संध्याकाळीं देवळाखालीं समुद्राच्या वाळवंटावर एक चिता नुकतीच पेटली होती. खलाशी गांवकरी वगैरे लोक एका बाजूला बसले होते. दुसऱ्या बाजूला शामराव व गोसावी दोघेच दोघे बसले होते.

चतुर्थीच्या चंद्राचं मंद चांदणं त्या पांढऱ्या वाळूवर पसरलं होतं. समुद्राला भरती येत होती. पण लाटांचा आवाज फारसा होत नव्हता.

गोसावी म्हणाला—‘ शामराव, हीच ती जागा. चिता पेटण्याच्या याच जागेवर तुमचा भाचा व माझा चेला प्रथम मला दिसला. तो त्या वेळीं आपल्या आईकरितां रडत होता. आज आम्हीं त्याच्याकरितां रडत आहों. त्याला त्या दिवशीं वाळवंटावरनं मी उचलून नेला नसता तर काय झालं असतं कांहीं कल्पना करवत नाहीं.’

‘ कल्पना कां नाहीं ? तो आईप्रमाणंच समुद्रांत गडप झाला असता. तो जगून वांचून नांवारूपाला आला हें तुमच्या पुण्याईचं फळ ! एरवीं

आम्हांला तो जन्मभर मुकलाच असता. इकडचीं त्याचीं सगळीं माणसं सोडून, कोण कुठले नर्मदाकांठचे तुम्ही गोसावी त्याला आयत्या वेळी वांचवायला या एका बाजूच्या कुणकेश्वरीं येऊन उभे राहिलां हा वढा योगायोग!'

'आणि फिरून आज बारा वर्षांनीं तो मरण्याच्या वेळीं मी कुणकेश्वरी आलों हा दुसरा योगायोग तरी तसाच म्हणजे ईश्वरी नव्हे का?'

'तुमचा अन् त्याचा अन्य जन्मीचा कांहीं लागाबांधा असावा अशा सारखेच हे दोनहि योगायोग मला वाटतात? या अन्य जन्मीच्या संबंधामुळंच तुम्हाला या मुलाला संसारांत घालण्याची इच्छा झाली.'

'आणि ती चूक नव्हती हें त्यानं आपल्या कर्तृत्वानं सिद्धच केलं. गोवेकर फिरंग्याशीं लढून त्यानं आपल्या धन्याचं केवढं कार्य केलं, आणि किती शौर्य गाजविलं. याविषयीं त्याच्याबरोबर आलेल्या लोकांनी कशीं वर्णन केलीं तीं ऐकलींत ना? तो जगता तर आणखी पराक्रम करता.'

'माणसाच्या अंगीं कर्तेपणाचा उपजत गुण पाहिजे. मग तो माणूस देश सोडून कोकणांत असला तरी इथंहि त्या गुणाला वाव मिळेल असा माझा विश्वास होता व आहे. तो माझ्या भाच्यानं खरा ठरविला.'

चित्ता जळून शांत झाल्यावर सर्वजण वर कुणकेश्वराच्या देवळाकडे निघाले.

* * *

तिसरे दिवशीं सकाळीं गोसावी व शामराव दोघांनीं चित्ता सावडून जागा शिंपली. गोसाव्यानं कुणक्याच्या आस्थि उचलून घेऊन त्या फड-

ऱ्यांत गुंडाळून आपल्या झोळींत घातल्या. देवळांत गेल्यावर गोसावी देवाला नमस्कार करून प्रवासाला निघाला तेव्हां शामराव म्हणाला—

' गोसावीबुवा, माझं तरी आतां घरीं काय ठेवलं आहे ? हा माझा वेष तुम्ही पाहतांच ! माझ्या उत्तरेकडच्या यात्रा अजून व्हायच्या आहेत. तुमच्या संगतींत मला त्या आयत्या करतां येतील. कुणक्यावरील प्रेमामुळं तुम्ही आम्ही भाऊभाऊ झालों आहों. '

---